# अटकेपार

[ स्वतंत्र सामाजिक कादंबरी ]



लेखक—प्रो० नारायण सीताराम फडके, एम्. ए.



प्रकाशक—गणेश महादेव आणि कंपनी,

६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर

किंमत २॥ रुपये

# अनुक्रमणिका



मित्रवर्य

श्रीयुत बाबूराव पेंटर

यांच्या कलागुणाइतक्याच सुंदर मुग्धवृत्तीस

अर्पण

# प्रो. फडकेकृत पुस्तकें

## चरित्रें

१. दादाभाई नौरोजी
२. टेरेन्स मॅकस्विनी
३. डी व्हॅलेरा

## कादंबऱ्या

१. अल्ला हो अकबर
२. कुलाब्याची दांडी
३. जादुगार
४. दौलत
५. अटकेपार

## प्रबंध

१. मानसोपचार
२. मानसोन्नति
३. संततिनियमन
४. आजचे तरुण स्त्रीपुरुष
व त्यांजपुढील प्रश्न

## नाटक

१. युगान्तर

## इंग्रजी

1. Sex Problem in India
2. Psychology
3. Elements of Ethics
4. Manual of Logic

# अटकेपार



## प्रकरण १ लें



### मखमलीचें जुगदान



काहीं माणसांचे स्वभाव असे असतात कीं त्यांना रागवायला कोणतें निमित्त पुरेल तें सांगवत नाहीं, आणि त्यांचा राग उसळला कीं सिमल्यांतील घरें धरणीकंपानें हालावीं त्याप्रमाणें भोंवतालच्या सजीव निर्जीव वस्तु हादरून जातात. 'दि मॉर्निंग न्यूज' पत्राचे संपादक मिस्टर ब्राउनिंग अशा माणसांपैकीं होते. कामाचा उरक त्यांच्या स्वतःच्या अंगीं मनस्वी असल्याकारणानें, आणि एक अग्रगण्य वर्तमानपत्र आज तीस वर्षें उत्कृष्ट रीतीनें चालविल्याचा अभिमान त्यांच्या अंगीं भिनला असल्याकारणानें योजलेलें काम मनाप्रमाणें झटपट होण्याच्या मार्गांत कांहीं अडचण आली कीं त्यांना रागाची ऊर्मि येई. टेबलावर मुठी आपटून टेबलावरच्या घंटेची स्प्रिंग मोडेपर्यंत ती पुनः पुन्हां वाजवून, घाबरून धांवत येणाऱ्या पट्टेवाल्यांवर घोगऱ्या आवाजांत गुरगुरून आणि उपसंपादकांना, रिपोर्टरांना, छपाईखात्यांतल्या लोकांना बोलावून आणून त्यांच्यावर हजार हुकुमांचा गोळीबार करून ते साऱ्या ऑफिसची इमारत हालवून सोडीत. अशा वेळीं त्यांच्या कपाळावर ज्या दाट आंठ्या पडत त्यांवरून त्यांच्या ऑफिसांतील मंडळी आपआपसांत हलक्या आवाजानें चर्चा करतांना ब्राउनिंगच्याऐवजीं मिस्टर 'फ्राउनिंग' या टोपणनांवानें त्यांचा उल्लेख करीत. आणि रागाच्या वेळीं ब्राउनिंगसाहेब चिरोटाचे भपकारे वेगावेगानें सोडीत त्यांवरून उपसंपादकांतील कांहीं वात्रट मंडळी त्यांना ज्वालामुखीची

उपमा देत असत. पण या आपल्या कोट्या ब्राउनिंगसाहेबांच्या कानांवर गेल्या तर खरोखरच ज्वालामुखीच्या स्फोटांत नामशेष होण्याची वेळ आपल्यावर येईल हें सर्वजण पूर्णपणें जाणून होते; आणि साहेब रागावला आहे ही बातमी कळल्यावर साऱ्या विनोदी कोट्या विसरून जाऊन त्या रागाचें शमन लवकर कोणत्या मार्गानें होईल या विवंचनेनें सर्वांची तारांबळ उडून जाई.

त्या दिवशीं असेंच झालें. क्रॉफर्ड मार्केटजवळच्या मदीना हॉटेलला अकराच्या सुमारास एकाएकीं आग लागल्याची बातमी कळतांच ब्राउनिंगसाहेबाचा दंगा सुरू झाला. प्रत्येक बातमी आपल्या पत्रांत सर्वांत आधीं आणि सर्वांत सविस्तर आली पाहिजे असा त्याचा मोठा कटाक्ष असे; व हें साध्य होण्यासाठीं तो स्वतः खर्चाची पर्वा करीत नसे, आणि आपल्या नोकरांनीं प्राणांचीदेखील पर्वा करतां कामा नये असें त्याचें म्हणणें असे. मदीना हॉटेलमधील आगीची बातमी कळल्याबरोबर त्या आगींत आतां किती बिचारे जीव दग्ध होतील असें ब्राउनिंगसाहेबाच्या मनांत येण्याऐवजीं आगीची ऐन बित्तंबातमी सगळ्यांत आधीं आपल्या आवडत्या 'न्यूज' मध्यें येईल कीं नाहीं ही चिंताच त्याच्या मनांत एकदम उभी राहिली व त्याच्या जिवाची आटापीट सुरू झाली. टेबलावरची घंटा त्यानें इतक्या निर्दयपणें दाबली कीं, कसाबाच्या सुरीच्या पहिल्या स्पर्शाबरोबर मेंढरानें 'ब्यऑंऽऽऽ' असा लांबलचक विलाप काढावा त्याप्रमाणें घंटेंतून 'घर्र्र्र्ऽऽ' असा गुदमरलेला आवाज किती वेळ तरी निघत राहिला. दाराजवळचा पट्टेवाला चपापला; तंबाखूची चिमूट घशांत टाकायच्या बेतांत तो होता पण त्यानें ती लगबगीनें हवेंत भिरकावून दिली, आणि आधीं 'साऽऽऽब' असें बाहेरूनच प्रत्युत्तर करीत आंत धांवत जाऊन तो उभा राहिला.

तो समोर दिसत असून साहेब ओरडला,

"पट्टेवाला!"

"साब"

"देखो, सुधीरको बुलाव--"

"हां साब"

"जलदी--"

"हां साब" असें म्हणून पट्टेवाला धांवला.

तो जाऊन पुरें मिनिट झालें नसेल तोंच ब्राउनिंगसाहेबानें घंटा पुन्हां दाबली व दुसरा पट्टेवाला धांवून आंत आला.

" पट्टेवाला--"

" साब."

" देखो, फोटोडिपार्टमेंटमें दौडो. और मॅथ्यूजको बुलाव--"

" साब."

" जलदी--"

" साब " असें म्हणून दुसरा पट्टेवाला धांवला.

तोंच पहिला परत येऊन साहेबासमोर उभा राहिला. चिरोटांतून धूम्रवलयें सोडीत साहेबानें विचारलें,

" सुधीर किदर हय ? "

पट्टेवाल्यानें भीतभीत म्हटलें,

" साब--सुधीरसाब--नहीं हय उदर--"

" क्यं ?--नहीं ?--" असा उद्गार काढीत ब्राउनिंगसाहेबानें टेबलावर मुष्टिप्रहार केला; व त्या प्रहाराचा निनाद ऐकतांच संपादक-कचेरींतील सारे लोक आपापल्या जागीं भयानें स्तब्ध झाले. आकाश गडगडतांच आपापल्या घरट्यांत चोंचीला चोंच लावून बसणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें साऱ्यांची अवस्था झाली.

" सुधीर नहीं ?--किदर हय ?--" साहेबानें पुन्हां गर्जून विचारलें.

" साब--" पट्टेवाला म्हणाला, " सुधीरसाब अबतक आये हुवे नही--"

" उः ! " अशा उद्गारानें अंतःकरणांतील रागाची वाफ सोडल्यासारखें करून ब्राउनिंगसाहेबानें पुन्हां टेबलावर मूठ आपटली, व क्षणभर थांबून कपाळाच्या आंठ्या अधिकच चढवून विचार केल्यासारखें करून विचारलें,

" देखो, एडिटर्स-रूममें सुधीर नहीं--बाकी कौन हय ?--"

" सब साब हय--डेव्हिडसाब हय, हडसनसाब हय, गुप्तसाब--"

" च्‌ च्‌ ! " साहेब त्रासानें म्हणाला, " सुधीरके जैसे एकभी नहीं ! " असें म्हणून त्यानें डाव्या हाताचीं बोटें अधीरतेनें टेबलावर चाळविलीं.

पट्टेवाल्यानें साहेबाच्या तोंडचें तें वाक्य हजारदां ऐकलें होतें. 'सुधीरके जैसे एकभी नहीं !' हें साहेबाचें ठरीव वाक्य होतें; आणि तें पुनः पुन्हां कानीं पडावें असें सुधीरचंद्रावरील प्रेमामुळें याच पट्टेवाल्याला नव्हे तर साऱ्याच

पट्टेवाल्यांना वाटत असे. त्यामुळें तें आवडतें वाक्य ऐकतांच पट्टेवाला म्हणाला,

" हां साब."

साहेबानें किंचित् चपापून त्याच्याकडे पाहिलें व म्हटलें,

" एक भी नहीं, एक भी नहीं ! पर पट्टेवाला-- "

" हां साब."

" देखो, काम तो बिलकुल अर्जंट हय--देखो, डेव्हिडको भेज दो."

" हां सांब"

तो पट्टेवाला गेला तोंच बोलावल्याप्रमाणें फोटोखात्यावरील मुख्य मॅथ्यूजसाहेब आंत आला.

त्याच्याकडे वर पाहून साहेब म्हणाला,

" Look here, Mathews, there's fire at the Madina Hotel. Get there immediately and run back with a few photographs. We must be first in the field with them. Look sharp, will you ?" (हें पहा, मॅथ्यूज, मदीना हॉटेलमध्यें आग लागली आहे. तेथें ताबडतोब जाऊन आगीचे थोडे फोटो घेऊन ये. आपल्या पत्रांत साऱ्यांच्या आधीं आले पाहिजेत. समजलास ? आटप.)

" Yes Sir " असें म्हणून मॅथ्यूज गडबडीनें गेला.

साहेबानें एकामागोमाग दोनचार चिरोटाचे भपकारे सोडले व कांहीं तांतडीचीं प्रुफें टेबलावर येऊन पडलीं होतीं तीं हातीं घेतलीं.

तितक्यांत डेव्हिड आला व तें पाहून प्रुफें दूर करून साहेब इंग्रजींत म्हणाला,

" डेव्हिड, एक महत्त्वाचं काम आहे."

" सांगा साहेब."

" मदीना हॉटेलमध्यें आग लागली आहे. तिची बित्तंबातमी आणायची आहे."

" हं."

" हं काय ?--गोष्ट सांगतों आहें कीं काय तुला ? "

डेव्हिड स्वस्थ उभा राहिला; व तें पाहून अधिकच चिडून साहेब म्हणाला,

" अरे उभा काय राहिलास खांबासारखा ?--च्--च् !--या वेळीं सुधीर असता तर--"

तितक्यांत साहेबाच्या टेबलावरच्या टेलिफोनची घंटा खणखणून वाजली. साहेबानें ध्वनियंत्र उचलून कानातोंडाला लावलें व जरा रुष्ट स्वरांत विचारलें,

" हलो !--कोण ? सुधीर ?--Oh ! हें बघ, ताबडतोब मदीना हॉटेलमध्यें जा--तिथं--आं ? काय म्हणतोस ?--तिथनंच बोलतो आहेस ? हाः हाः हाः ! गुलामा !--हं ?--हं ?--अच्छा अच्छा ! आणतो आहेस ना सारी बातमी ? ठीक !--शाबास ! वाट पहातों आहें ! हः हः ! Dear old boy ! "

असे उद्गार काढीत साहेबानें ध्वनियंत्र जागच्या जागीं ठेवलें. डेव्हिडला परत आपल्या जागीं जावयास सांगितलें व प्रुफावरून नजर टाकण्यास प्रारंभ करून चिरोटाचा एक सावकाश, मजेदार झुरका ओढला. जणुं उकळीला आलेलें पाणी एकदम थंड झालें; उसळलेला ज्वालामुखी निवाला; आकाशांतील गड-गडाट बंद पडून वादळ विरून गेलें. आतां पान खावयास हरकत नाहीं असें वाटून बाहेरच्या पट्टेवाल्यानें तें खाल्लें व तंबाकूची चिमूट तोंडांत सोडीत सुधीरचंद्रास धन्यवाद दिले.

ज्या सुधीरचंद्राच्या टेलिफोनमधील निरोपाचा ब्राउनिंगसाहेबावर येवढा परिणाम झाला तो सुधीरचंद्र या वेळीं मदीना हॉटेलमधील कल्लोळांत उभा होता.

सदाशिव गल्लींतील कोपऱ्यावरच्या लहानशा बंगलीवजा घरांतून तो रोजच्या-प्रमाणें त्या दिवशींहि जेवण करून वेळेवर निघाला होता. पण रोजच्याप्रमाणें गिरगांवच्या बाजूची ट्रॅम गांठण्याऐवजीं सँढर्स्ट रोडकडील ट्रॅमनें जावयाचें त्यानें ठरविलें. जेवत असतां शंभुरावांनीं---त्याच्या वडिलांनीं—सहज म्हटलें होतें,—

" अरे, एखादं चांगलं हरिणाजिन मिळालं तर बघ रे. संध्येच्या वेळेस मी घेतों तें आतां अगदीं फाटत आलं आहे, मिळेल कां ? "

" हो !—संध्याकाळीं घेऊन येतों."

" तें कुठून ? "

" आमचा हैदर आहे ना " असें उत्तर सुधीरच्या अगदीं तोंडावर आलें होतें, पण वेळींच सुविचार सुचून त्यानें तें ओंठापासून परतविलें. हरिणाजिन हवें म्हणतांच सुधीरनें तें आणावें या विचारानें आपल्या दादांना जितका आनंद होईल, तितकाच तें हक्कानें मागून उचलून आणण्याइतका सुधीरचा व एका श्रीमंत, मृगयाप्रिय मुसलमानाचा स्नेह असावा या विचारानें त्यांना विषाद

वाटेल हें सुधीरला पक्कें माहीत होतें. म्हणून ओंठाशीं आलेले शब्द परतवून तो नुसतें म्हणाला,

"मिळेल. आणतों संध्याकाळीं."

ऑफिसांत जातांजातांच हैदरला भेटून हरिणाजिनाबद्दल सांगावें म्हणजे संध्याकाळीं परत यायच्या वेळीं त्याच्याकडे जाऊन तें आणतां येईल, असा विचार करून मार्केटच्या बाजूची ट्रॅम आज सुधीरनें गांठली. मार्केटच्या पश्चिम बाजूस जें निरुंद गल्ल्यांचें जाळें पसरलेलें आहे त्यांतील एका गल्लींत हैदरचें काडतुसें, बंदुका वगैरेंचें दुकान होतें; व दुकानच्याच मागच्या बाजूस त्याचें रहातें घर होतें. सुधीरला हैदरच्या घरांत शिरायला सदर परवाना असे. त्याप्रमाणें तो घरांत शिरला, हरिणाजिनाविषयीं त्यानें हैदरला सांगितलें, व ते दोघे इतर गोष्टी बोलत सहज आणखी दोन मिनिटें उभे राहिले. इतक्यांत हैदरचा एक नोकर धांपा टाकीत आला व मदीना हॉटेलमध्यें आग लागल्याची बातमी त्यानें सांगितली. ती ऐकतांच सर्वांच्या आधीं सुधीर तेथून धांवला. हरणाचा वास लागतांच पारधी कुत्र्यानें झांप टाकून धांवावें त्याप्रमाणें तो तडक गेला तो एकदम मदीना हॉटेलच्या मुख्य दरवाजांत जाऊन थडकला. त्यानें आधीं कशीबशी टेलिफोनची छोटी खोली गांठली व तेथून ब्राउनिंगसाहेबास वर्दी दिली कीं मदीना हॉटेलमधील आगीची बातमी आपण आणीत आहोंत. त्याच्या त्या आश्वासनानें साहेबाच्या धांदलीच्या भडकूं पहाणाऱ्या ज्वाळा कशा एकदम शान्त झाल्या तें वाचकांना समजलेंच आहे.

टेलिफोन हातावेगळा करून सुधीरनें परत हॉटेलच्या फरसबंदी बोळकंडींत पाऊल टाकलें तों तेथें कोण कल्लोळ उसळला होता. आग वास्तविक मोठी नव्हती. वरच्या मजल्यावरच्या २१ नंबरच्या खोलीनेंच काय तो पुरता पेट घेतला होता. पण तेवढ्यानें हॉटेलांतील सारीच पाहुणेमंडळी घाबरून गेली होती, आणि त्यांच्या इतस्ततः धांवण्यापळण्याचा व ओरडण्याचा जेवढा गोंगाट होत होता तितकाच हॉटेलची व्यवस्थापकमंडळी मोठमोठ्या आरोळ्यांनीं त्यांना शान्त करूं पहात होती त्याचा होत होता. त्याच धांवपळींत आग विझविण्यासाठीं आलेल्या डगलेवाल्या व शिरस्त्राणवाल्या शिपायांच्या हालचालीची भर पडली होती. त्यांचे एकमेकाला मिळणारे इशारे, त्यांच्या बुटांचे खाड खाड आवाज, पाण्याच्या अजस्र नळ्या ओढल्या गेल्या कीं होणारा खर-

खराट आणि त्यांतून पाण्याचे स्रोत सुटतांच ऐकूं येणारा फवारा या सर्व शिस्तशीर धांदलीचें इतर बेशिस्त धांवपळींत विलक्षण मिश्रण झालें होतें. सुधीरनें त्या देखाव्याकडे थोडा वेळ पाहिलें. तेथें फारसें उभें रहायचें त्याच्या मनांत नव्हतें. जी नंबर २१ ची खोली पेटली होती त्या खोलींत जातां आलें तर पहायचा त्याचा बेत होता, आणि तसें करण्यांत अडथळे काय काय येतील व त्यांचें निवारण कसें करतां येईल याचा विचार करीत तो थबकून उभा होता.

इतक्यांत उजव्या हाताला पलीकडे हॉटेलच्या मॅनेजरचें टेबल होतें तिकडे त्याचें लक्ष वेधलें. तें तसें वेधण्याचें कारण येवढेंच कीं कोणावर तरी रागावून चिडून बोलल्यासारखे मॅनेजरचे शब्द त्याच्या कानीं आले. त्यानें वळून पाहिलें तों त्रासल्यासारखे हातवारे करून हिंदुस्थानी भाषेंत मॅनेजर म्हणत होता,

"अरे गृहस्था, माफ कर ना! इथं आगीचा डोंब उसळलेला, अन् तुझी हॉटेल सोडून जायची याच वेळीं मिजास लागली! पण मी कुठं आतां तुझं बिल तयार करीत बसूं?--मेहेरबानी कर अन् संध्याकाळीं जा. वाटलं तर तंवर रहाशील त्याचे पैसे आम्हांला देऊं नकोस, मग तर झालं?-- हं, जा, जा! मेहेरबानी!"

ज्या गृहस्थाला उद्देशून मॅनेजर याप्रमाणें बोलला तो एक उण्यापुऱ्या उंचीचा धिप्पाड मुसलमान होता. त्याचा बांधा एखाद्या पैलवानाला साजेसा होता; व मॅनेजरशीं आवेशानें बोलतांना त्याचा उजवा हात पुढें झाला होता त्याकडे सुधीरची नजर जातांच राकट कामानें कसलेल्या हातासारखा तो त्याला वाटला. पण त्या माणसाचा पेहराव तर उंची दिसत होता. त्याचें कमरेला कसलेलें चौकड्याचौकड्यांचें वस्त्र तलम रेशमी होतें, त्याच्या पायांतील चढावाची किनार कलाबतूनें खुलवलेली होती आणि त्याच्या डोक्यावरची अगदीं टाचकी, एखाद्या वाटीसारखी लहानशी टोपी तर फारच मूल्यवान दिसत होती. या विरोधामुळें त्या गृहस्थाबद्दल अधिकच कुतूहल वाटून सुधीर हळूच सरकून त्याच्या पाठीशींच जवळ जवळ उभा राहिला,

तो गृहस्थ रागानें मॅनेजरला हिंदुस्थानींत म्हणत होता,

"तुझ्या आगीचं मला काय सांगतोस?--मला माझीं कामं आहेत--मला ताबडतोब जायलाच पाहिजे!--आग नाहीं आगीचा बाप झाला म्हणून मी इथंच राह्यलं पाहिजे हें खूप आहे--"

त्याचें तें हिंदुस्थानी बोलणें व बोलतांना निघणारे विचित्र हेल ऐकतांच हा माणूस मुसलमानी असला तरी उत्तरहिंदुस्थानचा नसून आपल्या हैदरसारखाच पश्चिम किनाऱ्याच्या मुलखांतला असला पाहिजे ही कल्पना सुधीरच्या मनांत आली. त्यामुळें त्या माणसाकडे अधिकच जिज्ञासेनें तो पाहूं लागला.

तो गृहस्थ पुढें मॅनेजरला म्हणाला,

" हें माझं सामान माझ्या खोलींतून मी घेऊन आलों आहें. मला गेलं हें पाहिजेच. माझा हिशोब तुला सांगायचा आहे कीं नाहीं, बोल."

मॅनेजरनें संतापानें टेबलावरच्या लठ्ठ लठ्ठ वह्यांवर हात आपटले व म्हटलें,

" छान ! छान ! हॉटेलमध्यें आग उसळली आहे अन् मॅनेजरनं आंकडे मोडायचे ! हंः ! माहीत नाहीं मला तुझा हिशोब-- "

" अच्छा !-माहीत नाहीं तर कुछ फिकीर नहीं. हे पैसे मी देऊन जातों. चार दिवसांचा हिशोब यापेक्षां अधिक होणं शक्य नाहीं. संभाळ हे पैसे. मी जातों ! "

इतकें बोलून त्या गृहस्थानें दहा रुपयांच्या पांच नोटा टेबलावर टाकल्या, आणि हातांतील बॅग सरसावून गर्दींतून वाट काढीत भराभर जाऊन तो दोनतीन मिनिटांत दिसेनासा झाला.

मॅनेजर आश्चर्यचकित होऊन त्या अदृश्य होणाऱ्या विचित्र गृहस्थाकडे पहात राहिला. सुधीरनें वळून मॅनेजरकडे पाहिलें व 'तुला आश्चर्य वाटणं साहजिक आहे' असा अभिप्राय नजरेनें व्यक्त केला. त्यामुळें मॅनेजर सुधीरकडे पहात खांदे उडवून म्हणाला,

" देखोजी !--कैसे अजीब आदमी !--"

सुधीर जवळ सरकला व त्यानें ऐटबाज हिंदुस्थानींत विचारलें,

" कितव्या खोलींत होती ही स्वारी ? "

" नंबर वीस, आग लागली तिच्या लगतच."

" हं ?--"

सुधीरचा हा उद्गार अशा कांहीं स्वरानें निघाला कीं " मग या गृहस्थाचा आणि आगीचा कांहीं तरी संबंध असला पाहिजे व त्यामुळेंच ताबडतोब हॉटेल सोडून जायचा त्यानें अट्टाहास केला." असा विचार जणुं त्याच्या मनांत आला होता, त्यानें पुढें विचारलें,

"ही स्वारी आली कुठून ?"

"कुणास ठाऊक !"

"केव्हां आली तें तर सांगतां येईल?"

"हो. जुम्मेवारीं—चार दिवसांपूर्वी—हो, मला नक्की आठवतं आहे. नंबर २१ मधला पॅसेंजर अन् ही स्वारी एकाच दिवशीं आली—"

"हं हं ?" असें स्वगत पण अर्धवट मोठ्यानें उद्गारत सुधीर तेथून एकदम जो गेला तो वरच्या मजल्यावरच्या २१ नंबरच्या खोलीकडे.

त्याच्या त्या "हं हं ?" या सूचक उद्गाराच मॅनेजरला जरा नवल वाटलें. पण एक तर नवलाच्या लहान सहान उद्गारांचा विचार करीत बसण्यासारखी ती वेळ नव्हती, आणि शिवाय असला विचार करण्याइतका मेंदूचा भरणा मॅनेजर लोकांच्याजवळ असणें सोईचें नसतें. त्यामुळें त्या मॅनेजरनें टेबलावरच्या नोटा खिशांत घातल्या, आणि आगीच्या त्या संकटाच्या वेळीं शिस्त व शान्तता राखण्याच्या हेतूनें धांदल व ओरडा करण्यांत हॉटेलच्या लोकांचा जो कळप त्या वेळीं गुंतला होता त्यांत तो घाईघाईनें सामील झाला.

सुधीरचंद्र २१ नंबरच्या खोलीपाशीं पोंचला तेव्हां तेथें त्याला लोकांची गर्दी दिसली नाहीं. आग विझविणाऱ्या लोकांनीं ती खोली पुरती थंड, सचैल करून टाकून दुसऱ्या कोठें किंचित् धूर निघत असल्यास तेथें पाण्याचा मारा करण्यासाठीं आपला मोर्चा वळवला होता. खोलीच्या दाराशीं आग विझविणाऱ्यांपैकीं एक डगलेवाला भेटला त्यानें सुधीरला येवढें मात्र सांगितलें कीं, २१ नंबरच्या खोलींत आगीनें मेलेल्या एका माणसाचें प्रेत सांपडलें होतें.

"खरं ?" खेदयुक्त विस्मयानें सुधीर म्हणाला.

"हो. बिचारा म्हणे चारच दिवसांपूर्वी कुठून दूरच्या मुलखांतून मुंबईस आला होता, अन् दोन दिवसांनीं जाणार होता परत—"

"हं ?—अरेरे !—" असा उद्गार काढीत असतां सुधीरच्या मनांत मघांच्या त्या मुसलमान गृहस्थाची कल्पना आल्यावांचून राहिली नाहीं.

तो डगलेवाला शिपाई तेथें फार वेळ उभा राहिला नाहीं. तो गेल्यावर सुधीरनें दोन घटकांपूर्वी ज्या स्थळाला २१ नंबरची खोली हें नांव होतें तेथें आंत पाऊल टाकलें. त्याच खोलींत प्रथम आग दिसली व भडकली म्हणून पाण्याचा प्रचंड वर्षाव तेथें करण्यांत आला होता. पण विनाशकशक्ति म्हणून

अग्नीनें आणि संरक्षणार्थ म्हणून पाण्यानें--दोहींनीं मिळून एकंदरींत खोलीचा पुरता विध्वंसच करून टाकला होता. शिवाय आग पसरूं नये म्हणून पेटलेल्या खिडक्या, दारें वगैरे लांकडी काम कुऱ्हाडीनें भराभर तोडून टाकण्यांत आलें होतें. त्यामुळें सुधीरनें इकडे तिकडे दृष्टि टाकली तों गुडघा गुडघा पाण्याचीं तळीं, जळून काळतोंड्या झालेल्या भिंती, कोळशाचें रूप घेतलेलें व छिन्न-विच्छिन्न होऊन पडलेलें लांकडी काम, आणि घाईंत इतस्ततः फेंकले गेलेले व आतां कोठें पाण्यांत तरंगणारे तर कोठें जळकट लांकडाच्या व मातीच्या ढिगा-वर चिकटलेले कागदाचे तुकडे आणि कपड्यांच्या धांदोट्या, याशिवाय त्याला कांहीं दिसेना. तो क्षणभर तेथें उभा राहिला व तेवढयांत या आगीबद्दल आपल्या वर्तमानपत्रांत कसा कसा मजकूर लिहावा त्याची त्यानें मनाशीं जुळवणी केली.

तो तसा उभा होता इतक्यांत उन्हाची रखरखीत तिरीप कोंपऱ्यांतल्या पाणतळ्यावर पडून कांहीं तरी चमकल्यासारखें त्याला वाटलें.

चटकन पुढें होऊन त्यानें वांकून पाहिलें तों सुमारें दीड वीत लांबीचें कट्या-रीचें रिकामें घर तेथें पडलें होतें तें उन्हांत चमकत होतें.

सुधीरनें तें उचलून हातांत घेऊन न्याहाळून पाहिलें. त्या घराचा घाट फारच सुंदर होता; आणि त्यावर उंची मखमलीचें आवरण असून कलाबतूनें कांहीं उर्दू अक्षरें, दोन व्यत्यस्त तरवारी आणि मधोमध चंद्रकोर अशी एक लहा-नशी पण अतिशय सुबक निशाणी काढली होती.

सुधीरनें क्षणभर त्याकडे अत्यंत जिज्ञासेनें पाहिलें व मग तें घर झटकन खिशांत घालून तो मनाशीं म्हणाला,

" घर सांपडलं तशी कट्यारहि कदाचित् सांपडेल अन् मग माझी शंका—"

असें कांहींसें पुटपुटत त्यानें धुंडाळायला प्रारंभ केला.

पण कितीहि धुंडाळलें तरी त्याची इच्छा पूर्ण होईना.

कट्यारीच्याऐवजीं दुसरीच एक वस्तू मात्र त्याला शेवटीं सांपडली.

तें एक मखमलीचें जुगदान होतें !

धुळींत पडल्यामुळें तें मळलें होतें. पण सुधीरनें तें झटकतांच मखमलीचा काळाभोर रंग खुलून दिसूं लागला. एखाद्या लहानशा बटव्यासारखें तें जुग-दान होतें, व त्याच्या सुलट बाजूवर नारळाच्या झाडाची आकृति कशिद्यानें

काढली होती ती फारच आकर्षक होती. त्या नारळाच्या झाडाखालीं उर्दू अक्षरें होतीं तीं सुधीरनें मोठ्या प्रयत्नानें लावून वाचलीं, तेव्हां 'मरियम्' असें कोणा तरी स्त्रीचें तें नांव असावें असें त्याला वाटलें. त्यानें जुगदान उघडलें तों आंत तोंडाला लावायची पावडर, एक लहानसा कंगवा आणि आरसा दिसला. दोनचार छापील नांवाचीं छोटीं कार्डेंहि त्यांत होतीं. त्या सर्वांवर

Miss Mary
Christian Orphanage

असा मजकूर छापला होता.

सुधीरनें जुगदानांतल्या वस्तू पुनः पुन्हां पाहिल्या. जुगदानावरील नारळाच्या झाडाचें मोहक चित्र तर कितीदां निरखिलें तरी त्याची तृप्ति होईना; आणि जुगदानावरचें 'मरियम्' हें मुसलमानी नांव व आंतील कार्डावर मेरी हें ख्रिस्ती नांव यांतील विरोधानें त्याच्या मनाला मोठा चटका लावला. कट्यारीच्या घराचें वाटलें नाहीं इतकें त्याला त्या मखमली जुगदानाचें नवल वाटलें.

तें खिशांत घालून त्वरेनें जिना उतरून तो खालीं गेला व आतां विरळ होत चाललेल्या गर्दीतून त्यानें वाट काढली. त्या वेळीं त्याच्या मनांत काय विचार चालले होते तें सांगणें कठीण आहे. क्रॉफर्ड मार्केटपाशीं ट्रॅम गांठून तो तींत बसला तेव्हां तो मनाशीं म्हणाला,

" या प्रकारांत गूढ तर खचित आहे—ब्राउनिंगसाहेब खूष होईल—"

---

# प्रकरण २ रें.



## श्रद्धा आणि प्रेम



दुसऱ्या दिवशीं 'मॉर्निंग न्यूज' मध्यें मदीना हॉटेलांतील आगीच्या बातमीचें जें दोन कॉलमी वर्णन प्रसिद्ध झालें त्याच्या शिरोभागीं मोठ्या जाड टाइपांत ओळी होत्या त्या अशाः—

**मदीना हॉटेलमधील आग !**
**आगीचें कारण माहीत नाहीं**
**आगीच्या बुडाशीं गूढ रहस्य !**

शेवटचा मथळा वाचून प्रत्येक वाचक साहजिकपणेंच अतिशय उत्सुकतेनें सबंध मजकूर वाचून काढी, पण तो सगळा वाचल्यावर सूचित गूढ रहस्याबद्दल बातमींत कसलाच अधिक खुलासा नसल्याचें त्याला आढळून येई. त्या बातमींत शेवटीं इतकेंच म्हटलें होतें कीं,

"या आगीचें कारण साधेंसुधें नसून या प्रकाराच्या बुडाशीं कांहीं तरी गूढ रहस्य आहे असा आमच्या खास बातमीदाराचा पक्का तर्क आहे. अर्थात् तें रहस्य काय आहे तें आजच आम्हांला सांगतां येत नाहीं. त्यासंबंधाची साद्यंत माहिती मिळविण्याचे आमचे प्रयत्न चालू आहेत; व आमच्या हातीं पुरेशीं माहिती येतांच व ती प्रसिद्ध करण्यास हरकत नाहीं असें वाटतांच आम्ही ती आमच्या वाचकांस सादर करूं."

या मोघम आश्वासनानें वाचकांची तृप्ति होणें कठीणच होतें; व अतृप्तिवाचक कांहीं उद्गार काढून हातांतला अंक एखाद्या वाचकानें दूर टाकला तर तें साहजिकच होतें.

निदान चौपाटीवरील एका तीन मजली इमारतींत शेवटच्या मजल्यावर एका खोलींत ईझीचेअरवर पडलेल्या एका वाचकानें तरी तसा उद्गार काढला खरा.

" उंः ! माहीत आहे ही वर्तमानपत्री ठराविक गरम थाप !—"

असें म्हणून शेजारच्या बैठ्या तिवईवर त्या वाचकानें मॉर्निंग न्यूजचा अंक टाकून दिला.

या गृहस्थाच्या चेहऱ्याकडे व वर्णाकडे पहातां तो दक्षिणीच नव्हे तर ब्राह्मण असला पाहिजे असें वाटण्यासारखें होतें. पण त्याचा पोषाख, त्याची हालचाल, त्या खोलींतल्या सामानाची मांडणी हीं सारीं अस्सल पाश्चात्य पद्धतीचीं दिसत होतीं. रुंद जांभळ्या पट्टयांच्या कापडाची सैलशी तुमान व कोटवजा खमीस त्याच्या अंगांत होता. पायांत पारशी चालीच्या चपला होत्या. त्यानें नुकतीच दाढी केली होती त्या वेळचा साबणाचा फेंस त्याच्या कानाच्या पाळ्यांत व गळ्यावरहि एकदोन ठिकाणीं दिसत होता. हजामतीच्या वेळीं त्यानें कसलें तरी सुवासिक द्रव्य आपल्या टक्कल पडूं लागलेल्या डोक्यावर शिंपडलें होतें तें खोलीभर दरवळलें होतें, व सत्संगतीनें हिंडलें म्हणजे कोठेंहि प्रवेश मिळतो, हा न्याय ओळखूनच कीं काय त्याच्या हातांतील प्रज्ज्वलित सिगारेटचा दर्पहि त्यांत मिसळला होता. आरामखुर्चीवर पडून ज्या तऱ्हेनें त्यानें डाव्यावर उजवा पाय चढविला होता त्या तऱ्हेवरूनहि या गृहस्थाच्या अंगीं मुरलेले रीतरिवाज ब्राम्हणी नाहींत असें ध्यानांत येण्यासारखें होतें. खोलींत मध्यभागीं मांडलेलें वर्तुलाकार सुबक टेबल, त्यावरील वस्त्र आणि पुष्पपात्रांतील ताजीं, मोहक फुलें, जमिनीवरचा साधा रुजामा व मध्येंच पण योजकतेनें अंथरलेले तीनचार छोटे छोटे गालिचे, आणि समुद्राकडच्या दोन खिडक्यांना लावलेले व वाऱ्यानें झुलणारे साधे पण आकर्षक पडदे—यांवरूनहि त्याची रहाणी पाश्चात्य तऱ्हेची असावी हें उघड होत होतें. प्रकाशाची दिशा साधून एक मोठा चित्रफलक मांडलेला होता, आणि तेथेंच शेजारीं दोन पुरीं झालेलीं चित्रें स्टँडवर मांडलेलीं दिसत होतीं.

आपण एका चित्रकाराच्या घरांत शिरलों आहोंत हें उघडच आहे.

तो पहा तो गृहस्थ मॉर्निंग न्यूजचा अंक ठेवून उठला.

घराच्या आंतल्या भागाकडे जाण्यासाठीं जें दार होतें त्या दारांत जाऊन त्यानें हांक मारली,

" सकीना ! सकीना ऽऽ ! "

दोनतीन खोल्यांपलीकडे व स्नानगृहांत बकेटाचा आवाज होत होता.

" सकीना ऽऽ ! "

एकदम बकेट दूर सरकविल्याचा आवाज झाला, पाण्याची तोटी बंद केली गेली व

" हां हां ऽ ! "

असें स्त्रीचें उत्तर ऐकूं आलें. उत्तरापाठोपाठ ती स्त्रीहि आली.

सकीनाची रूपसंपदा असामान्य होती हें तिला पहातांक्षणीं पटण्यासारखें होतें. ती भरल्या अंगाची व उंच होती. तिचा चेहरा किंचित् लांबट होता, नाक निर्दोष नव्हतें पण त्याची ठेवण मोहक होती, डोळे मध्यम मोठे पण अत्यंत तेजस्वी व पिंगट होते, जिव्हणी अशी होती कीं त्यावरून भोळा व प्रेमळ स्वभाव व्यक्त व्हावा आणि केंस लांब सडक नव्हते पण कुरळे कुरळे होते. स्नानगृहांतून काम ठेवून लगबगीनें आल्यामुळें तिचीं वक्षःस्थलें हालत होतीं, वस्त्रें अर्धवट भिजल्यामुळें कृशकटि रेखून दिसत होती आणि तोंडावरहि पाण्याचे ओघळ ठिबकत होते.

सकीना आली ती कपाळावरचें पाणी पुशीत व हंसत उभी राहिली आणि बोलण्याऐवजीं केवळ आपल्या भुंवयांच्या सहाय्यानें तिनें विचारलें,

" काय ? "

तिचा तो मोहक भाव पाहून गृहस्थ हंसला. त्यानें हात पुढें करून तिच्या गालावरचे थेंब पुसण्यासहि कमी केलें नाहीं व त्यानें तसें करतांना सकीनाहि गोंधळली नाहीं.

तो गृहस्थ म्हणाला,

" सुधीर आतां चहाला यायचा आहे, तुझ्या लक्षांत आहे कीं नाहीं ? "

सकीनाला मराठी चांगलें समजत होतेंसें दिसलें.

तिनें हंसून मान हालविली व म्हटलें,

" ध्यानमें हय तर ! सब कुच तय्यारी राखून दिली हय !--"

तिचें तें मोडकें पण गोड हेल काढल्यानें मौजेचें वाटणारें मराठी बोलणें ऐकून गृहस्थ हंसला, व तिच्या खांद्यावर चापट मारून म्हणाला,

" ठीक, ठीक."

" कब येईल सुधीरचंद्र ? "

" इतक्यांत येईल."

" तो मुझे छोडो ! " झटकन वळून सकीना म्हणाली, " इश्नान करूंगी, और––"

ती लगबगीनें गेली व न्हाणीघरांत शिरली त्यामुळें तिचे बाकीचे शब्द ऐकूं आले नाहींत.

तो गृहस्थ दारांतून दूर झाला. संपलेली सिगारेट बैठ्या तिवईवरच्या पितळी बशींत टाकून त्यानें दुसरी सिगारेट पेटवून घेतली, व शेजारच्या खुर्चीवर उजवें पाऊल ठेवून व त्या पायाच्या उंच झालेल्या मांडीवर हाताचें कोंपर टेकून सिगारेट ओढीत कामासाठीं लावून ठेवलेल्या चित्रफलकाकडे निरखून पहात तो उभा राहिला. स्वनिर्मित कलावस्तूकडे सावकासपणें पहात राहिलें कीं जो आनंद कलावन्ताला होतो तो त्या वेळीं त्याच्या चेहेऱ्यावर दिसत होता.

असा तो किती वेळ उभा राहिला असता कोण जाणे, पण थोड्या वेळानें दारावरची घंटा वाजली त्यामुळें तो पायांतल्या सपाता फरफर वाजवीत दाराकडे लगबगीनें गेला.

त्यानें दार उघडलें व सुधीरला पहातांच त्याच्या खांद्यावर अत्यंत प्रेमभरानें हात ठेवून म्हटलें,

" तुझीच वाट पहात होतों. "

सुधीर आंत आला तो खुर्चीवर न बसतां चित्रफलकासमोर उभा राहिला व चित्राकडे सूक्ष्म व प्रमुदित दृष्टीनें कांहीं वेळ पाहून त्यानें विचारलें,

" हें नवं चित्र केव्हां आंखलंत, काका ? "

" बरं आहे ना ?––"

" वा !––"

असें उद्गारून सुधीर पुन्हां किती तरी वेळ चित्राकडे पहात राहिला. त्यानें चित्रावरील दृष्टि काढून आपल्या चुलत्याकडे पाहिलें त्या वेळीं अनेक गंभीर विचारांचा घोळका मनांत जमल्याप्रमाणें त्याचा चेहरा झाला होता. एकदम

" काका––केशवकाका––"

येवढाच तुटक उद्गार काढून तो स्तब्ध उभा राहिला.

खूप बोलायचें असावें पण न बोललेलेंच बरें असें वाटून माणसानें स्तब्धता स्वीकारावी तशी त्याची ती स्तब्धता भासली.

केशवकाकांना त्याची ती मुद्रा चमत्कारिक वाटली. त्यांनीं विचारलें,

" कां ? चित्रांतली कल्पना तुला पटली नाहीं कीं काय ?--"

" छे ! तसं कुठलं ?--" सुधीर मान हालवून म्हणाला,

" पण काका, चित्र पहातांना चित्रापेक्षां तुम्हांलाच पहातों आहेंसं मला सारखं वाटत होतं, अन् चित्राकडे निरखून पहातां पहातां तुम्ही अन् आमचे दादा यांच्यांतला विरोध इतक्या तीव्रतेनं माझ्या मनांत आला !--फारच ! या चित्रांतल्या प्रत्येक रंगलहरींत अन् प्रत्यक रेषेंत तुमच्या अंगची स्वतंत्रता, निर्भयता अन् अभिनवप्रीति मला स्पष्ट दिसते. जुन्या संस्कृतीपुढं केवळ ती जुनी म्हणून मान वांकवण्याऐवजीं नवी संस्कृति निर्माण करण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीला कां नसावा, हा तुमचा नेहमींचा धीट प्रश्न मला या चित्रांत ठिकठिकाणीं दिसतो अन् मग आमच्या दादांचा जुन्या संस्कृतीबद्दलचा जबरदस्त अभिमान मनांत येऊन वाटतं--"

" हः हः ! " असें किंचित् हंसून केशवकाका म्हणाले, " अरे आम्ही दोघं भाऊ साऱ्या जगालाच कोडं होऊन बसलों आहोंत. जाऊं दे तें. ये, बैस इथं."

केशवकाकांनीं सुधीरला बसविलें व मघांप्रमाणेंच लांब हेल काढून हांक मारली.

" सकीऽनाऽऽ ! "

" हां हां ऽऽ ! " ठराविक गोड हेल काढून आंतून सकीनानें उत्तर दिलें व लागोलाग ती जी बाहेर आली ती कपबशांच्या दोन जोड्या, बऱ्याचशा सुट्या बशा, चमचे, काटे, परीटघडीचे टॉवेल असें भाराभर सामान एका मोठ्या थाळींत भरून घेऊन आली. दिवाणखान्यांत पाय टाकतांच तिनें सुधीरकडे कटाक्ष फेकला व हास्य करीत म्हटलें,

" क्यं ? अच्छे हो ? "

सुधीरनें हास्य करून मान हालविली तेव्हां ती अधिकच हंसली. मग तिनें केशवकाका व सुधीर ज्या कोचावर बसले होते त्याच्यापुढें एक छोटें, ठेंगणें टेबल आणून ठेवलें आणि त्यावर स्वच्छ वस्त्र घालून थाळींतल्या कप-बशा वगैरे सामान व्यवस्थित मांडण्यास प्रारंभ केला.

त्या वेळच्या तिच्या हालचालींत इतकें मोहक चापल्य भरलें होतें कीं केशव-काकांच्या समोर असें बघणें बरें कीं नाहीं याचें भानहि न राहून सुधीर अंमळ तिच्याकडे पहातच राहिला. चित्रफलकावरील चित्रांत नारळीच्या बनांतून वहात

जाणाऱ्या एका निर्झरावर स्नान करून केंस पुशीत उभी राहिलेली जी स्त्री त्याच्या काकांनीं रंगविलेली त्यानें नुक्तीच निरखून पाहिली होती ती सकीनाचीच प्रतिमा होती हें त्याला माहीत होतें. त्या चित्रांत किंचित् अंतर्दृष्टि होऊन ती स्थिर उभी होती. आतां समोर तिची सारखी लगबग चालली होती. त्या स्थिरतेंत व या घाईत, दोहोंतहि लालित्य होतें. सकीनाकडे पहातां पहातां लालित्याच्या त्या दोन प्रकारांची तुलना केल्याशिवाय सुधीरचें मन राहिलें नाहीं.

शेवटीं टेबलावरची मांडामांड पुरी करून सकीना जेव्हां लगबगीनें आंत गेली तेव्हां त्याच्या मनाचा तो चाळा संपला. आपण सकीनाकडे इतकें निरखून पहात होतों तें काकांनीं पाहिलें कीं काय अशी शंका त्याला आतां आली. त्यानें झटकन केशवकाकांकडे पाहिलें. ते स्टँडवरील आपल्या चित्राकडे निरखून पहात होते.

मानेच्या खुणेनें चित्रांतील वनश्रीचा निर्देश करून ते सुधीरला म्हणाले,

"इतकी रम्य वनश्री आहे या प्रांतांतली! सुधीर, पश्चिम किनाऱ्यावरचा धेनुकुंजाच्या आसपासचा प्रदेश तूं अवश्य पाह्यला पाहिजेस. मी तिकडे जाऊन बरींच वॉटरकलर्स केलीं खरीं. पण माझं समाधान अजून झालं नाहीं. तिकडच्या त्या वनश्रींत अपार शोभा तर आहेच. पण जुन्या इतिहासांतलीं अनेक रहस्यं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेला एखादा वृद्ध असला म्हणजे त्याच्या मुद्रेवर जसं एक प्रकारचं गांभीर्य दिसतं आणि कोणातरी जिज्ञासूला तीं रहस्यं सांगावीं अशा उत्कंठेनं जसे त्याचे ओंठ थरथरत असल्यासारखे दिसतात तसाच भास त्या प्रदेशांतलीं वनश्रीचीं स्थलं पाहिलीं कीं होतो. त्या वनश्रींतला हा अभिप्राय माझ्या चित्रांत मला आणतां आला नाहीं. च्! कठीण आहे तें काम!—अन् कठीण आहे म्हणूनच तें केल्याशिवाय मनाला चैन पडायचं नाहीं!—"

असें म्हणतां म्हणतां काकांनीं सुधीरकडे पाहून हास्य केलें. त्यांचें तें बोलणें जवळ जवळ आत्मगतच होतें हें सुधीरला सहज कळण्यासारखें होतें, व म्हणून कांहीं उत्तर करण्याऐवजीं तो नुसता उलट हंसला.

काका कांहीं वेळ स्तब्ध राहिले व मग एकदम तोंडांतली सिगारेट दूर करून म्हणाले,

"मी पुन्हां जाणार आहें त्या बाजूला. तूं येतोस का माझ्याबरोबर?"

सुधीर कांहीं बोलला नाहीं.

" काय ?—येत असलास तर चल."

" काका " किंचित् गंभीर होऊन सुधीर म्हणाला,

" तुम्हीं असं कांहीं विचारलंत कीं माझ्या जिवाची काय त्रेधा होते तुम्हांला कल्पना नाहीं. माझ्या स्वभावांत परस्परविरोधी भावांची मोठी गुंतागुंत होऊन गेली आहे. ललितकलांची इतकी विलक्षण गोडी माझ्या स्वभावांत आहे कीं, तुमच्याकडं असं येऊन बसलं अन् तुमच्या हातचीं चित्रं पाहिलीं कीं वाटतं, तुम्ही जाल तिकडे तुमच्याबरोबर हिंडावं अन् तुमच्याबरोबर निसर्गसौंदर्याचा उपभोग घेत आणि तुमची कलाकुसर सारखी पहाण्याचा आनंद अनुभवित सारं आयुष्य खुशाल घालवावं ! पण उलट—"

सुधीर बोलतां बोलतां जरा थांबला व मग म्हणाला, " दादांच्यावर माझी अपार भक्ति आहे, त्यांना सुख देणं ही माझ्या जीविताची इतिकर्तव्यता मी समजतों—अन् त्यांना तर कलासक्त आयुष्याचा अगदीं तिटकारा, जुन्या संस्कृतीचा विलक्षण अभिमान !—मी चळेन कीं काय अशी त्यांना नेहमीं चिंता !—"

पण पुढें तसेंच बोलणें बरें नव्हे असें जणुं त्या क्षणीं त्यांच्या मनांत आलें. तो एकदम थांबला; व पायवाट सोडून मन मानेल तशी वाट काढणाऱ्यानें ' नको ! आपली मळलेली पायवाटच बरी ! ' अशा विचारानें परत पायवाटेला मिळावें तद्वत् संभाषणाला मिळालेलें गंभीर वळण बदलण्यासाठीं तो म्हणाला,

" तें असो.—काका, तुम्ही मला प्रेमानं बोलावतां, पण जमायचं कसं माझं येणं ? ब्राउनिंगसाहेबाची माझ्यावरची मर्जी म्हणजे एक मोठी अडचणच होऊन बसली आहे. तो मला दोन दिवसांचीसुद्धां रजा द्यायला तयार नसतो ! तुम्हांला माहीतच आहे. "

असें म्हणून सुधीर मोठ्यानें हंसला.

शेतांतल्या कणसांवर बसूं पहाणारीं पांखरें उठवण्यासाठीं शेतकऱ्यानें हांक द्यावी त्याप्रमाणें संभाषणावर आलेली गंभीर छटा पुरी घालवण्यासाठीं त्यानें तें हास्य केलें होतें.

काका तें मनांत समजले व हंसले.

तितक्यांत आंत गेलेली सकीना खाण्याचे पदार्थ व चहा घेऊन बाहेर आली. तिनें चहाची किटली टेबलावर ठेवली, आणि खावयाचे पदार्थ काकांच्या व

सुधीरच्या बशांत ती वाढूं लागली. त्या पदार्थांची गर्दी पाहून सुधीर सकीनाला म्हणाला,

" बाई ! तुमच्याकडं मी चहाला आलों, जेवायला नाहीं ! "

सुधीर तिला 'बाई' अशी हांक मारी त्याची सकीनाला मोठी गंमत वाटे. ती हंसली व आपल्या भुंवयांना अढी घालून आणि ओठ चेष्टेदाखल जुळवून म्हणाली,

" ये खाना हय ?—इस्को तो हम छोटा हजरी बोलते ! "

यावर सगळींच जणें हंसलीं, व काका सुधीरला म्हणाले,

" अन् या छोट्या हजिरींतला सकीनाच्या हातचा सर्वांत स्वादिष्ट पदार्थ तूं खाल्ला नाहींस तर व्यर्थ तुझा जन्म असं मी म्हणेन !—"

काकांचा अभिप्राय सुधीरच्या लक्षांत यावयास वेळ लागला नाहीं. केव्हांहि तो आला कीं एखादा निषिद्ध पदार्थ खाण्याविषयीं काकांनीं त्याला चेष्टेनें सुचवावें व त्यानें नाकारिलें कीं त्याची थट्टा करावी हें ठरलेलें होतें. म्हणून तो म्हणाला,

" असूं दे व्यर्थ जन्म आमचा !—आपल्याला नको बुवा ! "

तें बोलण्याच्या वेळचे त्याचे हातवारे पाहून काका मनापासून हंसले. एका बशींतली कांहींशी वस्तु कांट्यानें टोंचून उचलून दाखवीत ते म्हणाले,

" वेडा आहेस. बघ तरी चव. अरे, सुंदर बायकांनीं कांहीं पाकसिद्धि करावी अन् ती आपण टाकावी यांत त्यांचा केवढा अपमान आहे !—नाहीं सकीना ? "

काकांची कोटि सकीनाला अर्धवट कळली. पण हंसून दुजोरा देण्याऐवजीं उलट किंचित् गंभीर चर्या करून ती म्हणाली,

" पण तेंच खाण्यांत काय आहे मोठं ? सुधीरना चालतील असे पदार्थहि मीं कांहीं कमी चमचमीत केले नाहींत. नका त्यांना आग्रह करूं ! "

" पहा, बाई माझ्या बाजूच्या आहेत." सुधीर म्हणाला.

" मूर्ख आहे ती ! " सकीनाकडे तिरप्या नजरेनें पाहून काका म्हणाले, व मग कांट्यानें उचललेली वस्तु तोंडांत घालून तिचें चर्वण करतां करतां ते पुढें म्हणाले,

" काय गंमत आहे पहा. ही स्वतः हें खाते, पण तें तुला तुझं मन मोडून खाऊं घालायचा तिला धीर नाहीं. लोकांच्या भावना तर्कानं दुखवायला आम्ही

पुरुष चट्दिशीं तयार होतों. पण उलट, दुसऱ्याच्या भावना फुलासारख्या झेलण्यासाठींच जणुं बायकांचा जन्म आहे. स्त्री ही अजब वस्तु आहे!"

काकांच्या तोंडून सहज निघालेले ते उद्गार सुधीरला फारच मार्मिक वाटले. स्वतः काकांना त्यांचें कांहींच वाटलें नाहीं. पुढची बशी रिकामी करण्यांत त्यांचें सारें लक्ष गुंतलें होतें. वर नजर करून सुधीरनें सकीनाकडे पाहिलें तों "ऐकलंत ना स्वारीचं तत्त्वज्ञान!" अशा अभिप्रायानें तिनें त्याच्याकडे व काकांकडे पहात मान वेळावली.

सुधीर हंसला. थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं.

पण मग मद्यांच्या विषयावर पुन्हां येऊन काका म्हणाले,

"अन् हें न खाण्याच्या आग्रहांत तुझी नुसती चवीची शंका असती किनई तर या सकीनाचं न ऐकतां मीं तुला जबरदस्तीनं खायला लावलं असतं, अन् तुझ्याकडनं कबूली घेतली असती कीं स्वादाची खरी मिजास कुठं असेल तर ती या असल्या पक्वान्नांत आहे. पण तुझ्या सोंवळेपणाचं कारण अगदींच निराळं पडलं. असं कांहीं खाणं तूं खाल्लंस तर दादांच्या भावनांशीं बेइमानी केल्यासारखं होईल ही तुझी श्रद्धा! त्या श्रद्धेनं तूं धूम्रपानसुद्धां करीत नाहींस! तुझी पितृभक्ति ढळविण्याचा मलासुद्धां धीर व्हायचा नाहीं! तुझ्याकडे पाहिलं कीं दादाचा मला हेवा वाटतो. तूं माझा मुलगा असायला पाहिजे होतास!—"

वडील माणसें आपली प्रशंसा करूं लागलीं कीं आपण दृष्टि खालीं लावावी ही शालीनता सुधीरच्या अंगीं मुरलेली होती. वर न पहातां तो म्हणाला,

"तुम्ही माझ्यावर पोटच्या मुलासारखं प्रेम करतांच आहांत कीं, काका!"

"अन् तूंहि मोठा लाघट आहेस!" काका म्हणाले; "पण तुला माझ्यावर प्रेम करायचं तें चोरून करावं लागतं ना? दादाला खपायचं नाहीं तें! आज इथं येऊन चहा घेतलास हें त्याला सांगायची छाती आहे कां तुझी?"

"विचारलंच तर मी खरं तेंच सांगेन; पण आपण होऊन सांगायची सोय नाहीं."

"मला तो रक्तपिती रोगी समजतो ना?" असें विचारून काका मनासून हंसले.

सुधीरनें नुसतें त्यांच्याकडे पाहिलें. त्यांच्या तोंडचा 'रक्तपिती' हा शब्द त्याला अगदीं कर्णकटु वाटला.

काकांचा व सकीनाचा निरोप घेऊन तो निघाला व त्या इमारतीचे जिने उतरूं लागला तरी तो कटु शब्द त्याच्या कानांत घुटमळत होता. आणि त्या शब्दाचा विसर करणें त्याला कठीण वाटलें. कारण तो अत्यंत समर्पक होता. त्याच्या वडिलांना केशवकाकांविषयीं खरोखरच इतका किळस वाटे व तो ते उघड उघड दाखवीत हें त्याला माहीत होतें. आणि दादांच्या या विलक्षण तिटकाऱ्याचें कारण काय तर केशवकाका जुनी संस्कृति मानीत नव्हते, खाण्या-पिण्यांत त्यांनीं निर्बंध ठेवला नव्हता, लग्न न करतां ते राहिले होते, आणि गेल्या दोन वर्षांपासून तर एक मुसलमानीण त्यांनीं खुशाल घरांत आणून ठेवली होती! केशवकाकांचे हे अपराध त्याच्या दादांच्या दृष्टीनें इतके भयंकर होते कीं काकांच्या स्वभावांतील माधुर्य कबूल करायला ते तयार नव्हते; काकांच्या अलौकिक बुद्धीचें त्यांना कौतुक वाटत नसे; मोठमोठ्या प्रदर्शनांत काकांचीं चित्रें सर्वोत्कृष्ट ठरलीं असें ऐकूनहि " हंः! चुलींत घाला तीं चित्रं! " असे उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडत.

अत्यंत भिन्न वृत्तीचे हे दोघे भाऊ एकाच मातेच्या दुधावर कसे वाढले असें सुधीरला नेहमीं आश्चर्य वाटे, व त्या दोघांबद्दल विचार करूं लागतांच त्याचें मन नेहमीं गोंधळून जाई. वडिलांविषयीं त्याच्या मनांत पराकाष्ठेची श्रद्धा होती; आणि काकांविषयीं त्याला अमर्याद प्रेम वाटे. श्रद्धा व प्रेम यांचें तुमुल युद्ध आपल्या अंतःकरणांत चाललें आहे असा स्पष्ट अनुभव त्याला अनेक वेळां येई. श्रद्धा व प्रेम या दोन शक्ति आपल्या जीविताची ओढाताण करीत आहेत असें त्याला वाटे व त्याचें मन बावरून जाई.

अशा बावरलेल्या मनःस्थितींतच तो त्या इमारतींतून बाहेर पडला. समोरून समुद्रावरच्या ताज्या वाऱ्याचा फवारा त्याच्या अंगावरून गेला तेव्हां त्याला जरा बरें वाटलें. त्यानें घड्याळांत पाहिलें तो साडेनऊ झाले होते. त्याबरोबर त्यानें झपझप पावलें टाकण्यास प्रारंभ केला. त्याला ऑफिसांत अकराला हजर व्हायचें होतें!

# प्रकरण ३ रें

## दादांचें चुकतें कीं बरोबर आहे ?



बईंत मरीन लाइन्स नांवाचा जो वस्तीचा भाग आहे तो अतिशय शान्त आहे. सैन्यांतील मोठमोठ्या कामदारांचे आणि इतर धनिक लोकांचे बंगले त्या बाजूला आहेत. सगळे बंगले भव्य आणि विस्तीर्ण असून एकमेकांशीं आढ्यतेनें वागणाऱ्या धनिकाप्रमाणें ते एकमेकांपासून बऱ्याच अंतरावर आहेत. ख्रिश्चन ऑर्फनेज नांवाची अनाथ लोकांचें संगोपन करणारी जी ख्रिस्ती संस्था आहे ती याच ओळींतल्या एका बंगल्यांत आहे. बंगल्यापुढें मोठी बाग आहे व बंगल्याच्या फाटकावर कमानीसारखी पाटी असून तिच्यावर संस्थेच्या नांवाचीं अक्षरें आहेत.

ही पाटी पहातांच सुधीरनें आपली गाडी थांबविली, खालीं उतरून गाडीवाल्याचे पैसे चुकते केले आणि आंत शिरून अगाशीखालच्या मुख्य दारापर्यंत जाऊन तेथील दरवानास विचारलें,

" मिस् पॅटिसन भेटतील काय ? त्याच इथल्या सुपरिंटेंडंट आहेत ना ? "

" व्हय. पेटिछनबाईच सुप्रेंट हय. भेटल."

असें उत्तर देतांना त्या दरवानानें प्रथम सुधीरला सफाईनें सलाम केला. मिस् पॅटिसन व सुपरिंटेंडंट या शब्दांचे त्यानें जे आपल्या सोयीप्रमाणें अपभ्रंश केले त्यावरून तो कोणी तरी बाटलेला महार असावा असें सुधीरला वाटलें. त्याच्या अपभ्रंशाइतकीच इंग्लिश बायकांची नोकरी केल्यामुळें त्याच्या अंगीं आलेल्या शिष्ट रिवाजांबद्दलच्या ततपरतेची सुधीरला गंमत वाटली. त्यानें विचारलें,

" भेटेल ? "

" व्हय. हपीसांतच असल. तो दादर चढून डाव्या अंगच्या खोलींत जा."

" ठीक. थँक्स ! "

दरवान पुन्हां सलाम करण्यास चुकला नाहीं.

त्यानें सांगितल्याप्रमाणें मिस् पॅटिसन खरोखरच ऑफिसांत काम करीत बसली होती. सुधीर आलेला पहातांच तिनें त्यास खुर्ची दर्शवली. खुर्चीवर बसतां बसतां सुधीर इंग्रजींत म्हणाला,

“ बाहेर हवा काय सुबक पडली आहे ! अशाहि वेळीं आपणांस काम करावं लागत आहे हें पाहून मला आपल्याबद्दल सहानुभूति वाटते.”

सुधीरचें तें मार्मिक बोलणें ऐकून मिस् पॅटिसन किंचित् हंसली व म्हणाली,

“ छे छे ! सहानुभूति कशाला ? मला स्वभावतः कामाची आवडच फार आहे. फिरायला जाण्यापेक्षां इथं कामांत गढलेलं असण्यांत मला चैन वाटते. बरं, तें असो. काय काम आहे आपलं ? ”

सुधीरनें आपल्या नांवाचें छापील कार्ड तिच्या हातीं दिलें व म्हटलें,

“ मेरी नांवाची मुलगी आपल्या संस्थेंत आहे ना ? तिची भेट घ्यायची आहे मला. ”

“ मेरी ? तिला भेटायचं आहे ! ” सुधीरच्या नांवाचें कार्ड टेबलावर वाजवीत मिस् पॅटिसन म्हणाली, “ पण या वेळीं साऱ्या मुलींना फिरायला नेलेलं असणार !—अं—त्यांतून ती खोलींत आहे कीं काय मी पहातें हं—तुम्ही बसा. आलेंच मी. ”

असें म्हणून ती उठली व गेली. आपल्या कामासाठीं आपण या बाईला अशी तसदी देणें प्रशस्त नव्हे असें वाटून सुधीर “ नको ! आपण कशाला जातां ? ” असें कांहींसें पुटपुटला. पण “ त्यांत काय मोठं ! ” असें कांहींसें म्हणत मिस् पॅटिसन जी लगबगीनें उठली ती गेलीच. ती व्हरांड्यांतून बरीच दूरवर गेली असावी. कारण फरशीवर तिच्या बुटांचा होणारा खाड्खाड् आवाज कमी कमी होऊन शेवटीं सुधीरला ऐकूं येईनासा झाला. मग खोलींतील तसबिरी, नकाशे, संस्मरणीय वचनांच्या छापील पाट्या वगैरे न्याहाळीत वाट पहात तो बसला.

पॅटिसनबाई आंत आलेली पहातांच मेरी आपल्या खुर्चीवरून उठली खरी; पण एखादें दुःखी कष्टी माणूस जसें सावकाशीनें व जडपणें उठतें तशी ती उठली. तिचा चेहराहि अगदीं मलिन दिसला. पॅटिसन म्हणाली,

“ म्हणजे ? मेरी, वेडे तूं आतां किती खेद करणार ? फिरायला गेली असतीस तर तुला बरं वाटलं असतं. ”

" माफ करा. पण मला बाहेर तोंड काढावंसंच वाटत नाहीं म्हणून मास्तरीण-बाईची परवानगी घेऊन राहिलें."

हें बोलतां बोलतांहि आंतली दुःखाची उर्मि दाबल्याप्रमाणें मेरीनें उजवा हात डाव्यावर चोळवटला व तिच्या पापण्यांची भराभर उघडझांक झाली.

मिस् पॅटिसनच्या तें लक्षांत आलें व तिच्या खांद्यावर हात ठेवीत ती म्हणाली,

" मदीना हॉटेलच्या आगींत सांपडलेला इसम कांहीं तुझा नातेवाईक नव्हता ना ?—मग त्याच्यासाठीं इतकं दुःख तुला होतं ? शिवाय, तूं आपल्या कर्तव्यांत कसूर केली नाहींस. प्रेताचा ताबा तूं घेतलास, दफनविधीची व्यवस्था तूं करविलीस—झालं. त्या माणसाच्या मरणाबद्दल तूं आतां किती शोक करणार ? मन आवर."

" मी मन आवरतेंच आहें. पण तो इसम माझा नातलग नसला तरी माझ्या मुलखांतला होता. मी इकडे पळून येण्यापूर्वीं मुलखांत होतें तेव्हां त्यानं पोटच्या पोरीप्रमाणं माझ्यावर ममता केली होती; अन् तो किंवा माझ्या मुलाखांतला कोणी माणूस मला पुन्हां भेटेल हें स्वप्नींहि नसतांना त्याची माझी दोन दिवसांपूर्वीं अकस्मात् दृष्टादृष्ट होऊन भेट झाल्यामुळं मला इतका आनंद झाला होता—कीं सांगतां येत नाहीं ! माझा तो आनंद जसा अकल्पित उत्पन्न झाला तसाच एकदम नष्ट झाला याचा भारी खेद होतो. अन् बाई, प्रेताची पहाणी झाली तेव्हां काय उघडकीस आलं तुम्हांला माहीत आहे ना ?"

" हो, मीं ऐकलं. त्याच्या उजव्या कुशींत मोठी जखम असावी असा कॉरोनर मंडळींचा संशय होता—हेंच ना ? पण हे सारे तर्क ! आगींत सांपडून त्याचं शरीर मुळीं दहा ठिकाणीं जळून विद्रूप झालं होतं ना ? मग ? ते सारे तर्क !"

" नाहीं, नाहीं. तर्क नाहीं. आमच्या मुलखांतलीं माणसं तुम्हांला माहीत नाहींत म्हणून तुम्ही तर्क म्हणतां. त्याच्या मरणापेक्षां त्या मरणाच्या तऱ्हेचं मला अधिक दुःख होत आहे—"

हें बोलतां बोलतां तिनें उसासा टाकला. इतका वेळ कोंडून ठेवलेलें आंसवांचें पाणी तिच्या डोळ्यांतून टचकन् फुटलें.

मिस् पॅटिसननें चटकन् आपल्या रुमालानें तिचीं आसवें पुसलीं व म्हटलें,

" दुःख झालं तरी तें शक्य तितकं मनावेगळं कर. शोक हा केव्हांहि दुबळेपणाच. "

" तुमच्या बोलण्यानं माझं दुःख किती हलकं झालं. पण तुम्ही आत्तां माझ्याकडे कशा आलांत ? "

" हो, तें राहिलंच. एक हिंदु गृहस्थ तुला भेटायला आलेला आहे. "

" मला ? "

" हं. तिकडे ऑफिसांत चल. "

मेरीनें डोळे पुसले व ती पॅटिसनबरोबर गेली.

ती ऑफिसांत येऊन समोर उभी राहिली तेव्हां सुधीर क्षणभर विस्मयानें तिच्याकडे पहात राहिला. कां कोण जाणे त्यानें तिचें जें चित्र मनाशीं रंगविलें होतें त्यासारखी ती नव्हती. ती वयानें मोठी असेल अशी त्याची कल्पना होती. पण पाहतो तों ती विशीच्या सुमाराचीच होती. ती वर्णानें जरी बरीच काळी होती तरी तिच्या चेहेऱ्याच्या ठेवणींत आकर्षकपणा होता. तिच्या दृष्टींत एक प्रकारचा असा कांहीं भाव होता कीं पहाणाराला जणूं ती आपले हात धरून आपल्याला विनवीत आहे असा स्पष्ट भास व्हावा. या वेळीं तर तिनें नुकतींच डोळ्यांतील आंसवें पुसलीं असल्याकारणानें तिच्या मुद्रेवरील हा भाव अधिकच स्पष्ट झाला होता.

मेरीकडे क्षणभरांत निरखून पाहून सुधीर पॅटिसनबाईस म्हणाला,

" मला यांच्याशीं एकट्याशींच कांहीं बोलायचं आहे. "

पॅटिसन म्हणाली,

" असं ? मग त्या तिथं अगाशीवर जा तुम्ही दोघं. "

अगाशीवर पोंचल्याबरोबर सुधीर म्हणाला,

" परिचय नसतांना मी तुमची अशी भेट घेत आहें याबद्दल क्षमा करा. पण मदीना हॉटेलमधील आगींत जो दगावला त्या हसन नांवाच्या गृहस्थाबद्दल तुम्हांला कांहीं—"

" तुम्ही कुठल्या तरी वर्तमानपत्रांतले आहांत तर ! संकटच आलं हें माझ्यावर ! तुम्ही अधिक न बोलतां इथून जावं हें बरं—"

" अशा एकदम कां त्रासतां ? " किंचित् हंसून सुधीरनें म्हटलें, " तुम्हांला

नसलं कांहीं सांगायचं तर नका सांगू. पण मला एक वस्तु सांपडली आहे ती तुमची आहे कीं काय येवढं तरी पहातां कां ? "

मेरी जावयासाठीं अर्धवट वळली होती ती जागच्याजागीं थांबली, व कुतूहलाची अढी तिच्या भुंवयांवर चढली.

आगीच्या ठिकाणीं सांपडलेलें मखमलीचें जुगदान खिशांतून काढून सुधीरनें विचारलें,

" हें तुमचंच काय ? "

जुगदान पहातांच मेरी चपापली व हात पुढें करून तें घेण्याचा आविर्भाव करीत म्हणाली,

" माझंच तर. थँक्स ! हें मीं कुठं विसरलें तें मला कांहीं केल्या आठवत नव्हतं. कुठं सांपडलं तुम्हांला ? "

" आतां तुमची जिज्ञासा पुरी करायच्याऐवजीं मी तुमच्यावर रागावलों अन् त्रासलों तर तुम्हांला कसं वाटेल ? "

सुधीरच्या या प्रश्नानें मेरी विरमली. आपली चूक कोणी गमतीनें पटवून दिली कीं माणसास हंसू येतें तसें तिला आलें. तें तिनें लपविलें नाहीं व ती म्हणाली,

" बरं, मी तुमची जिज्ञासा शक्य तितकी पुरी करीन. हें तुमच्या हातीं कसं आलं सांगा. "

कव्यारीच्या घराचा यत्किंचित्‌हि उल्लेख न करतां त्या जुगदानाची हकीकत सुधीरनें सांगितली व मग विचारलें,

" 'तुमचं नांव मेरी, अन् या जुगदानावर तर मरियम् असं नांव आहे ? "

" दोन्ही माझींच नांवं आहेत. मी या अनाथाश्रमांत आल्यापासून मेरी झालें. पूर्वी—माझ्या मुलखांत—माझं—नांव—मरियम् होतं—"

शेवटचे शब्द ती अगदीं थांबत तुटकपणें बोलली, आणि ते उच्चारतांना पूर्वकाळच्या खेदकारक आठवणी उचंबळून आल्याप्रमाणें तिचें वक्षस्थळ हाललें व पापण्यांची उघडझांक झाली.

सुधीरनें विचालें,

" तुमचा मुलुख कोणता ? "

तिनें तो प्रश्न ऐकला. पण ती आपल्याच विचारांच्या तंद्रींत होती व त्या तंद्रींतून बाहेर पडणें तिला कठीण होतें असें दिसलें. ती इतकेंच म्हणाली,

" कशाला हवं तुम्हांला त्या अभागी मुलखाचं नांव ? आतां अधिक नका मला कांहीं विचारूं."

" पण हसनची तुम्हांला काय माहिती आहे तें तुम्हीं अजून सांगितलंच नाहीं."

" तो माझ्या मुलखांतला, त्यामुळं त्याची माझी फार जुनी ओळख. इतकंच, दुसरं काय ? "

सुधीर किंचित् हंसला व म्हणाला,

" तुम्हीं कितीहि उडवाउडवी केलीत तरी तुम्हांला त्या गृहस्थाची बरीच माहिती असली पाहिजे ही माझी समजूत जायची नाहीं. तुमच्या माझ्या या पहिल्या भेटींत मला यापेक्षां अधिक तसदी तुम्हांला देतां येत नाहीं. तुमचा मी अधिक परिचय करून घेईन अन् मगच विचारीन. आतां मी जातों. उद्यां चार वाजतां भेटाल ? येऊं ? अच्छा. आत्तांच्या तसदीबद्दल माफ करा अं ! गुड नाइट."

दुसऱ्या दिवशीं चार वाजतां परत मेरीच्या भेटीला येण्याचा विचार करीत सुधीर ऑर्फनेजमधून बाहेर पडला खरा, पण दुसऱ्या दिवशीं तर नाहींच पण त्यानंतर दहाबारा दिवस त्याला ती गोष्ट करतां आली नाहीं; आणि मग तो ऑर्फनेजमध्यें गेला तेव्हां पॅटिसनबाईकडून त्याला कळलें कीं ऑर्फनेजच्या कामासाठीं तिला फिरतीवर धाडण्यांत आलें होतें व ती महिना दीड महिना परत येणार नव्हती.

सुधीरचे बेत पार न पडण्यास कारण झालें तें हें.

त्या दिवशीं ऑर्फनेजमधून निघून तो जो घरीं आला तों त्याच्या आईला सपाटून ताप भरला होता.

सदाशिव गल्लींच्या कोपऱ्यावरच्या छोट्या बंगलींत शिरून त्यानें घरांत पाऊल टाकलें तेव्हां या प्रकाराची त्याला कांहींच कल्पना झाली नाहीं. शंभुरावांकडे नित्याप्रमाणें सात आठ समवयस्क मंडळी आली होती व रोजच्याप्रमाणें त्यांची कोठल्याशा उपनिषदावर चर्चा चालली होती. तेथून झटकन् आंतल्या खोलींत जायचें व पुढची खोली ओलांडून स्वयंपाक घरांत डोकावून, " आई ! " अशी हांक मारून हास्यमुखानें आईची दृष्टिभेट घ्यायची हा सुधीरचा रोजचा परिपाठ होता. त्याप्रमाणें तो आजहि दादांच्या खोलींतून बूट वाजणार नाहींत अशा बेतानें झटकला. तेवढ्यांत—

" पण दादासाहेब, आत्मा ब्रह्मरूप आहे म्हटल्यावर " जगन्मिथ्या "ची संगति कशी लागायची ?—अं ? आत्मा जर सत्यस्वरूप आहे तर मिथ्या जें जग त्या जगाचा अन् त्याचा संबंध तरी कां यावा ?—अं ?—"

असें त्या मंडळींतल्या एकानें विचारलेलें त्याच्या कानांवर आलें.

त्यावर त्याच्या दादांनीं " अहो, हें नीट ऐका ना " असें म्हणून एक संस्कृत सूत्र वाचल्याचें त्यानें ऐकलें, व दामूअण्णा नांवाचे गृहस्थ घोगऱ्या आवाजांत म्हणाले,

" ह्यः ह्यः ! आतां काय करावं तुमच्या या खुळ्या शंकेला विसूभाऊ ? अहो, तुम्हांला जी विसंगति वाटते आहे ती विसंगति नाहीं ! हेंच तर आमच्या वेदान्ताचं वैशिष्टय आहे ! अहो महाराज, आत्मा ज्ञानरूप आहे खरा, पण बेटा परमेश्वरानं पसरलेल्या मायेंत सांपडला आहे ना ! म्हणून ही जगाची अन् संसाराची अन् साऱ्याची मजा उडून राहिली आहे ! ही तर आमच्या हिंदुधर्मांत बहार आहे ! ह्यः ह्यः ह्यः—"

हिंदुधर्मांतली ही बहार सुधीरला नीटशी कळली नाहीं. किंबहुना तो जेव्हां जेव्हां त्याबद्दल शान्तपणें विचार करी तेव्हां तेव्हां हिंदुधर्मांबद्दल लोकांच्या कल्पना तरी काय आहेत असा त्याला भ्रम पडे. मग आतां त्याचें नीटसें लक्ष नसतांना तो सगळाच विषय त्याला न पटण्यासारखा वाटला तर नवल नाहीं.

आणि त्यानें नित्याप्रमाणें स्वयंपाकघरांत डोकावून पाहिलें तेव्हां तर तो सारा विषय त्याच्या डोक्यांतून पार निघून गेला.

कारण त्याची आई अंथरूण पसरून निजली आहे असें त्याला दिसलें. ऐन मधल्या प्रहरींदेखील उगीच अर्धा तासच जमिनीवर टेकून विश्रान्ति घेणाऱ्या लक्ष्मीबाई संध्याकाळच्या या वेळीं अंथरुणावर निजलेल्या असाव्यात हें चमत्कारिक होतें. मनांत चरकून सुधीरनें विचारलें,

" आई ? कां ग ? तापबीप आला आहे कीं काय ? "

" नाहीं रे—जरा—" असें हळू आवाजांत म्हणत लक्ष्मीबाई उठल्या.

सुधीरनें नको नको म्हटलें पण त्यांनीं ऐकलें नाहीं. कपडे काढून तो स्वयंपाकघरांत येईपर्यंत त्यांनीं त्याच्यासाठीं पाटपाणी व फराळाचें ठेवलें व स्टोव्ह पेटविलादेखील.

पण सुधीर स्वयंपाकघरांत आला तो पाटावर बसला नाहीं. आधीं तो आई-जवळ गेला आणि तिचें उजवें मनगट हातांत घेऊन घाबरून म्हणाला,

" चांगलाच ताप भरला आहे आई तुला. चहा कसला करतेस? पड तूं. मला नको चहा."

" अरे झालासुद्धां चहा. हं, तूं खा बघूं आधीं. जरा माझं अंग कढत झालं आहे तर घाबरतो आहेस काय आय येवढा?"

हें म्हणतांना लक्ष्मीबाई किंचित् हंसल्या.

पण केवळ आपली काळजी खोटी दिसावी म्हणून आईनें तें हास्य केलें हें सुधीरच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. अंगांत वाढणाऱ्या ज्वराच्या ऊष्णतेनें तिचें तोंड फुलल्यासारखें दिसत होतें. लक्ष्मीबाई पुरत्या गौरवर्णाच्या होत्या व त्यांना सुधीरखेरीज एक मुलगीच काय ती झाली असल्याकारणानें इतक्या वयांतहि त्यांची कान्ति कायम होती. त्यामुळें वाढत्या तापाची लाली त्यांच्या कानांच्या पाळ्यांवर आणि नीटस नाकाडोळ्यांवर अगदीं स्पष्ट दिसत होती.

आईला बरें वाटावें म्हणून सुधीरनें खाल्लें व चहाचा कपहि संपविला. पण त्याचें त्यांत लक्ष काडीमात्र नव्हतें. तें संपवितांच त्यानें मधल्या खोलींत गादी घातली, आग्रह करून आईला निजविलें व आपल्या कपड्यांच्या पेटींतील कोलन वॉटर काढून त्याची पट्टी तिच्या कपाळावर ठेवली तेव्हां त्याचा जीव जरा स्वस्थ झाला.

मग लक्ष्मीबाईंचें अंग चेपीत त्यानें विचारलें,

" ताप भरायच्या आधीं थंडी वाजली?"

" अंहं."

" दादांना माहीत आहे तुला ताप भरला आहे हें?"

" असेल. कारण मधें एकदां सैंपाकघरांत पाणी प्यायला यायचं तेव्हां मी अंथरुणावर उठून बसलें तें पाह्यचं झालं.—"

" मग काय म्हणाले?"

" कांहीं नाहीं. पाणी पिणं झाल्यावर जायचं झालं—"

तें ऐकून सुधीरचें मन अस्वस्थ झालें. आईला तशी पाहून दादांनीं दोन गोड शब्दांनीं कसें आहे किंवा काय होत आहे येवढेंहि विचारूं नये हें त्याला

अतिशय चमत्कारिक वाटलें. हें करण्यांत दादांचा अपराध घडला असें म्हणण्याचा त्याच्या मनाला धीर होईना. कारण आपले वडील निष्ठुर नाहींत, उलट ते अतिशय प्रेमळ व हळू अंतःकरणाचे आहेत असाहि प्रत्यय त्याला कांहीं प्रसंगीं आला होता. मग दादांच्या या वागण्याला काय म्हणायचें ?— इतक्यांत मघांशीं ऐकलेल्या दामूअण्णांच्या घोगऱ्या आवाजांतल्या बोलण्याची त्याला आठवण झाली. हिंदुधर्मांतली बहार !—दादांचें वागणें त्यांपैकींच कीं काय ? जुन्या संस्कृतीचा दादांना मनस्वी अभिमान होता. त्या संस्कृतीच्या बहारींतलाच हा प्रकार समजायचा कीं काय ?—

इतक्यांत पुढच्या खोलींतल्या वादविवादाला चांगलाच रंग चढला. आत्मा, जीवब्रह्म, ब्रह्मांड, नित्यानित्य वगैरे कित्येक शब्द आकाशांतल्या मेघांप्रमाणें एकमेकांवर आदळले, पुस्तकांचीहि आपटाआपट झाली, टाळ्या वाजल्या, आणि अखेर मघांच्या त्या घोगऱ्या आवाजवाल्या गृहस्थांनीं कायसें निधान करून दादांना म्हटलें,

" असंच कीं नाहीं ?—"

" हो. स्पष्ट सूत्रच आहे आपल्याजवळ; हें पहा." असें म्हणून दादांनीं खणखणीत आवाजांत सूत्र वाचलें.

हा सारा विवाद ऐकून सुधीरला त्रासच झाला. त्याचें मन गोंधळलें. चेपतां चेपतां त्यानें आपल्या आईकडे पाहिलें. आतां त्यांच्या अंगांत ताप पुरा भरला होता व त्या ग्लानीनें लक्ष्मीबाईंनीं डोळे झांकून घेतले होते.

इतका ताप आला तरी लक्ष्मीबाईंनीं दोन तीन दिवस घरगुती काढ्यापलीकडे कांहींच घेतलें नाहीं. सुधीरनें डॉक्टरचें औषध सुरू करण्याची गोष्ट पुनः पुन्हां काढून पाहिली पण लक्ष्मीबाईंनीं दर वेळेस " अरे, अपचनाचा ताप आहे. जाईल उद्यां " असें म्हणून त्याची काळजी अवास्तव ठरविली. एकदोनदां सुधीरला विचारण्यापलीकडे दादांनीं लक्ष्मीबाईसंबंधीं विशेष कांहींच चवकशी केली नाहीं. त्यांची स्नानसंध्या, जपजाप्य, वेदान्तचर्चा, सारा क्रम सुसूत्र अखंड चालला होता.

शेवटीं तीन दिवस असे गेले आणि लक्ष्मीबाईंचा ताप चाराच्या खालीं येईना तेव्हां सुधीरला धीर निघेना. त्यानें डॉक्टरना घरीं आणलें.

तपासणी केल्यावर डॉक्टरनीं सांगितलें कीं, हा नवज्वराचा दोषी ताप आहे, शुश्रूषेंत यत्किंचितहि कसूर होतां कामा नये.

सुधीर घाबरला कीं नाहीं सांगणें सोपें नाहीं. पण आईच्या सेवेंत उणेपणा रहातां कामा नये येवढें तो उमजला व त्यामुळें जरा गोंधळला येवढें खरें. त्यानें ब्राउनिंगसाहेबाला चिठ्ठी पाठवून रजा घेतली व आईच्या तापाला उतार पडे-पर्यंत तिच्या अंथरुणापासून हालायचें नाहीं असें ठरविलें.

लक्ष्मीबाईच्या तापाचा जोर कायम होता. त्या पांचसहा दिवसांत त्यांच्या-विषयींच्या काळजीनें तर सुधीरचें मन व्याकुळ होतच होतें, पण त्याहिपेक्षां दादांनीं जी वागण्याची तऱ्हा चालविली होती तिच्याबद्दल आश्चर्य करावें कीं राग मानावा कीं आणखी कांहीं तिचा अर्थ करावा हें कळणें कठीण होऊन त्याचें मन व्यथित होत होतें.

डॉक्टरांनीं लक्ष्मीबाईचा ताप नवज्वराचा असल्याचें सांगितल्याबद्दल जेव्हां सुधीरनें शंभुरावांच्या कानांवर घातलें तेव्हां फक्त "हं" म्हणून त्यांनीं आपलें वाचन चालूं ठेवलें. त्यांचीं मतें डॉक्टरी उपायाच्या विरुद्ध होतीं म्हणून कदा-चित् त्यांनीं तसें केलें असेल अशी त्या वेळीं सुधीरनें आपल्या मनाची समजूत घातली. ती घालतांना त्याचें मन अर्थात् म्हणालें, "पण डॉक्टरी उपाय पसंत नसले तरी त्याबद्दलचा राग दाखवतांना मनांतली मायाहि अगदीं काढून टाकली पाहिजे कीं काय?" पण ती शंका त्यानें तशीच दाबली. तरी नंतर दादांच्या वागण्याची संगति लावणें त्याला अधिकाधिकच कठीण होऊं लागलें. सारीं नित्य-नैमित्तिक धर्मकृत्यें संभाळून पत्नीची शुश्रूषा दादांना करतां येईल हें सुधीरला स्पष्ट दिसत होतें. पण सकाळीं स्नानासाठीं नळाखालीं लावलेली बादली भरेपर्यंत तेथें उभें रहाण्याऐवजीं ते आईच्या अंथरुणाजवळ येऊन बसत तेवढेच. त्यानं-तर दिवसांतून एखाददुसऱ्यांदा "आहे तितकाच आहे ना ताप?" असें सुधी-रला विचारण्यापलीकडे ते कसलीच चवकशी करीत नसत. त्यांची वेदान्ती मंडळी यावयाची त्याप्रमाणें येत आणि त्यांची उपनिषदांची चर्चाहि चालावयाची तशी चाले.

या साऱ्या प्रकारानें सुधीरच्या मनाला फार यातना झाल्या. आईच्या उशा-गतीं बसल्या बसल्या एकच विचार त्याच्या मनांत पुनः पुन्हां येई,

"दादांना माया नाहीं?"

तसें म्हणावें तर आज चार दिवस पूजेचें तीर्थ लक्ष्मीबाईंना पाजण्याबद्दल त्यांनीं सुधीरला नियमानें बजावून दिलें होतें !—

मग मनांत माया असून दादा शान्ति आणि बेफिकिरी दाखवीत आहेत ?— सुधीरला निश्चित असें कांहींच ठरवितां येईना.

शेवटीं नवव्या दिवशीं एक चमत्कारिक प्रकार घडला. रोज रात्रीं नवाच्या आंत निजणारे त्याचें दादा त्या दिवशीं योगवासिष्ठाची पोथी उघडून वाचीत बसले. ती रात्र अतिशय आणीबाणीची असल्यामुळें सुधीर पापणीला पापणीहि न लावतां आईच्याजवळ बसून राहिला होता. दहा, अकरा, बारा वाजले तरी दादांचें वाचन चालूच असलेलें त्यानें पाहिलें. पहांटे दोहोंच्या सुमारास लक्ष्मी-बाईंना अंगभर घाम आला. तें सुचिन्ह पाहून सुधीरला बरें वाटलें. त्यानें आईचें अंग कोरडें केलें व थर्मामीटर लावून पाहिला. ताप उतरला होता. त्या आनंदांत त्याला रहावलें नाहीं व एका हातांत थर्मामीटर तसाच घेऊन तो पुढच्या खोलींत आला व म्हणाला,

"दादा, आईला घाम येऊन ताप उतरला !"

दादांनीं वर पाहिलें व म्हटलें,

"होय ?"

"हो, आतां काळजी संपली !"

त्याचा तो आंतील भावनांचा कड घेऊन बाहेर पडलेला उद्गार ऐकतांच दादांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा ओघळल्या. त्यांनीं पोथीचें पान खालीं ठेवलें, डोळ्याची आरशी काढली, आणि उपरण्यानें डोळे पुसले व नाक शिंकरलें.

सुधीर स्तंभितच झाला ! चंद्रबिंबानें सूर्यमंडलाचा घास करून खाल्लेला त्यानें पाहिला असता तरी त्याला येवढा विस्मय वाटला नसता !

"आतां तिच्याजवळ येऊन बसण्याइतकं घट्ट मन मला करतां येईल."

असें म्हणून दादा उठले व सुधीरबरोबर आंत येऊन लक्ष्मीबाईंच्या उशाशीं बसले. सुधीरहि बसला.

कांहीं वेळानें दादा म्हणाले,

"तूं सारखा बसून होतास. मीं आणखी बसून काय अधिक झालं असतं ?— मोहानं मन मात्र बावरलं असतं. ब्रह्मावरची निष्ठा ढळून मायावश होण्यासारखे प्रसंग माणसानं टाळतां येतील तितके टाळावेत, नाहीं का ?"

सुधीर काय बोलला तें त्याचें त्यालाहि ऐकूं आलें नसेल. दादांच्या त्या वेचक शब्दांनीं केवढें तरी एक गूढ उलगडलें गेल्यासारखें वाटून तो विस्मित झाला. एकूण दादा जी कठोरता आणि बेपर्वाई दाखवीत होते ती आपली श्रद्धा ढळूं नये म्हणून तर ! त्यांच्या वागण्यांतील निष्ठुरता मुद्दाम संपादलेलीच होती तर ! आपल्या माथेच्या धारा वाहूं लागून आपल्या निष्ठेचे बांध वाहून जाऊं नयेत म्हणून दादा आईपासून दूर दूर होते तर ?

मग दादा निष्ठुर कीं प्रेमळ ?—भित्रे कीं धीट ?

कीं दोन्हीहि नाहींत, आणि केवळ मुमुक्षु ?—

आणि मुमुक्षु असले तरी श्रद्धा अढळ ठेवण्याच्या खटपटींत आपल्या तुटक वर्तनानें पत्नीच्या अंतःकरणाला किती यातना होत असतील याचा त्यांनीं नको का विचार करायला ?—

मग दादांचें चुकलें कीं बरोबर आहे ?

सुधीरच्या मनाचा विलक्षण गोंधळ उडाला. एकीकडे दादांनीं आपल्या आईचा मोठा अपराध केला असें त्याला वाटलें तर एकीकडे त्यांच्या ज्ञाननिष्ठेचें त्याला कौतुक वाटलें. आपली आई दुर्दैवी असा विचार त्याच्या मनांत आला पण त्याच वेळीं दादांबद्दलची त्याच्या मनांतली भक्ति पूर्वीपेक्षां वाढली. जुन्या संस्कृतीच्या अभिमानानें भिनलेलीं हीं करारी माणसें यांच्या वेडेपणालाहि शहाणपणा म्हणायची पाळी येते, यांच्याविरुद्ध बंड करणें सोपें नाहीं, असा कांहींसा विचार त्या वेळीं त्याच्या मनांत येऊन गेला. दादांचा रुबाबदार चेहरा, मोठमोठ्या मिशा, सरळ नासिका, तेजदार डोळे, उंच कपाळ आणि त्यावरचे काल रात्रीं लावलेले भस्माचे पट्टे— हें सारें दृश्य त्या क्षणीं त्याला संकेतरूप वाटलें. जणूं नष्ट होण्यास तयार नसलेली, करारी, अंधश्रद्धा जुनी संस्कृति आपल्यापुढें उग्र स्वरूपानें प्रगट होऊन आपल्याकडे रोखून पहात आहे असा त्याला भास झाला !

---

# प्रकरण ४ थें



## बलिदानाचीं कडू फळें



कराची शहर या पांचसहा वर्षांत फारच वाढलें आहे, आणि त्या शहरांतील परप्रान्तांतल्या लोकांची संख्याहि तिपटीनें फुगली आहे. पण त्यापूर्वीं शहराचा विस्तार इतका झाला नव्हता आणि परप्रान्तांतून आलेल्या लोकांची वस्ती एखाद्या वसाहती-प्रमाणें ठराविक मोहल्यांत एकत्र असे. विशेषतः मुंबई प्रान्तांतली जी ब्राह्मण मंडळी कराचीस गेली होती ती रामबाग म्हणून जो त्या शहराचा भाग आहे त्यांत रहात असत. साधारण गरीब स्थितींतली ब्राह्मण मंडळी एक लहानशी वाडीसारखी जागा होती तेथील खोल्या घेऊन रहात; व ज्यांची सुस्थिति होती ते या ब्राह्मणवाडीच्या आसपास ब्लॉकवजा स्वतंत्र जागा घेऊन रहात.

अशाच एका घराच्या दाराशीं दुपारीं सुमारें एक वाजण्याच्या सुमारास एक सतराअठरा वर्षांची ब्राह्मण–मुलगी हांका मारीत होती,

"माई, अहो माईऽऽ"

तिच्या हांकेच्या स्वरावरून ज्या स्त्रीस ती हांक मारीत होती तिच्यावर तिची फार भक्ति असावी हें उघड होत होतें. तिच्या स्वरांत उतावळीचीहि छटा होती. कारण सूर्य अगदीं डोक्यावर आला होता. सकाळीं न्हाणें झाल्या-मुळें तिनें आपले केंस डोक्यावर मोकळेच ठेवून फक्त टोंकाशीं एकत्र केले होते. उन्हाचें निवारण करण्यासाठीं म्हणून तिनें डावा हात माथ्यावर टेकला होता व उजव्या हातानें ती दाराच्या कडीशीं चाळा करीत होती. तिच्या चेह-ऱ्यावर एक प्रकारचा मोहक उग्रपणा होता, आणि तिच्या नेसण्याच्या पद्धती-वरून आणि अंगांतल्या पोलक्याच्या चौकटीचौकटीच्या कापडावरून ती शिक-णारी सवरणारी असावी असें स्पष्ट दिसत होतें. वर्णानें ती निमगोऱ्यांतहि मोडली नसती, आणि शरीरानें ती बरीच कृश होती.—

तिनें पुन्हां कडी वाजविली व हांक मारली,

" माई ऽऽ! "

त्यावेळीं मात्र आंतून " आलें हो ! " असा आवाज आला, आणि तो ऐकून " हं " म्हणून ती कडीवरचा हात खालीं सोडून उभी राहिली.

दार उघडलें जातांच आंतल्या व्यक्तीस ती म्हणाली, " इश्श, काय हें! किती हांका मारल्या ! "

" अग हांका ऐकल्या सुभाताई तुझ्या ! पण माझं बोट कापलं म्हणून आंतल्या मोरीवर जाऊन धूत होतें त्यामुळं—"

हें ऐकतांच सुभद्रेनें घाबरल्यासारखें केलें व माईजवळ जाऊन म्हटलें,

" काय म्हणतां ?—बोट कापलं ?—कोणतं ? पाहूं—"

माईंनीं उजव्या हातावर टेंकलेला डावा पंजा पुढें करीत म्हटलें, " हें पाहिलंस ? आज मला उपास म्हणून बटाटे चिरायला बसलें, तों आंगठ्याचं सालच्या साल गेलं—पाहिलंस ? आमची विळीच भारी ही आहे !—"

सुभद्रेनें पाहिलें तों माईच्या डाव्या आंगठ्याला चांगलीच जखम झाली होती. पहातां पहातां त्या धुतलेल्या जखमेंतून पुन्हां रक्त बाहेर येऊं लागलें. तें दिसतांच ती म्हणाली,

" चला, आंत चला, आधीं तुमचा आंगठा नीट बांधतें मी ! "

" बरी वेळेवर डॉक्टरीण आलीस म्हणायची ! "

असें म्हणून माई हंसल्या; व " आलें ना ? " असें हंसून म्हणत सुभद्रा त्यांच्याबरोबर आंत गेली.

तिनें माईचा आंगठा धुवून त्यावर पट्टी बांधली व मग म्हटलें,

" आतां तुम्ही बसा अशा टेंकून स्वस्थ. मी चिरतें हे बटाटे अन् तुम्हांला काय हवं तें करून देतें. अं ? "

तिनें विळी अलीकडे घ्यावयासाठीं हात पुढें केलेला पाहून माई म्हणाल्या,

" छे छे ! वेडी तर नाहींस ? राहूं दे. आपण बोलत बसूं. "

" वा ! तुम्हांला फराळ नाहीं करायचा ? "

" हे भाजलेले दाणे आहेत तेवढे पुरेत मला. बैस तूं."

" असं कसं ? "

" कसं काय ?—अग मीं आणखी कांहीं खावं हें देवाला रुचलं नाहीं म्हणून माझं बोट कापलं ! नाहीं का ? मग जें देवाला रुचलं नाहीं तें हट्टानं कशाला करायचं ? नुसते दाणे खाल्ले तरी मी कांहीं मरत नाहीं."

" इश्श ! माई ! "

येवढेंच उद्गारून सुभद्रेनें त्यांच्याकडे पाहिलें. माईंचे शब्द तिच्या हृदयाला झोंबले, व त्यांची चर्याहि एकदम गंभीर झालेली तिला दिसली. माईंच्या मनाला उद्वेग आणणारी कांहीं तरी विशेष गोष्ट आज झाली असली पाहिजे अशी शंका येऊन तिचें मन चरकलें.

' विशेष ' गोष्ट म्हणण्याचें कारण नेहमींच्या उद्वेगकारक गोष्टी सुभद्रेला—सुभद्रेलाच काय, कराचींतल्या बहुतेक ब्राह्मण मंडळींना—परिचयाच्या झाल्या होत्या.

माईंना संसारसौख्य काडीमात्र नव्हतें हें कोणालाहि सहज दिसण्यासारखें होतें. त्यांचे पति—वसंतराव—स्वरूपवान होते व बुद्धिवानहि होते, आणि बाप जिवंत होता तोंपर्यंत त्यांचें स्वैर वर्तन फारसें मर्यादेबाहेर गेलें नव्हतें. वसंतरावांचे वडील—भाऊशास्त्री—प्रथम कराचीस आले ते एका सिंधी धार्मिक फंडांतून चाललेल्या संस्कृत पाठशाळेचे मुख्याध्यापक म्हणून आले. पण कराचीस आल्यापासून थोड्याच अवधींत त्यांच्या शास्त्रपारंगततेची व अध्यापनकौशल्याची कीर्ति चहूंकडे पसरली, व त्या काळीं कांहीं सिंधी हिंदू जमीनदारांना संस्कृताबद्दल व शास्त्रांबद्दल विशेष गोडी असल्यामुळें दहावीस वर्षांत भाऊशास्त्र्यांनीं कीर्तीप्रमाणेंच संपत्तीचीहि चांगलीच जोड केली. ते हयात होते तोंपर्यंत वसंतराव त्यांना दबकून वागत. पण त्यांचें देहावसान झाल्यावर त्यांना विचारतेंसंवरतें कोणीच उरलें नाहीं, थोडीफार इस्टेटहि हातीं आली, व्यसनी शाळूसोबती भोंवतीं जमा व्हावयास उशीर लागला नाहीं, आणि सोन्यासारखा संसार त्यांनीं अल्पावधींत मातीमोल करून टाकला.

ते घरीं क्वचितच टिकत, येत त्या वेळीं भलत्या स्थितींत असत, माईला शिवीगाळ करीत, आणि कधीं कधीं दुराचारी सोबत्यांना आणून घरांत दंगा उडवून देत.

नवरा व्यसनी निघाला म्हणजे बायकांची दुर्दशा ज्या रीतीनें वाढत जाते त्या रीतीनें माईंचेंहि दुःख वाढत गेलें.

वसंतरावांनीं तिला टाकल्यासारखेंच होतें.

तिला मूल झालें नव्हतें. होण्याचा संभवच नव्हता.

पत्नीधर्माला स्मरून ती त्यांच्यापासून दूर जायला तयार नव्हती म्हणून राहिली होती येवढेंच.

या साऱ्या गोष्टी सुभद्रेला माहीत होत्या. "पण नुसते दाणे खाल्ले तरी मी कांहीं मरत नाहीं" हे माईंचे उद्गार नेहमींच्या उद्विग्नतेमुळें निघण्यासारखे नव्हते असें तिला वाटलें, व आज कांहीं विशेष प्रकार झाला कीं काय अशा शंकेनें ती माईकडे पहात राहिली. शंभर बायकांत ठळकपणें डोळ्यांत भरावी अशी माई स्वरूपानें देखणी होती, इतका काल छळ सोसल्यामुळें तिच्या मुद्रेवरची कान्ति क्षीण झाली होती तरी तिच्या चेहऱ्याचा मोहकपणा लोपला नव्हता, किंबहुना सूर्यास्तानंतरच्या क्षीण प्रकाशामुळें कमलिनीला कांहीं निराळीच शोभा यावी तशी तिची मुद्रा शोभत होती, आणि अंगावर दागिने नसूनहि आणि नेसण्याचें वस्त्र साधारणच असूनहि तिच्या बांध्यांतला मूळचा गोडवा दृष्टींत भरत होता. या वेळीं ती भिंतीला टेंकून आणि दुखरा झालेला डावा हात आडवा अधांतरीं धरून बसली होती. त्या स्थितींत तिच्याकडे पाहतांच सुभद्रेच्या अंतःकरणांत करुणा दाटून आली, व ती म्हणाली,

"माई, आज कांहीं विशेष झालं नाहीं ना ?"

एखाद्या माणसाची जखम पहायची झाली म्हणजे तेथें जसा आपण अतिशय जपून स्पर्श करतों त्याप्रमाणें अतिशय जपून बोलल्यासारखा स्वर काढून सुभद्रेनें तो प्रश्न केला होता.

त्या प्रश्नांत स्पष्ट होणाऱ्या गाढ सहानुभूतीनें माईच्या मनाला बरें वाटलें, पण उलट त्या प्रश्नानें दुःखकारक वृत्ताची आठवण झाल्यामुळें तिला क्लेशहि झाले. कांहीं उत्तर न करतां ती स्तब्धच राहिली.

सुभद्रेनें हलकेंच पुन्हां विचारलें,

"अं ?—माई ?—कांहीं झालं आज ?"

शोकाकुल अंतःकरणाला क्रोधापेक्षां दुसऱ्यानें दाखविलेली कळकळीची सहानुभूतिच असह्य असते. सुभद्रेच्या त्या प्रश्नाला माईला उत्तर देववेना. डोळ्यांत उभीं राहणारीं आंसवें तिनें टिपलीं, व उजव्या हाताच्या कोनाड्याकडे खूण करून ती म्हणाली,

"तिथं पत्र आहे—बघ—वाच तें."

सुभद्रेनें पत्राची घडी उघडून पाहिली तों मजकुराखालीं सही होती—

" तुझा सुधीर भाऊ "

सुभद्रा म्हणाली,

" तुमच्या बंधूचं दिसतं आहे पत्र. खुशालीचंच आहे ना ?—"

" म्हटलं तर खुशालीचंच आहे. वाच ना."

सुभद्रेनें पत्र वाचलें तों त्यांत सुधीरनें आईला नवज्वर झाल्याची व त्यांतून ती आतां बरी झाल्याची हकीगत थोडक्यांत लिहिली होती, काळजी करण्याचें कारण नाहीं असें बहिणीस बजावलें होतें, तिच्याकडील खुशाली फार दिवसांत कळली नाहीं म्हणून सर्वांना काळजी लागली आहे असें म्हटलें होतें, व शक्य असेल तर आणि कोणा जाणारायेणाराची सोबत मिळेल तर एकदां आईच्या भेटीला मुंबईस येण्याबद्दल सुचविलें होतें. त्यापुढें त्यानें लिहिलें होतें,

" मी खुद्द वसंतरावांनाच तुला इकडे धाडण्याबद्दल लिहिणार होतों. पण मागच्या वेळेस मीं त्यांना अशाच प्रकारचें एक पत्र लिहिलें त्या वेळीं त्यांनीं किती गलिच्छ व अपमानकारक उत्तर धाडलें तें आठवलें कीं तो प्रयोग नकोसा वाटतो. म्हणून तूंच एकंदर रागरंग पाहून त्यांची परवानगी काढ. इष्ट वाटत असेल तर मला बोलाव, मी न्यायला येईन. तुझ्या भेटीसाठीं जिवाची कोण तळमळ होते म्हणून सांगूं माई ! आणि माझें असें तर आईच्या जिवाला काय वाटत असेल ! आज दीड वर्षांत तुझी आमची भेट नाहीं ! खुशालीच्या चार ओळी नेमानें लिहीत होतीस त्याहि आज दीड महिन्यांत दृष्टीला दिसल्या नाहींत ! उत्तर उलट टपालीं लिही."

अशा प्रकारें पत्र एकदम संपविलेलें होतें. जणूं कितीहि लिहिलें तरी पुरणार नाहीं असें वाटून थांबून सुधीरनें एकदम खालीं सही केली होती. पत्र वाचून झाल्यावर सुभद्रा म्हणाली,

" आईचं आतां बरं आहे असं लिहिलं आहे यांत, मग उगीच कां बरं काळजी करतां माई ? "

" त्याबद्दल कशी काळजी करीन सुभाताई, मला समजत का नाहीं ? " तिच्या डाव्या खांद्यावर उजवा हात ठेवीत माई म्हणाली, " पण तूंच सांग अशा वेळीं आईला भेटून यायसाठीं जीव किती उतावळा होईल तें. पण—

मला जीव आहे हेंच मुळीं इथं कबूल नाहीं—मी माझ्या माहेरच्या माणसांना मेल्यासारखी आहें अशीच इथं कल्पना!—हें दिसलं कीं वाटतं हा अभागी जीव जात का नाहीं एकदांचा! खरंच! कां नाहीं जात?—"

बोलतां बोलतां माईला हुंदका आला व तिचे शब्द बंद झाले. तिनें उजव्या हातानें पदर ओढला आणि तो डोळ्याला लावून ऊष्ण श्वास टाकीत व दुःखाचा आवेग दाबीत ती स्तब्ध राहिली.

सुभद्रा कांहीं वयानें मोठी नव्हती. माईपेक्षां ती दोन वर्षांनीं लहानच होती. पण दुःखिताचें सांत्वन करण्याचा मोठेपणा स्त्रियांच्या अंगीं उपजतच असतो. ती माईच्याजवळ सरकली व अत्यंत सहानुभूतिपूर्वक त्यांचा उजवा हात हातीं घेऊन म्हणाली,

"माई! असं काय बरं बोलावं?"

जणूं सुभद्रा कोणी तरी मायेची वडिलधारी बाई होती असें मानूनच माईनीं तिचें ऐकलें. खालचा ओंठ दाबून व डोळे गच्च मिटून त्यांनीं एक निःश्वास टाकला. व तेवढ्यानें अंतकरणावरचा दुःखाचा धोंडा दूर फेंकला गेला अशा आविर्भावानें त्यांनीं डोळे उघडून पाहिलें.

कांहीं वेळ त्या दोघीहि तशाच स्तब्ध बसून राहिल्या. मग आज विशेष कांहीं घडलें कीं काय याबद्दल सुभद्रेनें पुन्हां हलकेंच प्रश्न केला, व सुभद्रेजवळ आपलें दुःख सांगून हलकें करण्याची माईची इच्छा होतीच म्हणून त्यांनींहि तिला त्या दिवशींची हकीगत सांगितली.

ती हकीगत अशीः—

सुधीरचें पत्र परवांच आलें होतें, व तें आल्यापासून दोन दिवस मुंबईस जाऊन यावयाची परवानगी वसंतरावांजवळ विचारायचें माईनीं ठरविलें होतें. पण काल रात्रींपर्यंत मुळीं त्यांचा पत्ताच नव्हता. हैदराबादच्या एका स्नेह्याकडे जाऊन लगेच रात्रीं येतों असें सांगून ते जे आठ दिवसांपूर्वीं गेले होते ते काल अपरात्रीं एक वाजण्याच्या सुमारास उगवले.

माईनें दार उघडलें व वसंतरावांच्या तोंडाचा भपकारा असह्य वाटल्यामुळें ती तोंड फिरवून घरांत जाऊं लागली.

वसंतरावांनीं गुरगुरत विचारलें,

"या भलत्या वेळीं तूं जागी कशी?"

त्यांना काय सांगायचें कीं तुम्ही कसेहि असलांत तरी तुमची काळजी करीत रात्रंदिवस तुमची वाट पहाणें हाच माझ्या जिवाचा धर्म ?—माई कांहींच बोलली नाहीं.

" आत्तांशीं तूं नेहमीं अशी जागी असतेस—"

" माझी झोंपच नाहींशी झाल्यासारखी झाली आहे—" अर्धवट आत्मगतच माई म्हणाली.

" हंः !—माझ्या सारं लक्षांत आलेलं आहे, समजलीस ? " भेसूर आवाज काढून वसंतराव म्हणाले.

त्यांच्या त्या दरडावणीच्या स्वराचा आणि बोलण्याचा अर्थच न कळल्यामुळें माईनें गोंधळून त्यांच्याकडे पाहिलें.

" पहातेस काय अशी ?—मी ओळखलं म्हणून भेदरलीस होय ? हांः हांः ! कोणासाठीं असे दिवे ठेवून जागत बसतेस सांगूं ?—शेजारचा तो डॉक्टर—सुभद्रेचा मामा—"

पुढें वसंतरावांच्या पागल तोंडांतून काय काय मुक्ताफळें बाहेर पडणार होतीं कोणास ठाऊक ! जेवढें ऐकलें तेवढयानेंच माईचें हृदय दग्ध झालें. कानांवर हात ठेवून ती झपाट्यानें आंत निघून गेली. आपल्या खोलींत शिरून तिनें खोलीचें दार लावून घेतलें, आणि " आई ग ! " असा हळूं आवाजांत हंबरडा फोडून ती अंथरुणावर पडली.

त्यानंतर तिची व नवऱ्याची गांठ पडली ती सकाळीं दहा वाजतां. वसंतराव उठले व तोंड धुण्याऐवजीं नुसती चूळ भरून सिगारेट ओढीत पुन्हां अंथरुणावर पडले तों माईनें चहा तयार केला व त्यांच्या खोलींत जाऊन त्यांच्यापुढें तो धरून ती उभी राहिली.

वसंतरावांनीं कपाळाला आंठ्या घालून तिच्याकडे पाहिलें, व एकदां आळस देऊन ते उठले. त्यांनीं सिगारेटचा एक जोराचा झुरका मारला व सिगारेटचा तुकडा खिडकींतून भिरकावला. रात्रींच्या बेहोषपणाचा अवशेष त्यांच्या हातापायांत अजूनहि असल्यामुळें त्यांचा नेम चुकून तो जळका तुकडा खिडकीबाहेर जाण्याऐवजीं गजाला धडकून खोलींतच पडला. माईनें त्यांच्या हातीं कप देऊन सतरंजीवरचें तें जळकें थोटूक विझवून बाहेर फेकलें, व ती पलंगाजवळ उभी राहिली.

तिला जें विचारायचें होतें तें कसें विचारावें तिला समजेना. एकदां तर तिचें मन तिला म्हणालें, ज्या माणसानें काल रात्रीं तुला अत्यंत किळसवाणे शब्द ऐकविले त्याच्याशीं तूं बोलणार ? नवरा झाला म्हणून काय झालें ? किंबहुना नवरा असल्यामुळेंच त्याचे ते शब्द अधिक गलिच्छ ठरतात ! वास्तविक त्याचें तूं तोंडसुद्धां पाहूं नयेस !--

पण त्या मनाला तिनें गप्प बसविलें. कारण जिला हिंदुसंस्कृति, जुनी संस्कृति वगैरे मोठमोठीं नांवें आहेत तिचें संगोपन करणाऱ्या आमच्या स्त्रियांची ही रीत ठरलेली आहे. असत्याविरुद्ध ओरडणाऱ्या आपल्या खऱ्या विवेक-बुद्धीला दाबावयाचें आणि अधर्म सहन करावयास सांगणारी खोटी विवेकबुद्धि निर्माण करून तिच्याप्रमाणें वागायचें ही आमच्या स्त्रियांची परंपरा आहे.

या परंपरेप्रमाणें माईनें विवेक केला कीं नवऱ्यावांचून आपल्याला काय सद्गति आहे ? उगीच त्रागा करून कसें चालणार ?

म्हणून तिनें हलकेंच म्हटलें,

" परवां सुधीरभाऊचं पत्र आलं.--आई आजारी होती म्हणे नवज्वरानं-- आतां बरं आहे--बरं म्हणजे अजून ती हिंडतफिरत नाहीं--अशक्तपणा फार आला आहे--"

वसंतराव तिच्याकडे काडीचहि लक्ष देत नव्हते त्यामुळें एक एक वाक्य आपल्याशींच बोलल्याप्रमाणें तुटकपणें माईनें उच्चारलें; व मग जो मुख्य प्रश्न तिला विचारायचा होता त्याची पाळी आल्यावर ती थांबली. पतिराज काय उत्तर देतील त्याचा नेम नव्हता, व जी गोष्ट विचारायची ती तर तिला अत्यंत जिव्हाळ्याची वाटत होती. अगदीं भलत्या माणसाला आपल्या बालकाचा गोजिरवाणा चेहरा दाखवितांना त्याची याला नजर तर लागणार नाहीं अशा शंकेनें आईनें घोंटाळावें त्याप्रमाणें ती घोंटाळली.

पण मग लगेच धीर करून तिनें विचारलें,

" मी चार दिवस जाऊं कां मुंबईस ?--आईला भेटेन--"

" आईला भेटेन ?--आईला भेट !--अन् मी इथं तुझा कोणीच नाहीं ! " वसंतराव एकदम कर्कश आवाजानें म्हणाले.

त्यांचे ते उद्गार अत्यंत मूर्खपणाचे असल्याकारणानें ऐकणाराला निरुत्तर करण्यासारखे होते. तरी माई हलक्या आवाजांत पुन्हां म्हणाली,

" आजपर्यंत मीं कधीं विचारलं होतं का बरं ? पण आई दुखण्यांतून उठली म्हणून वाटतं.--"

" उठली ना ?--मेली नाहीं ना ? हंः हंः ! अन् मेली म्हणून तरी काय मोठं ! "

तें ऐकून माईला एकदम हुंदकाच आला. तिनें मान फिरविली, उसासा टाकला, आणि डोळ्यांतील धारा वाहूं दिल्या.

तें पहातांच वसंतराव संतापानें ओरडला,

" लागलीस का रडायला ? तुझा हा रडण्याचा तमाशा फारच वाढला आहे आतांशा ! चूप रहातेस का--पाजी ! "

त्या शेवटच्या शब्दाबरोबर माईच्या मानेवर आघात झाला.

त्या नरपशूनें हातांतील पेला भिरकावून मारला होता.

शरीरापेक्षांहि मनानें अधिक घायाळ झालेली माई मग तेथें उभी राहिली नाहीं.

नंतर दीडदोन तासांनीं वसंतरावांनीं कपडे केले आणि हैदराबादला जातों आहे असें सांगून ते निघून गेले.

ही हकीगत ऐकून सुभद्रेचा जीव कळवळून आला. काय बोलावें तें तिला सुचेना. आपलीं आंसवें तिनें पुसलीं, आणि माईचें मस्तक उजव्या हातानें थोपटीत ती स्तब्धच राहिली.

नंतर बराच वेळ ती माईशीं बोलत बसली, व मामांच्या चहाच्या वेळीं घरीं हजर असावयास पाहिजे म्हणून ती तीन वाजल्यावर जेव्हां उठली तेव्हां तिनें मोठ्या जड अंतःकरणानें निरोप घेतला.

दुसऱ्या दिवशीं माईनें सुधीरच्या पत्राचें उत्तर धाडलें तें असें,

" प्रिय सुधीरभाऊ,

तुझं पत्र पोंचलं. आईच्या दुखण्याची हकीगत कळल्यामुळं फार काळजी लागली आहे. हे म्हणतात कीं तूं महिनाभर मुंबईस जाऊन ये म्हणून. पण आत्तांशीं यांना जमिनीच्या व सावकारीच्या कामानिमित्त फार त्रास पडतो. अशा वेळीं मी इथं नसलें तर तब्येतीची आबाळ करतील. म्हणून यांच्या कामाचा येवढा मोसम जाऊं द्यावा असं वाटतं. मग येईन. आईला म्हणावं रागावूं नकोस. ती. दादांना सा. न. तुझा पगार

वाढून तुला तीनशें व्हायचे होते ते झाले कां ? केशवकाका तुला कधीं भेटतात का ? आईची खुशाली वरचेवर कळव. तुझी

**माई** ”

ज्या डाकेनें सुधीरला माईचें हें पत्र आलें त्याच डाकेनें त्याच्या हातीं दुसरें एक पत्र आलें. जयंत बापट म्हणून त्याचा एक परममित्र होता त्याचें तें पत्र होतें.

“ प्रिय सुधीर, बडोदें

कधीं कधीं तूं कमाल करतोस बुवा ! तीन आठवडे झाले तुझं पत्र नाहीं ! एखाद्या मुलीच्या फंदांत सांपडलेला माणूसच मित्राची अशी आबाळ करील ! कां ब्राउनिंगसाहेबानं तुला एखाद्या कामगिरीवर पाठवलं आहे ? तुमच्या पेपरमध्यें मदीना हॉटेलच्या आगीबद्दलचा मजकूर वाचला. त्यांतली गूढ रहस्याची लोणकढी थाप तुझ्याच डोक्यांतनं निघाली असली पाहिजे. आतां ती थाप खरी ठरवायसाठीं आणखी काय काय खोट्या गोष्टी शोधून काढतोस पाह्यचं. पण त्या कामगिरींत गुंतला असलास तरी चार ओळी तरी मला लिही कीं.

आमच्या घरची सगळी मंडळी खुशाल आहेत. मुंबईहून इकडे येऊन आम्हांला पुरं वर्षहि झालं नाहीं तों आमच्या तात्यांनीं आपलं समाजसुधारणेचं काम इथल्या समाजांत चांगलंच पुढं रेटलं आहे. बालविवाहाला बंदी करणारा कायदा गायकवाड सरकारनं करावा याबद्दल त्यांची जोराची खटपट चालली आहे. माझं बँकमधलं काम उत्तम चाललं आहे. मुंबईतल्या हेड ऑफिसरच्या कामाची मला उत्तम माहिती असल्याकारणानं इथल्या साऱ्या लोकांवर मी इंप्रेशन मारून आहें. इथल्या ऑफिसचा मॅनेजर बदलून नवा आलेला आहे तो तर मला टरकूनच आहे. अशी नमुनेदार आहे स्वारी ! त्याचा तो तिरपा डावा डोळा, गालावरच्या सुरकुत्या, बुरणुशी मिशा, घामट पगडी——राम राम ! तुझ्या केशवकाकांना अगदीं मजेदार सब्जेक्ट ( पात्र ) वाटेल चित्र काढायला.

पण आतां पाल्हाळ नको. नाहीं तर पत्र लिहिण्यास कारण कीं असा प्रारंभ करण्याची जुनी पद्धत गबाळी म्हणून टाकण्याच्या भरांत पत्र

लिहिण्याचं कारण अजीबात विसरण्याचा अत्याचार माझ्या हातून घडेल. तीन दिवस ओळीनं आली आहे बँकेला सुटी. तिला लागून मी घेतों आहे दोन दिवसांची रजा. आणखी आपल्या दर्शनाला येतों आहे महाराज येत्या शनिवारीं. तोंपर्यंत दयालोभ ठेवा आणि आपण तेथेंच आहांत कीं नाहीं तें मात्र उलट टपालीं कळवा.

तुझा स्नेहभूषित
**जयंत"**

सुधीरनें दोन्ही पत्रें एकापाठोपाठ वाचल्याकारणानें त्याच्या मनांत अनेक विचार उभे राहिले. याच बापटांच्या जयंतला माई द्यावी म्हणून त्यानें दादांजवळ आग्रह धरून पाहिला होता. पण बापटांचें घराणें सुधारकी म्हणून दादांचा ग्रह. जयंत हुशार आहे, होतकरू आहे, सुस्वभावी आहे हें सर्व त्यांना उघड दिसत असल्यामुळें मान्य होतें. इतकेंच नव्हे तर शेवटीं जयंताला माई मनापासून हवीशी वाटत असल्याचेंहि आईकडून सुधीरनें दादांच्या कानांवर घालविलें. पण "या अलीकडच्या प्रेमाच्या पांचट खुळाचा तर मला तिटकारा आहे!" असें त्यावर दादा उद्गारले, व माईला बापटांच्या घरीं द्यावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें. मग कराचीचें भाऊशास्त्र्यांच्या मुलाचें स्थळ समजतांच तर दादांना अत्यानंद झाला, व "माझ्यासारखाच जुन्या संस्कृतीचा अभिमानी व्याही मला मिळतो आहे हें माझं मोठं भाग्यच मी समजतों. त्यांच्या घरीं माई जन्माची सुखी होईल याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं." असें बोलून दाखवून त्यांनीं माईचें लग्न उरकून टाकलें.

या साऱ्या गतगोष्टींचें सुधीरला स्मरण झालें, आणि तो आपल्या मनाला विचारूं लागला—

माई जन्माची सुखी झाली कीं दुःखी!

दादांनीं जुन्या हिंदू संस्कृतीच्या खोट्या अभिमानाला माईचा बळी दिला असेंच नाहीं काय?

---

# प्रकरण ५ वें

## भास!



मार्मुगोवा आणि कोचीन यांच्या मधोमध धेनुकुंज नांवाचें एक बंदर आहे. हल्लीं या बंदराला फारसें महत्त्व नाहीं. पण सुमारें तीन शतकांपूर्वी या बंदराची फारच भरभराट होती असें सांगतात. या शहरांत त्या वेळीं मुसलमानांची सत्ता होती. येथील अमीर फार पराक्रमी म्हणून विख्यात होते आणि येथील प्रजेंतहि वीरवृत्तीचें विलक्षण वारें खेळत होतें. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीज लोकांनीं ज्या काळीं आपल्या धर्माचीं व सत्तेचीं अनेक केंद्रें स्थापन केलीं त्या काळांत धेनुकुंज काबीज करण्याचें त्यांनीं अटोकाट प्रयत्न केले. पण तेथील कडव्या मुसलमानांनीं ते सारे हल्ले परतविले व आपलें स्वातंत्र्य आणि वैभव कायम राखलें. पुढें ब्रिटिश लोक तरवारीपेक्षां तराजूच हातीं धरून धेनुकुंजांत शिरल्यामुळें हिंदुस्थानांतील इतर भागाप्रमाणें याहि भागांत त्यांचा हात शिरकला, आणि पांचपंचवीस वर्षांत मूळची मुसलमानी सत्ता पार नामशेष झाली. आज त्या पूर्वीच्या सत्तेचे अवशेष पाहूं गेल्यास अमीर असा किताब आपल्या नांवापुढें लावणारें एक घराणें, जुन्या राजवाड्याचे पडीक भाग, आणि पूर्वीच्या काळापासून जागृत स्थान म्हणून मानला गेलेला व सरकारी वर्षासनानें चाललेला एक दर्गा यापलीकडे कांहींच आढळण्यासारखें नव्हतें.

मात्र धेनुकुंजाचें राजकीय वैभव नष्ट झालें होतें तरी इतर कांहीं बाबतींत त्या स्थलाचें ऐश्वर्य वाढलें होतें म्हणावयास हरकत नाहीं. या बंदरांत मोतीं वेंचण्याचा धंदा पूर्वीहि चालत असे. पण त्या वेळीं या धंद्याचें शास्त्र लोकांना फारसें अवगत नव्हतें व आतां त्या धंद्यांतल्या बऱ्याचशा खुब्या लोकांनीं उचलल्या होत्या. त्यामुळें मोतीं वेंचण्याचें काम धेनुकुंजांत पूर्वीपेक्षां पुष्कळच मोठ्या प्रमाणावर होई. मासळीचा व्यापार तर येथें अतिशयच जोरांत चाले.

किंबहुना धेनुकुंजांतले बहुतेक रहिवासी या दोन धंद्यावरच अवलंबून होते म्हणावयास हरकत नाहीं.

आणि बंदरांतलीं मोत्यें आणि मासळी याप्रमाणेंच--किंबहुना याहूनहि अधिक--धेनुकुंजांतल्या लोकांनीं जिचा यथार्थ अभिमान बाळगावा अशी आणखी एक गोष्ट होती. ती म्हणजे तेथील वनश्री. आसपासच्या पर्वतराजी, आकाशांतल्या चंद्रसूर्याकडे सरळ दृष्टि फेंकणारीं नारळाचीं झाडें, नानाविध रंगांच्या फुलांचा संभार अंगावर वहाणाऱ्या सुवासिक व बिनवासाच्या वेली, मन मानेल तेथें गर्दी करणारीं वेळूचीं बेटें, कधीं रस्त्यावरच्या प्रवाशांना लाजल्यासारखें करून लांब अंतरावरून वहाणारे तर कधीं नागरस्त्रियांप्रमाणें खुशाल रहदारी सोसून नाचत जाणारे जलप्रवाह, वनदेवतेच्या शृंगारावर अनुरक्त झाल्यामुळेंच जणूं काय लाल रंग धारण करणारे मऊ आणि सडक रस्ते, आणि रोज दोन वेळां प्रचंड तांडव करून किनाऱ्याच्या जमिनीला मनसोक्त न्हाऊं घालणारा समुद्र--अशी ही वनश्री कोणत्याहि रसिक अंतःकरणाला वेड लावण्यासारखीच होती. खुद्द धेनुकुंजांतल्या लोकांना त्या सृष्टिशोभेची चव कितीशी होती याबद्दल शंकाच आहे. उंच उंच माडांच्या वृक्षांचें महत्त्व माडी काढण्यापलीकडे ते मानीत नसतील, समुद्राच्या भरतीची थोरवी पडाव पाण्यांत घालायला सोयीची वेळ यापलीकडे त्यांना ठाऊक नसेल आणि क्षितिजावर दिसणारे दिव्य सूर्योदय आणि सूर्यास्त पहातांच त्यांच्या शोभेच्या विचारापेक्षां घराबाहेर पडून कामावर जाण्याचा व परत फिरण्याचा इशाराच त्यांच्या मनांत येत असेल. त्यामुळें कोणी दूरस्थ चित्रकार त्यांच्या देशांत येऊन वनश्रीची प्रतिमा रंगवूं लागला कीं त्यांना त्याची मोठी गंमत वाटे, आणि एखाद्या क्षुद्र खेळण्यांत रमणाऱ्या लहान मुलाकडे ज्या वृत्तीनें मोठीं माणसें थबकून पहात उभीं रहातील त्या वृत्तीनें ते त्याचें रंगकाम पहात क्षणभर भोंवतीं जमत.

आत्तां केशवकाकांच्या भोंवतीं दोनतीन मुलें, एक म्हातारा कोळी आणि दोन बाया जमलेल्या दिसत होत्या. त्यांच्याहि मनांत हीच वृत्ति होती. झोंकनोक परीटघडी कपडे ल्यायलेला हा साहेब एक फळकुट हातीं धरून रंगांची चिताड कशासाठीं करीत आहे अशा विस्मयानें ती सारी मंडळी केशवकाकांपासून थोड्या अंतरावर उभी होती. त्या लहान मुलांना सगळ्यांत अधिक

जिज्ञासा होती व मनांतली भीति आंवरून जितकें साहेबाजवळ जाणें शक्य आहे तितकें जवळ सरकून त्या लहानशा घोळक्याच्या अगदीं आघाडीलाच तीं उभीं होतीं. केशवकाकांच्या हातांतला ब्रश जसा हाले तशा या छोट्या प्रेक्षकांच्या मानाहि हालत, आणि कांहीं विचार करूं लागून केशवकाका रंग-पात्रांत नुसता ब्रशाचा चाळा करीत राहिले कीं तेवढ्या अवधींत तीं मुलें हातांत कसलीशीं कच्चीं रानफळें होतीं तीं कचाकच खाऊन तोंड पुशीत. बाया उभ्या होत्या त्या चित्राकडे पहात होत्या कीं चित्रकाराकडे अधिक निरखून पहात होत्या तें न सांगणें बरें. डोक्यावर भल्या मोठाल्या माशांची एक एक जोडी असूनहि ज्याअर्थीं त्या ताटकळून उभ्या होत्या त्याअर्थीं त्या जें कांहीं पहात होत्या त्यांत त्यांचें मन विलक्षण रमलें होतें येवढें मात्र खचित. त्या मंडळींत म्हातारा होता त्याचे डोळे जवळ जवळ गेल्यासारखे दिसत होते. तरीहि डोळे किलकिले करून तो केशवकाकांच्या हातांतल्या चित्रफलकाकडे पहातच होता, आणि कसल्याशा हिरव्या पानांत तंबाखू गुंडाळून तयार केलेला घरगुती चिरूट ओढण्याचें त्याचें काम सारखें चालूच होतें.

केशवकाकांना अर्थात् या मंडळींची दादहि नव्हती. ते आपल्या रंगकामांत रंगून गेले होते. समोरच्या देखाव्यांतली एकेक रंगलहरी हस्तगत करण्यानें त्यांना जो अवर्णनीय आनंद होत होता तो कलेच्या उपासकावांचून दुसऱ्या कोणाला कळवायचा नाहीं, पणजीहून येणारा रस्ता धेनुकुंजाच्या आवारांत शिरण्यापूर्वीं जो मिऱ्या घाट म्हणून पांच सहा मैलांचा मोठा घाट लागतो त्याच्या माथ्यावर रस्त्याच्या कडेपासून पांच सहा पावलांवर एका शिळेवर ते बसले होते. त्यांच्यापुढें खोल दरी पसरली होती, व तिच्या पलीकडे सपाटीवरचा एक विस्तीर्ण पट्टा दिसत होता. त्या बाजूसच पश्चिमेचें क्षितिज व धेनुकुंज बंदराची एक बगल असल्यामुळें या सूर्यास्ताच्या वेळीं तिकडे अवर्णनीय शोभेला भरती आली होती. घाटमाथ्यावर बसून पाहणाराला तीन चार मैल दूरच्या बंदरांतल्या वस्तू निरनिराळ्या दिसण्याऐवजीं त्यांचा एक झुपका झाल्यासारखा दिसत होता, आणि त्या सबंध झुपक्यावर कलंडत्या सूर्याची सुवर्णप्रभा सांडल्यामुळें बंदरांतल्या त्या वस्तू पृथ्वीवरच्या नसून कोठल्या तरी दिव्य लोकांतल्या आहेत असा भास होण्यासारखा होता. बंदराच्या अलीकडे दृष्टि टाकली कीं उतरत्या जमिनीवरचीं खाचरें आणि ताडामाडांचीं बनें

एखाद्या कुशल स्त्रीनें आपल्या गौरीपुढें मांडलेल्या कृत्रिम वस्तूंप्रमाणें व्यवस्थित व छोटीं छोटीं दिसत होतीं. मावळत्या सूर्यानें त्यांच्यावरहि आपलीं किरणें पसरलीं होतीं, व तीं दिसतांच विश्रान्तीस जाण्यापूर्वी आपल्या कलाकुसरीच्या सुबक वस्तूंवर रेशमी वस्त्र टाकणाऱ्या कारागिराची कल्पना मनांत येत होती. दूरच्या त्या सूर्यकिरणांची पांखर दरींतल्या वृक्षांवरहि पडली होती, पण तेथें अंधकारांत मिसळल्यामुळें त्यांची कनककान्ति नाहींशी होऊन तीं क्षीण आणि धूसर दिसत होतीं, व त्यामुळें दरीच्या गंभीर देखाव्याला अधिकच गंभीर स्वरूप प्राप्त झालें होतें !

हा देखावा पहातांच केशवकाकांच्या हृदयांत अनंत भावना उसळल्या, अनेक अस्पष्ट विचार हालल्यासारखे झाले, आणि अनेक कल्पनांची खळबळ झाली. त्या दृश्याची बहार लुटून आपल्या चित्रफलकावर ती वर्तवावी अशी जबर लालसा तर त्यांना झालीच, पण तें दृश्य पहातांच त्यांच्या अंतःसृष्टींत जें कांहीं उचंबळून आलें तेंहि आपल्या चित्रद्वारें व्यक्त करण्याची विलक्षण ओढ त्यांच्या जिवाला लागली. ते एका सोईस्कार शिळेवर बसले, आणि त्यांनीं आपली रंगांची किमया सुरू केली. त्यांना वेळाचें भान राहिलें नाहीं; मग भोंवतालच्या त्या विचित्र घोळक्याकडे कोठचें त्यांचें लक्ष जायला ?

तितक्यांत पणजीच्या बाजूनें रोजची मेल मोटार आली. घाटमाथ्याच्या अलीकडलें वळण घेऊन ती धांपा टाकीत चढली, आणि केशवकाकांभोंवतीं जमलेली मंडळी अगदीं ऐन रस्त्यावर उभी असलेली ड्रायव्हरला दिसल्यामुळें त्यानें मोठमोठ्यांदा इशारा दिला,

“ पों पोंऽ ! पों पोंऽ ! टयँ टयूंऽह ! टयँ टयूंऽह ! गर्र्र् ! गर्र्र् पोंऽ ”

केशवकाकांभोंवतालची मंडळी लवकर शुद्धीवर न आल्यामुळें ड्रायव्हरनें शक्य तितक्या प्रकारें आपल्या शिंगाचे आवाज काढून ओरडा केला होता. शेवटीं मोटार अगदींच जवळ आल्यावर ती मंडळी आरडतओरडत पांगली. केशवकाकांनीं मान वळवून पाहिलें.

मोटारड्रायव्हरजवळच्या सीटवर बसलेला इसम एकदम ओरडला,

“ काका ! ओहो ! वा ! ”

आणि “ जरा उभी करा हो ” असें ड्रायव्हरला म्हणून त्यानें गाडीचा वेग कमी होतांच खालीं उडी टाकली.

काकांची मुद्रा विस्मयानें व आनंदानें प्रफुल्लित झाली व त्यांनीं म्हटलें,

"सुधीर! शाब्बास! अरे पत्रबित्र—तार तरी करायची होतीस—"

"अहो, काल सकाळीं अकरापर्यंत कल्पना नव्हती साहेब रजा देईल म्हणून. पण काल एकदम खुषींत येऊन स्वारी म्हणाली, आठ दिवस रजा देतों तुला, जाऊन ये कुठं जायचं आहे तें. मग घरीं जाऊन, आईला दादांना विचारून मेल गांठतां गांठतां काय धांदल उडाली विचारूं नका! त्या धांदलींत तार-ऑफिसांत जायला वेळ तरी कुठला! अन् स्टेशनवरून तार करायची तर तुमच्या या गांवाला स्टेशनच नाहीं!—शिवाय, तुम्हांला एकदम चकित—"

"हो हो, झालं तेंहि वाईट नाहीं! अन् या जागीं आपली अकस्मात् गाठ पडली ही तर फारच मजा!—बरं आतां असं—या गाडींतच मी येतों. काय रे ड्रायव्हर, धेनुकुंजाचं जकातनाकं आहे ना, तिथं जायचं आहे मला, काय घेणार?"

"आपल्याला काय सांगायचं साहेब? द्याल तें." असें म्हणून मोटारवाला हंसला.

काकाहि हंसले. त्यांनीं आपलें सामान गोळा केलें, सुधीरनें त्यांना हातभार लावला, व ते दोघेहि गाडींत चढून जवळ जवळ बसले.

मोटार थांबल्याचा फायदा घेऊन मोटारवाल्यानें सिगारेट शिलगावली होती तिचे दोन मनसोक्त झुरके मारून त्यानें ती फेकून दिली आणि गाडीचा ब्रेकचा दांडा पुढें करीत व पेट्रोलच्या पायंड्यावर पाऊल दाबीत म्हटलें,

"हां, चल बेटा."

केशवकाका व सुधीर यांजकडे त्या मोटारींतले उतारू जसे विस्मयाचे कटाक्ष टाकीत होते तसेच वाचकहि जरा विस्मयानेंच मनाशीं म्हणत असतील, एकदम या भागांत कुठें भेट होत आहे आपली आणि या चुलत्यापुतण्यांची! म्हणून कथानक पुढें चालू करण्यापूर्वी कांहीं गोष्टी सांगितल्या पाहिजेत.

धेनुकुंजला जाण्याचा काकांचा बेत होता व त्यांनीं आपल्याबरोबर येण्याविषयीं सुधीरला विचारलें होतें हें वाचकांस माहीत आहेच. पुढें लक्ष्मीबाई नवज्वरानें आजारी पडल्यामुळें सुधीर दहापंधरा दिवस काकांकडे जाऊं शकला नाहीं. नंतर तो त्यांना भेटला तों त्यांची धेनुकुंजला जावयाची सगळी जय्यत तयारी झाली होती व ते तिसऱ्या दिवशीं मुंबईहून निघणार होते. त्यांनीं आपल्याबरोबर निघण्याचा सुधीरला आग्रह केला. पण अनेक कारणांमुळें तें शक्य नव्हतें. एक तर त्याची आई नुक्तीच कोठें दुखण्यांतून उठली होती

त्यामुळें आणखी कांहीं दिवस घरांतून बाहेर जाण्यास त्याचें मन तयार नव्हतें. दुसरें, ब्राउनिंगसाहेबाकडून अशी हुकमी रजा मिळणें जवळ जवळ अशक्य होतें. आणि शिवाय जयंत त्याच्याकडे पाहुणा येणार होता, म्हणून त्यानें काकांना सांगितलें कीं, 'तुम्ही जा, मला येतां येत नाहीं, दुसऱ्या एखाद्या ट्रिपच्या वेळीं मी तुमच्याबरोबर येईन.' पण सुधीरनें धेनुकुंजाकडचा रम्य प्रदेश पाहिलाच पाहिजे असा केशवकाकांचा कटाक्ष होता, व म्हणून शेवटीं असें ठरलें कीं त्यांनीं सकीनासह जाऊन धेनुकुंजास तळ द्यावयाचा, व सवड होतांच व ब्राउनिंगसाहेब प्रसन्न होतांच मिळेल तेवढी रजा घेऊन सुधीरनें मागाहून जावयाचें.

केशवकाकांना धेनुकुंजास येऊन पंधरवडा होऊन गेला तरीहि सुधीर आला नाहीं, व येण्याच्या खटपटींत आपण आहोंत अशाबद्दल त्याचें पत्रसुद्धां आलें नाहीं तेव्हां काका बरेचसे निराश झाले. एके दिवशीं रात्रीं जेवतांना ते सकीनाला म्हणाले,

"सुधीर आतां येईलसं कांहीं चिन्ह दिसत नाहीं. तो आला असता कीं मला फार बरं वाटलं असतं."

मलबारी थाटाच्या खोपट्यांत हें बोलणें चाललें होतें व काकांनीं हे उद्गार काढले तेव्हां घासलेटच्या एका खेडवळ दिव्याचाच काय तो प्रकाश त्यांच्या तोंडावर पडला होता. पण तेवढ्यांतहि त्यांचा चेहरा एकदम कष्टी झाल्याचें सकीनाला स्पष्ट दिसलें.

तिनें कांहींच उत्तर केलें नाहीं. एका पातेल्यांतला कायसा पदार्थ ती चुलीवर पळीनें ढवळीत होती त्यांतली एक पळी घेऊन तिनें काकांच्या पानावर वाढली. ती वाढून ती दूर होत होती तोंच काकांनीं विचारलें,

"कां? बोलत नाहींस? विचार कसला करीत आहेस?"

"सुधीरवरच्या आपल्या अमर्याद प्रेमाचा विचार करीत होतें." सकीनानें चटकन् उत्तर दिलें.

"कां, तुला त्याचा मत्सर वाटूं लागला कीं काय?"

"मुळींच नाहीं. तुमच्याइतकाच मलाहि तो प्यार वाटतो. त्याला पाहिलं कीं माझ्या स्वभावांतलं सारं वात्सल्य जागृत होतं. तो आला नाहीं तर माझीहि फार निराशा होईल."

याप्रमाणें काका व सकीना दोघेहि सुधीरची प्रतीक्षा करीत होतीं व निराश व्हावयाच्या बेतांत होतीं त्यामुळें सुधीर अनपेक्षितरीत्या दिसतांच घाटमाथ्यावरच्या जागीं काकांना जसा अतिशय आनंद झाला, तशीच सकीनाहि खोपटाच्या अंगणांत त्याला पहातांच अत्यंत आनंदली.

ती लगबगीनें दाराशीं आली व म्हणाली,

" ओहो ! अखेर चंद्र उगवला म्हणायचा एकदाचा ! "

मलबारी खोपटाच्या ठेंगण्या दारांत ती उभी असल्यामुळें तिला वांकावें लागलें होतें, वरची चौकट डोक्याला लागेल या भीतीनें तिनें डावा हात माथ्यावर ठेवला होता, आणि वर सांगितलेला उद्गार काढतांना आनंद व आश्चर्य व्यक्त करण्यासाठीं तिनें आपला उजवा हात पुढें पसरला होता. लहान मुली चक्कापाणी खेळतांना वांकतात त्याची तिला पाहून सुधीरला आठवण झाली, तिनें केलेली ' चंद्र ' शब्दावरची कोटि ऐकून त्याला आनंद झाला, आणि तिचे कटाक्ष आणि हास्य पाहून तर त्याला वाटलें याहून अधिक प्रेमाचें स्वागत तें कोणतें असणार ?

हंसत व विनोदाचीं उत्तरें प्रत्युत्तरें करीत चहा झाल्यावर सकीना पाकसिद्धीस लागली, आणि काका व सुधीर अंगणांत एक खाट होती तिच्यावर गप्पा मारीत बसल. सुधीर काकांशीं व सकीनाशीं नेहमींप्रमाणेंच मनसोक्त बोलत होतासें दिसलें खरें, पण आपल्या चित्तवृत्तीवर कांहीं एका विलक्षण स्तब्धतेचें पटल आलें आहे असें त्याचें त्यालाच वाटत होतें. यापूर्वी असली वनश्री त्यानें कधींच पाहिली नव्हती; शहरांतलीं विविध दृश्यें पहावयास सरावलेल्या त्याच्या दृष्टीला सृष्टीचा हा देखावा केवल रमणीयच नव्हे तर चमत्कृतिपूर्ण वाटून त्याचें चित्त दबकल्यासारखें झालें होतें. लोंढयाची हद्द ओलांडून तिनई घाटाच्याजवळ आल्यापासूनच सृष्टीचें अगदीं नवीन, अपरिचित असें मनोहर स्वरूप त्याच्यापुढें खुलें झालें होतें, व तेव्हांपासूनच कांहीं न बोलतां स्तब्ध बसावें आणि या शोभेची मजा लुटावी अशी एक विचित्र वृत्ति त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. मिऱ्या घाट सुरू झाला व धेनुकुंजाच्या सीमेंत गाडी शिरली त्यानंतर तर अधिकच मनमोहक, गंभीर आणि उदात्त अशी वन्यशोभा दशदिशांना विखुरलेली त्याला दिसूं लागली, व त्याच्या वृत्तीचा सुंदपणा वाढतच गेला. आणि आतां काकांच्याजवळ तो खाटेवर बसला त्या वेळींहि एखाद्या

अभिष्टासारखेंच त्याला वाटत होतें. तो बसला होता तेथें सभोंवार नारळीच्या उंच वृक्षांच्या रांगा लागून राहिल्या होत्या. पश्चिमेच्या बाजूचें क्षितिज त्या वृक्षांच्या फटींतून दिसत होतें तें अंधार झाल्यामुळें अस्पष्ट, आणि खिन्न भासत होतें; आणि समुद्राच्या पृष्ठभागावर फिरणाऱ्या पडावांतील माणसें काळ्या कागदाच्या आकृति कातरून मांडाव्या तशीं वाटत होतीं. पूर्वक्षितिजावर चंद्र उगवायला अजून बराच अवकाश असल्यामुळें तिकडच्या टेंकड्या अतिशयच अंधुक दिसत होत्या; आणि त्यांच्या अलीकडे आसपासच्या घरांतल्या दिव्यांचा मंद प्रकाश व प्रकाशाच्या वलयांत कृष्णदेही उभ्या राक्षसांप्रमाणें वाटणारे सरळ-सोट वृक्ष यांखेरीज कांहींच दिसत नव्हतें. या दृश्याकडे पाहून त्याच्या चित्तावरचें स्तब्धतेचें पटल अधिकच दाट झालें व किती वेळ तरी तो कांहींच बोलला नाहीं.

काकांनीं विचारलें,

" काय ? मुंबईची बातमी काय आहे ? "

या प्रश्नानें तो भानावर आला. एकदां त्याला वाटलें आपल्या अंतःकरणाची जी विलक्षण स्थिति झालेली आहे ती काकांना सांगावी. त्या हेतूनें त्यानें एक दोन शब्द उच्चारलेहि. पण तत्क्षणीं त्याला कळून आलें कीं जें सांगावेसें आपल्याला वाटत आहे तें सांगणें सोपें नाहीं. स्वप्नांत भिणारा मनुष्य ओरडण्यासाठीं धरपड करूं लागला म्हणजे जशी आपली वाचा नाहींशी झाली आहे असा त्याला त्याच स्वप्नांत भास होतो तद्वत् आपलें झालें आहे हें तो उमजला. मग त्यानें तो नाद सोडून दिला आणि म्हटलें,

" मुंबईची होय ?—किती तरी बातमी आहे. "

" होय ?—काय काय ?—मुंबईस एखादा धरणीकंपाचा धक्का बसला किंवा समुद्राला पूर आला असली कांहीं आणली आहेस कीं काय बातमी ? "

" मुंबईच्या कांहीं नाहीं पण माझ्या मनाला धरणीकंपाहूनहि जबर धक्के बसून माझ्या विचारांच्या उतरंडी कशाहि ठेवल्या तरी गडगडाव्या अशा गोष्टी आमच्या घरांत घडल्या आहेत. त्या तुम्हांला सांगायच्या आहेत. "

" असं ? "

" हो. " असें म्हणून सुधीरनें दूरच्या त्या पश्चिम क्षितिजाकडे पुन्हां नजर टाकली, तों तेथील आकाशावर छोट्या छोट्या काळ्या ढगांची चितार झालेली

त्याला दिसली, व त्या देखाण्यांतली मघांची खिन्नपणाची लकेर बळावल्यासारखें त्याला वाटलें. तिकडेच तो पहात राहिला.

त्यामुळें काका म्हणाले, " सांग ना. "

मग मान हालवून " खरंच. " असें तो उद्गारला व सांगूं लागला.

त्यानें आपल्या आईच्या दुखण्याची सारी हकीगत सांगितली, आणि मग माईच्या पत्राबद्दल आणि जयंत बडोद्याहून त्याच्याकडे चार दिवस आला होता त्याबद्दलहि सगळें सांगितलें. काकांवर त्याचें निःसीम प्रेम होतें आणि कोणतेंहि लहान मोठें दुःख झालें असतां तें काकांच्याजवळ उघड केलें कीं त्यांनीं उलट कांहीं सांत्वन केलें न केलें तरी मनाला बरें वाटावें असा त्याचा नेहमींचा अनुभव होता. म्हणून गेल्या महिनाभराच्या अवधींत दादांच्या वर्तनानें आपल्या मनांत विचारांचे विरोधी प्रवाह कसे सारखे खळखळूं लागत होते त्याचें सविस्तर वर्णन त्यानें या वेळीं काकांजवळ केलें, व शेवटीं म्हटलें,

" दादांच्याबद्दल मी कांहींहि बोललों तरी माझी पितृभक्ति चळली असा संशय तुम्ही घेणार नाहीं ही माझी खात्री आहे म्हणूनच त्यांच्याबद्दल मनांत येणारे वावगे विचारहि मीं तुमच्याजवळ उघड उघड सांगितले. खरंच, माझ्या मनाचा मोठा गोंधळ उडतो—"

" सुधीर, तुला मी सांगूं ? " असें म्हणून काकांनीं आपल्याकडे अतिशय निरखून पाहिलें असें सुधीरला वाटलें. तो नुसतें म्हणाला,

" काय ? "

" केव्हां तरी ही गोष्ट तुला सांगावी लागणारच आहे." काका म्हणाले, " अन् ती सांगायचं पाप मलाच करावं लागणार आहे. पितृभक्तीसारखी उज्ज्वल भावना दुसरी नाहीं अन् तिला अमंगल स्पर्श करण्याचा माझा यत्किंचित्‌हि हेतु नाहीं. पण तुझ्या मनाचा गोंधळ कां उडतो आहे तुला कळत नाहीं ?—"

" कां ? "

" साध्या शुद्ध विवेकाला जें पटणं त्रिकालींहि शक्य नाहीं तें केवळ तुझ्या दादांच्या कृतींत तुला दिसतं म्हणून तूं पटवून घ्यायचा प्रयत्न करतो आहेस !— समजलास ? संस्कृतींत जुनी अन् नवी असा भेद करून त्याबद्दल कोणी हटवाद धरून बसलं कीं मला हंसूंच येतं. संस्कृति संस्कृति म्हणजे काय ? परिस्थितीचा ताप न होतां तिच्या प्रकाशाचा उपभोग मात्र घेतां यावा म्हणून चालीरीतींची

जी एक छत्री आपण हातीं धरतों ती. सूर्य बदलला कीं आपण छत्रीचा झोंक पालटीत नाहीं कां ? संध्याकाळीं सूर्य पश्चिमेला आला तरी सकाळच्या जुन्या तऱ्हेनंच मी छत्री धरीन म्हणणारा शहाणा का ? हट्टानं छत्री पूर्वेस धरून क्लेश सोसण्याचा करार त्यानं दाखवला म्हणून त्याचं मत नाहीं कांहीं बरोबर ठरत ! छे ! दादाचा करार म्हणजे एक सद्गुणच खरा. पण त्यांत दुःखाचीं बीजं सांठलीं आहेत ! माईच्या आयुष्याचं मातेरं झालंच कीं नाहीं ? तूंहि असा बावरलास कीं—"

पुढें काका बोललेच नाहींत.

तितक्यांत सकीना आंतून बाहेर आली व जेवायला उठण्याची तिनें सूचना दिली.

रात्रीं सुधीरला झोंप लवकर लागली, पण पहिली झोंप संपून तो कशानेंसा जागा झाला त्यानंतर त्याचा डोळा लागेना. त्याच्या मनांत कांहीं विचार चालले होते असेंहि नाहीं, पण झोंप येईना खरी. शेवटीं त्यानें पुरते डोळे उघडले. खिडकीच्या वरच्या उघड्या जागेंतून चांदण्याचा एक रुंद पट्टा आंत आलेला त्याला दिसला. तो चटकन् उठला व त्यानें खिडकी उघडून बाहेर पाहिलें तो लखलखीत चंदेरी मुलाम्यांत सारी सृष्टि बुचकळून काढल्यासारखी दिसत होती. त्याच्यानें राहवेना. त्यानें दार उघडलें व अंगणांत जाऊन उभें राहून त्यानें सभोंवार दृष्टि टाकली.

तिन्हीसांजच्या वेळची ती मळल, अंधुक, खिन्न सृष्टि कोठें उरली होती ? ती पार अदृश्य होऊन जिकडे तिकडे धवल ज्योत्स्ना सांडेतों भरली होती. नारळीच्या झाडांच्या गर्दींत चांदण्याच्या अनंत आकृति जमिनीवर दिसत होत्या. बंदराकडच्या बाजूस समुद्राच्या जलपृष्ठावर पडलेलें चांदणें लाटांबरोबर हिंदकळून नाचत होतें. पूर्वेकडच्या व दक्षिणेकडच्या टेंकड्या ज्योत्स्नाप्रवाहांत खुशाल न्हात होत्या, आणि जलक्रीडा करणाऱ्या हत्तींनीं मधून मधून समाधानाचे फूत्कार काढावे तद्वत् पश्चिमेकडच्या लाटांच्या ध्वनींचे मंद प्रतिध्वनि त्या टेंकड्यांतून उठत होते. त्या बाजूला आंब्याचे व वडाचे जुनाट वृक्ष होते ते कितीहि संकटें आलीं तरी न चळणाऱ्या धीरोदात्त पुरुषांप्रमाणें निश्चल उभे असलेले दिसत होते. वारा इतका हलक्यानें येते होता कीं तो वारा आहे, कीं वनदेवतेचें तें एकान्तांतील-स्वरूप पहाण्यासाठीं पाऊल पुढें टाकणाऱ्या माणसाला " स् ! मागं

फिर ! " असा इशारा देणाऱ्या पहारेकऱ्याची ती कुजबुज आहे असा क्षणभर भ्रम पडत होता. चांदणें जसें चहूंकडे तुडुंब भरलें होतें तशीच एक प्रकारची विलक्षण शान्तता जिकडे तिकडे कांठोकांठ भरलेली भासत होती.

सुधीर हें सारें पहात राहिला. पहात राहिला म्हणण्यापेक्षां अनुभवीत राहिला म्हटलें पाहिजे. नुसत्या नेत्रांनींच नव्हे तर साऱ्या पंचेंद्रियांनीं त्या दृश्याशीं तो तद्रूप झाला. त्या अवर्णनीय अनुभवानें होणाऱ्या आनंदाच्या भरांत त्याला आपल्या मनांतल्या सगळ्या शंकाकुशंकांचा विसर पडला. किंबहुना त्याला वाटलें संस्कृति जुनी कसली आणि नवी कसली ? हे भेद कृत्रिम आहेत, खोटे आहेत. या दिव्य सृष्टीचें अनंतत्व हेंच काय तें सत्य, आणि या अनंतत्वांत विलीन होण्यास साहाय्य करणारे हेतू म्हणजेच खरी संस्कृति. असल्या हेतूंत प्रेम हें अग्रगण्य नाहीं काय ?

हा विचार मनांत यायला आणि आपल्या खांद्याला एका कोमल हाताचा स्पर्श झाला आहे असें सुधीरला वाटायला एकच गांठ पडली. त्यानें मागें वळून पाहिलें तों एक अत्यंत लावण्यवती स्त्री आपल्याकडे आर्जवी दृष्टीनें पहात आहेसें त्याला वाटलें. तिच्या केशभारापैकीं कांहीं केंस तिच्या कपाळावर रुळत होते आणि त्यामुळें तिचे तेजस्वी डोळे अधिकच खुलून दिसत होते.

तें दिसतांच सुधीर चमकला, दूर सरकला व हलकेंच म्हणाला,—

कांहींच म्हणाला नाहीं.

कारण जें दिसलेसें त्याला वाटलें तें लगेच दिसेनासें झालें.

तो सारा नुसता भास होता !

# प्रकरण ६ वें



## घाटमाथ्यावर दिसलेली व्यक्ति



दुसऱ्या दिवशीं सुधीर रोजच्या संवयीच्या वेळेपेक्षां लवकर जागा झाला. खिडकीवरच्या उघड्या जागेंतून रात्रीं जसें चांदणें आंत आलें होतें तसा अजून क्षितिजाखालींच असलेल्या सूर्याचा मंद प्रकाश या वेळीं खोलींत शिरला होता. रात्रींच्या चांदण्याहून या प्रकाशाचा आपल्या मनावर कांहीं वेगळाच परिणाम होत आहे असें सुधीरला वाटलें, तें चांदणें उन्मादक होतें, हा प्रकाश उपशामक वाटत होता. चांदण्याचीं किरणें कामशरांसारखीं हृदयाला जाऊन भिडत होतीं, या प्रकाशाच्या सौम्य धारांनीं बुद्धि धुतली जात आहेसा भास होत होता. तें चांदणें कामिनीच्या लडिवाळ शब्दांसारखें होतें, हा प्रकाश तपस्व्याच्या उपदेशवाणीसारखा होता. दोहोंपैकीं जीवाची अनामिकी तहान भागविण्याचें अधिक सामर्थ्य कशांत आहे, असा प्रश्न सुधीरच्या मनांत आला, व त्या प्रकाशाकडे पहात व मनाशीं विचार करीत तो किती तरी वेळ तसाच अंथरुणांत पडून राहिला.

पण त्याच्या मनाचा निश्चय होईना.

शेवटीं अंगावरचें पांघरूण दूर टाकून तो उठला. त्यानें खिडकी उघडली व चूळ भरून टाकून बाहेर पाहिलें. वारा अगदीं बंद असल्यामुळें वृक्षांच्या फांद्या अगदीं निश्चल होत्या. जणूं ते सारे वृक्ष त्याच्या काकांच्या चित्रांतले रंगवलेले वृक्षच होत. पक्षी डोळ्यांपुढें फारसे दिसत नव्हते, पण त्यांचे अनेक स्वरांतले विविध शब्द मात्र ऐकूं येत होते, व त्यांतच किनाऱ्यावरील लाटांच्या गंभीर ध्वनीचा अस्पष्ट अवशेष मिसळल्यासारखा वाटत होता. जवळपास फारशी फुलझाडें किंवा फुलवेली दिसत नव्हत्या, परंतु आसमंतात् अनंत रानफुलें फुललीं

असलीं पाहिजेत, कारण हवेंत जिकडे तिकडे एक विलक्षण मत्त गंध दरवळला होता.

सुधीर तसाच किती वेळ तरी खिडकींत उभा राहिला. उजवीकडच्या सैंपाकाच्या खोलींत सकीनाच्या हातचीं भांडीं वाजत होतीं तीं त्याला ऐकूं येत होतीं. तिची चाहूल केव्हांपासून तरी त्याच्या कानावर येत होती. एखाद्या दक्ष गृहिणीला साजणारी तिची ही तत्परता त्याला मोठी कौतुकास्पद वाटली.

तितक्यांत सकीनाच दारांत आली व तिनें हंसत हिंदुस्थानींत विचारलें,

" तुम्ही चहा आधीं घेणार काय ? "

" कां ?—काका ? "

" त्यांना उठायला वेळ लागेल. म्हणून म्हणतें—"

" नको. ते उठेपर्यंत मी त्यांचीं सारीं चित्रं पहातों. कालपासून तीं केव्हां पाहिनसं झालं आहे मला."

" ठीक ठीक " असें म्हणून सकीना हंसली, व मग सुधीर व ती दोघें मिळून डावीकडच्या खोलींत गेलीं.

तेथें आठ दहा चित्रफलक रंगून तयार झालेल्या स्थितींत काळजीपूर्वक ठेवलेले होते. त्यांतलें एकेक चित्र घेऊन व त्याच्यावरचें उंची वस्त्राचें आवरण दूर करून तीं सारीं चित्रें सकीनानें नीट प्रकाश साधून सुधीरसमोर मांडलीं.

सुधीर त्या एकेका चित्राकडे निरखून पाहूं लागला तों त्याच्या मनांत कौतुकाचा गहिंवर दाटून आला. काकांचें अलौकिक कौशल्य अखिल हिंदुस्थानांत मान्य झालें तें उगीच नाहीं असें त्याला वाटलें ! हें एकेक चित्र म्हणजे नुसती प्रतिमाच नव्हती, तर एकेक जिवंत काव्यकृति होती. त्यांत नुसत्या बाह्यसृष्टीचें ऐश्वर्यंच सांठवलेलें नव्हतें, तर सौंदर्यदर्शनाच्या वेळीं प्रेक्षकाच्या अंतरंगांत कधीं कधीं उद्भवणारी अनुपमेय शान्ति आणि कधीं कधीं उसळणारे भावनांचे कल्लोळ हींदेखील रंगलहरींच्या रूपांत स्पष्ट दाखविलीं होतीं. वनश्रीची शोभा पाहून काल आपल्या चित्तवृत्तींची जी अवस्था झाली व जी आपल्याला काल काकांजवळ बोलून दाखवितां येईना ती या एकेका चित्रांत काकांनीं बहारीनें विशद करून दाखविली आहे असें सुधीरच्या मनांत आलें; व सौंदर्याचा उपभोग घ्यावयाची पात्रता जरी सगळ्याच रसिकांच्या अंगीं असते तरी त्या उपभोगाच्या वेळीं चित्तवृत्ती कशा थरारतात त्याचा प्रत्यय दुसऱ्यांस आणून देण्याची दिव्यशक्ति

फक्त कवि, चित्रकार, गायक अशा कलेच्या निःसीम उपासकांसच प्राप्त होते याचा त्या क्षणीं त्याला पुरता उमज पडला.

सकीनानें विचारलें, " छान आहेत ना ? "

तेव्हां तंद्रींत असल्यासारखें करून तो म्हणाला, " छे ! कमाल आहे काकांची ! " आणि असें म्हणून त्यानें काकांकडे वळून पाहिलें.

त्याच वेळीं काका जागे झाले.

सुधीर व सकीना चित्रांची रांग मांडून उभे आहेत असें पहातांच ते हंसून म्हणाले,

" वा ! छान उद्योग काढला आहे रामप्रहरचा ! "

त्यांनीं उशागतची पेटी घेऊन सिगारेट शिलगावली व काड्याची पेटी सकीनाच्या अंगावर फेंकून हंसत ओरडून म्हटलें,

" चहा ! "

" मेरी कसम्" असें कांहींसें उद्गारत सकीना पळाली व थोड्याच वेळांत चहा घेऊन आली.

मिऱ्या घाटाच्या माथ्यावरच्या जागीं बसून सुरू केलेलें चित्र पुरें करावयासाठीं केशवकाकांना आज पुन्हां तेथें जावयाचें होतें. काका काम करीत असतां सुधीरला पहावयाचेंच होतें, व सकीनाहि धेनुकुंजला आल्यापासून फारशी हिंडली नव्हती. म्हणून सर्वांनींच आज तिकडे जावें, दुपारीं वनभोजन करावें नंतर काकांनीं चित्र पुरें करावें व संध्याकाळच्या मोटारनें सर्वांनीं परत यावें असा बेत सुधीरनें सुचविला व तो काकांना व सकीनाला तावडतोब पसंत झाला. मग वनभोजनाच्या दृष्टीनें सकीनानें साहित्याची व भांड्यांची तयारी केली, काकांनीं नेहमींप्रमाणें आपलें सामान घेतलें, व हें त्रिकूट भाड्याच्या मोटारींत बसून निघालें.

तो सबंध दिवस या मंडळींनीं फार मजेंत घालविला. काकांचें चित्रहि पुरें झालें, व मग हीं तिघें पणजीहून रोज येणाऱ्या मेल मोटारीची वाट पहात गप्पा मारीत बसलीं.

काकांनीं सिगारेट न शिलगावतां खिशांतून आपली विलायती चिलीम काढली व त्यांत तमाखू भरून ती पेटविली.

तें पहातांच सकीना सुधीरला म्हणाली,

" आजच्या चित्राचं काम यांच्या स्वतःच्या मनाजोगतं झालं आहे."

" होय ?—कशावरून ?—" सुधीरला आश्चर्य वाटून त्यानें हंसत विचारलें.

" मी सांगतें आपली—तुम्ही हो म्हणा." ती डोळे मिचकावीत काकांकडे पाहून म्हणाली.

" तरी पण ? " सुधीरनें पुन्हां विचारलें.

" सांगू ? जेव्हां जेव्हां काम मनाजोगतं होतं तेव्हां तेव्हां सिगारेट न ओढतां यांनीं 'पैप' ओढलेली मीं पाहिली आहे."

या तिच्या बोलण्यानें सर्वचजण हंसलीं व पाइप या इंग्रजी शब्दाचा 'पैप' असा जो लाडका हिंदुस्थानी अपभ्रंश तिनें केला त्याची गंमत वाटून काका व सुधीर जास्तच हंसले.

अशा प्रकारें गमतीच्या बोलण्यांत त्यांचा बराच वेळ गेला, व मोटारची रोजची वेळ टळून गेली तरी ती येण्याचें चिन्ह दिसेना तेव्हां तीं तिघें जरा काळजींत पडलीं. सूर्यास्त होऊन तिन्हीसांजा टळून गेल्या होत्या, त्यामुळें किर्र् झाडींत घाटमाथ्यावर बसणें फारसें सुखाचें वाटणें शक्य नव्हतें. सकीना विशेष चुळ्बूळ करीत होती, व काका आणि सुधीर मिळून तिच्या घाबरटपणावर कोट्या करून बैठकीचा उल्हास शक्य तेवढा कायम ठेवीत होते. काका पाइप ओढतां ओढतां म्हणाले,

" सुधीर, इथल्या जंगलांत श्वापदांचा उपद्रव फार आहे, माहीत आहे तुला ? "

" हो, असं ऐकलं आहे खरं." सुधीर म्हणाला.

" हं ! समजलं. मला भेवडवायसाठीं काढलं आहे हें बोलणं ! " माना करीत सकीना म्हणाली.

" नाहीं बुवा ! सहज आतां वाघाच्या डुरकणीसारखं कांहींतरी लांबनं ऐकूं आलं म्हणून सुधीरला विचारलं. " काका गांभीर्याचें नाटक करून म्हणाले.

" हो !—वाघाची डुरकणी—खरंच जसं कांहीं ! " असें थट्टेवारी नेत पण मनांत किंचित् घाबरून सकीना म्हणाली.

" खोटं का काय ? " काका म्हणाले, " पण भ्यायचं काय कारण इतकं ? समज आला वाघ, तर तूं काय करशील ?—"

खऱ्याखुऱ्या भीतीनें थरारल्यासारखें करून सकीना म्हणाली,

" मोऽठ्यांदा किंचाळी फोडीन ! मोठ्यानं ओरडलं कीं वाघ पळतो म्हणे ! "

हें ऐकून सुधीर व काका खोखो खोखो करून हंसले. सकीनालाहि हंसू आलें पण त्याच्यावर भीतीचा किंचित् दाब असल्यामुळें तें स्पष्ट उमटलें नाहीं.

हंसणें ओसरल्यावर काका पुन्हां म्हणाले,

" तुझ्याकडे पाहिल्यावर तूं कितीहि ओरडलीस तरी वाघ पळायचा नाहीं. इकडच्या जनावरांना सुंदर माणसांचा फार शोक असतो म्हणे."

" असं कां ?—मग वाघाऐवजीं वाघीणच येईल तर, अन् तुम्हांला दोघांना पाहून तुम्ही दोघंहि देखणे असल्यामुळें याला खाऊं कां त्याला खाऊं असं तिला होऊन ती उभी राहील. अशी ती उभी राहिली कीं मी उठून घालीन तिच्या कपाळांत एक यऽवढा धोंडा ! "

ती तिची कोटि ऐकून आणि " यऽवढा " हा शब्द उच्चारतांना दोन्ही हातांनीं तिनें केलेला आविर्भाव पाहून सुधीर व काका यांना अनावर हंसूं आलें. सुधीर तर पोट धरधरून लोळला आणि या वेळीं मनांतली भीति पार नाहींशी झाल्यामुळें सकीनाहि खूप खूप हंसली.

तितक्यांत घाटाच्या वळणाआडून मोटारच्या शिंगाचा आवाज दोनतीनदां ऐकूं आला त्यामुळें हें हंसणें थांबलें व तिघेंहि जण माना वळवून पाहूं लागलीं. आतां आपली गाडी येणार व आपल्याला जावयास मिळणार या कल्पनेनें सर्वांनाच बरें वाटलें.

पण पाहतात तों वळणाला बगल देऊन चढणारी मोटार भाड्याची मोठी मोटार नसून एक धाकटी खाजगी मोटार होती. मोटारच्या आकारावरून आणि रुबाबावरून कोणा तरी मोठ्या धनिकाची ती होती हें पाहिल्याबरोबर कळण्यासारखें होतें म्हणून आमची ही मंडळी विशेष जिज्ञासेनें तिच्याकडे पाहूं लागली.

मोटार डौलदार रीतीनें चढत खूपच वेगानें वर आली पण अगदीं बरोबर घाटमाथ्यावर ती पोंचली असेल नसेल तोंच " ठ्ठां ! " असा एकदम बार झाला, हांकणारानें ब्रेक दाबला, तरी गाडी दोनचार ढांगा तशीच पुढें फरपटत गेली, " कराँ ! किराँ ! " असे ब्रेकच्या घर्षणानें चाकांचे आवाज झाले, आणि हांकणारी व्यक्ति गुरगुरली,

" तेरी भँ—! अबदुल ? "

तेवढयांत अबदुल खालीं उतरलाच होता. पुढच्या उजव्या चाकाशीं वांकून तो म्हणाला,

" पंक्चर हय सरकार! बहोत बड़ा—"

" सूवर !—"

रस्त्यांतल्या धोंड्यामुळें पंक्चर झाल्यास गरीबाची मोटार असेल तर धोंड्याला पण श्रीमंताची मोटार असेल तर नोकराला दोष पतकरून शिव्या खाव्या लागतात हें अबदुलला माहीत होतेंसें दिसलें. तो आदबीनें म्हणाला,

" कसूर माफी असावी सरकार !—दुरुस्त करतों लवकर—"

" हंः !—" असें कांहींसें हुंकारून हांकण्याचें चाक धरून बसलेला मनुष्य तेथून उठला, खालीं उतरला व त्यानें आपल्यामागें गाडीचें दार लोटलें तें धाड्दिशीं वाजलें.

काका वगैरे मंडळी मोटारच्या दिव्यांच्या प्रकाशाच्या अर्ध्या पट्ट्यांत सांपडली होती त्यामुळें ती त्या गृहस्थाला दिसली असतील, पण तो दिव्यांच्या उलट बाजूस असल्यामुळें त्यांना नीट दिसला नाहीं.

पण तितक्यांत त्यानें सिगारेट पेटवायला म्हणून जळती काडी तोंडापाशीं नेली तेव्हां त्या चेहऱ्यावर प्रकाश पडला व तेवढयांत त्याचें तोंड उभट असून केंस खूप वाढवून मागें वळविलेले, नाक सरळ, जिव्हणी खुनशी माणसासारखी आणि डोळे धुंद असावेत असें वाटलें. तो पुऱ्या उंचीचा माणूस असावा हें अंधेरांतहि नुसत्या त्याच्या आकृतीवरून समजत होतें; आणि चेहरा त्या शरीरयष्टीला साजेसाच भरदार दिसला.

तो गृहस्थ तेथेंच मोटारीच्या पायरीवर एक पाऊल देऊन उभा राहिला. मधून मधून तो सिगारेटचा झुरका घेई व मधूनच अबदुलची धांदल चालली होती तिकडे पाहिल्यासारखें करी. पण खरें म्हटलें तर त्याची दृष्टि प्रकाशांत दिसणाऱ्या तीन मंडळीकडेच लागलेली दिसत होती.

चार पांच मिनिटें याप्रमाणें गेल्यावर तो गृहस्थ एकदम ओरडला,

" अबदुल, मूर्खा तूं करतो आहेस तरी काय ?"

मोटारच्या पुढची सीट उचलून खालच्या पेटींतलीं भाराभार हत्यारें उपसण्याचा अबदुलनें सपाटा चालविला होता, त्या हत्यारांच्या खळखळाटांत

त्याला मालकाचे शब्द ऐकू आले नसावेत, कारण त्यानें आपली झटापट तशीच चालू ठेवली.

" ए गधा ! करतो आहेस तरी काय ? "

अबदुलपेक्षां हें नांव झटकन् ऐकू गेलें.

शोकाचा स्वर काढून अबदुल म्हणाला,

" सरकार,—सरकार—"

" अरे, काय तें सांग कीं—"

" सगळाच घोंटाळा— आतां चाक दुरुस्त कसं करणार ?—"

" कां ? "

" जॉकच नाहींऽऽ " रडवा हेल काढून अबदुल म्हणाला, " गफूरनें काल रात्रीं काढला होता तो परत नाहीं ठेवला वाटतं. आतां जॉक ! "

" हंः !— बेवकूफ—" असें म्हणून अबदुलचा मालक एकदम पुढें झाला व त्यानें अबदुलच्या कमरेंत जी लाथ दिली तिच्यासरसा अबदुल कोलमडून खालीं पडला व त्यानें हातांत घेतलेलीं हत्यारें खाळ् खाळ् अशीं वाजून रस्त्यावर पसरलीं.

मालक म्हणाला,

" तुला कुत्र्यासारखा तुडवावा असं वाटतं आहे. हरामखोर ! गाड्यांवर नोकरी करतां अन् सारीं हत्यारं आपापल्या गाडींत आहे कीं नाहींत याची दाद नाहीं तुम्हांला ! आतां जायचं कसं घरीं वेळेवर ! इथं घाटमाथ्यावर रात्र काढायची पाळी नाहीं आली म्हणजे मिळवली !—बेवकूफ !—"

हें बोलतां बोलतां त्याचा राग वाढत गेला व त्यानें उताण्या पडलेल्या अबदुलच्या कमरेंत आणखी एक लाथ मारली.

अबदुल बिलकुल ओरडला नाहीं. ओरडल्यास मालकाचा संताप अधिक वाढेल हें तो जाणून होता. अजाणतां त्याच्या तोंडून विवळण्यासारखा थोडा आवाज निघाला तेवढाच.

तितक्यांत घाटाखालीं मोटारीच्या शिंगाचा आवाज झाला, आणि थोड्याच वेळांत एक भली मोठी गाडी वळण घेऊन चढली.

ती रोजची मेल मोटार होती.

रस्त्याच्या मधोमध एक गाडी उभी आहे असें दिसतांच ड्रायव्हरनें प्रथम जोराजोरानें शिंगाचा आवाज दिला, पण तितक्यांत त्याच्या गाडीच्या दिव्यांत अबदुलला लाथ मारून उभी राहिलेली व्यक्ति त्याला दिसली, व मग त्यानें ताबडतोब आपली गाडी उभी केली, आणि

" ओः ! अमीरसाब !—"

असें पुटपुटून गाडींतून उतरून धांव मारली.

काका, सुधीर व सकीना ही मंडळी मोठ्या गाडीपर्यंत आली व तींत शिरून बसली. सकाळीं येतांनाच त्यांनीं परत जायसाठीं सीट्स सांगून ठेवल्या होत्या त्यामुळें ड्रायव्हरला विचारण्याची जरूरीच नव्हती. मोठ्या गाडीकडे येतांना अबदुलच्या मालकाच्या अंगावरूनच यावें लागलें, तेव्हां त्यांना अत्तराचा भपकारा आला. सकीनानें वर मान न करतांच त्या गृहस्थाकडे नजर टाकली तों तो आपल्याकडे अगदीं निरखून पहात आहे असें तिच्या लक्षांत आलें. ती रागानें सुधीरच्या आड झाली व तेथून झपकन् पुढें गेली.

मोटारमध्यें बसल्यावर आमच्या या तीन मंडळींना अबदुलचा मालक चांगला न्याहाळता आला. कारण मोठ्या गाडीच्या दिव्याच्या झोतांतच तो उभा होता. त्याच्या पायांत सांबराच्या कातड्याचे बूट होते, पायांत पांढरी सफेत सुरवार होती पण तिचा फक्त मजबूत पोटऱ्यावरचा तंग भाग दिसत होता, कारण त्यानें अंगांत पायघोळ मुसलमानी कोट घातला होता, कोटाचें कापड अस्सल रेशमी व पिवळ्या गुलाबाच्या रंगाचें असून त्यावर जरीच्या तुरळक बुट्टया होत्या, कोटाच्या घट्ट कॉलरीचें तोंड खुलें ठेवलें होतें त्यांतून आंतल्या खमीसाची पहिली गुंडी चकाकत होती, त्यानें उजव्या हाताच्या दोन बोटांत सिगारेट सैलशी धरली होती व त्या बोटांच्या पलीकडच्या बोटावरच्या आंगठींतला खडा हात वर खालीं होई तसा चमक मारीत होता, त्याच्या ओंठावरची मिशी तुरळक पण ऐटबाज होती, आणि त्याच्या एकंदर मुद्रेवर कमालीची मगरूरी आणि धुंदी दिसत होती.

मेल मोटारचा ड्रायव्हर धांवत गेला व त्याच्यापुढें सलाम करून उभा राहिला तेव्हां तो त्याच्याशीं बोलला, तें त्या तशा धुंदींत व मगरूरींतच.

पण तें ऐकतांच तो ड्रायव्हर परत आला, आपल्या गाडींतून त्यानें जॉक नांवाचें यंत्र काढलें व धांवत परत जाऊन जॉक चाकाला लावून कामाला प्रारंभ केला.

तो ड्रायव्हर व अबदुल मिळून काम करीत होते तेवढा वेळ तो तरुण आपल्याच धुंदींत धूम्रपान करीत उभा होता. त्यांचें काम संपलें व त्यांनीं हत्यारेंपात्यारें उचललीं तरी त्याचें धूम्रपान चालूच होतें. शेवटीं अबदुलनें गाडींत चढण्याची विनंति केली तेव्हांहि तो बेफिकिरीनें गाडींत शिरला, आणि ज्या मेलमोटारच्या ड्रायव्हरनें ऐन अडचणीच्या वेळीं त्याला मदत केली होती त्यानें आपल्या गाडीकडे परत येण्यापूर्वीं आदबीनें सलाम केला त्याचा फक्त मानेच्या किंचित् झटक्यानें न बोलतां स्वीकार केलासें करून त्यानें आपली गाडी फुर्र्र्दिशीं वेगानें सोडली.

सारें जग आपली सेवा करण्यासाठींच निर्माण झालें आहे असें समजणाऱ्या वृत्तीचा असा नमुना क्वचितच आढळेल असें तो प्रकार पाहून सुधीरच्या मनांत आलें. त्याच्या शेजारीं एक म्हातारासा मुसलमान बसला होता त्याला त्यानें विचारलें,

"ते कोण?"

त्या म्हाताऱ्यानें उत्तर देण्याऐवजीं सुधीरला न्याहाळून पाहिलें व मग म्हटलें,

"तुला माहीत नाहीं? कुठचा रे तूं?"

अहमदाबादच्या चौकांत उभें राहून गांधींना पाहून "हे कोण?" असें कोणीं विचारलें तर विचारणारा कोठून तरी दूर देशांतून आला असला पाहिजे असें ज्याप्रमाणें लोक तात्काल ठरवतील त्याप्रमाणें त्या म्हाताऱ्यानें "कुठचा रे तूं?" हा प्रश्न केला होता.

त्याच्या त्या प्रश्नाचें तर सुधीरला नवल वाटलेंच, पण त्यापेक्षां त्याच्या एकेरी बोलण्याचें त्याला आश्चर्य वाटलें. पण समुद्रकांठच्या लोकांना अहोजाहो म्हणायची रीत माहीतच नाहीं याचा त्याला थोडासा अनुभव होता म्हणून त्याचा राग न मानतां तो म्हणाला, "आम्ही मुंबईकडले."

"हां, तरीच!"

"ते कोण?"

"सय्यद अमीर."

"अमीर?"

"हां तर! याच्या आजोबाचा सख्खा मावसभाऊ घेनुकुंजाच्या गादीवर होता ना! अमीररक्ताचा हा येवढाच पोऱ्या आतां उरला आहे. पण—पण—"

असें म्हणत त्या म्हाताऱ्यानें मोटार सुरू होऊन आलेला वाऱ्याचा झोत सहन होईना म्हणून अंगावरच्या जुनाट कोटाची कॉलर दोन्ही हातांनीं उचलून आवळली.

तेवढें केल्यावर तो पुढें कांहीं तरी बोलेल अशी सुधीरची अपेक्षा होती. पण म्हातारा गप्पच बसला व त्याला कसें बोलायला लावावें याचा सुधीरला विचार पडला.

पण तितक्यांत काकांनीं आपल्या खिशांतली एक सिगारेट काढून म्हाताऱ्यापुढें धरली व हंसत म्हटलें,

" लीजिये."

म्हाताऱ्यानें मोठ्या आनंदानें ती घेत म्हटलें,

" ओऽहो ! सफेत मेमसाब ! जरूर पिऊंगा ! "

त्या कोटीमुळें सर्वजण हंसले, व आपली कोटी या मंडळींना पटली हें पाहून म्हाताराहि खूष झाला. खुषींत येऊन त्यानें चारपांच मनसोक्त झुरके मारले, व मग छोट्या छोट्या झुरक्यांचे विराम अर्धविराम देत तो सांगूं लागला,

" मीं मघांशीं 'पण--पण--' असं म्हटलं ना, तसं म्हणायचं कारण नसतं तर सध्यद साऱ्या धेनुकुंजाचा लाडका झाला असता. पोऱ्या स्वरूपानं कसा आहे तूं पाहिलाच आहेस !--हाः ! मी माझ्या वयांत असा असतों तर दहापांच बिब्बीजान मला संभाळाव्या लागल्या असत्या !--कां ? हंसलास ? खोटं आहे कां ?--अशा रूपावर कोण भाळणार नाहीं ?--पण अशा रूपाचं एक वाईट आहे तें हें कीं आपल्यावर साऱ्याच स्त्रिया भाळल्याच पाहिजेत अशी माणसाची भलती समजूत होते. ही समजूत म्हणजे सैतानाची चिथावणीच म्हणा !—अन् खूपसुरतीला अपरंपार पैशाची जोड मिळाली कीं--मग सैतानाचा नंगा नाच काय विचारावा ! सारं स्त्रीसौंदर्य आपल्याच उपभोगासाठीं आहे अशा गरुरीनं माणूस वागूं लागतो अन् त्या गरुरीला उलट थप्पड मिळाली कीं त्याचे जे अत्याचार सुरू होतात--मी सांगूं नाहीं अन् तूं ऐकूं नाहींस असलं आहे तें सारं !—आलंच असेल तुझ्या लक्षांत !--हूऽऽऽप् ! आऽऽहा ! फार लज्जतदार आहे बुवा तुझी ही विलायती बिडी ! आणखी काढ एक ! "

काकांनीं खुषीनें एकच नव्हे दोनतीन सिगारेट्स त्याच्या हातावर ठेवल्या. मोटारमध्यें मजेनें वेळ जाण्याबद्दल येवढें मोल द्यायला त्यांची मुळींच ना नव्हती.

" अल्ला तेरा भला करे ! " असें म्हणून म्हाताऱ्यानें दोन सिगारेट्स खिशांत टाकल्या व तिसरी शिलगावून म्हटलें,

" मात्र, मुंबईवाल्या साहेबा, आमच्या सय्यदविषयीं उगीच बिखारून जाऊं नको हो ! तो उनाड अन् छंदी फंदी आहे थोडा--कोण नसतं ? जवानी आहे, चाललंच आहे ! पण एरव्हीं तो गुणी आहे. या टापूंत त्याच्यासारखा निशाणबाज नाहीं. परवांच या मिऱ्या घाटांतल्या खोऱ्यांतच एक सपाट्या वाघ दोनशें यार्डांवरून टिपलान कीं ! नऊ फूट लांबीचं मोकळं जनावर म्हणजे जेवण नाहीं ! त्याचं नुसतं निर्जीव कातडं पाहिलं तर डर वाटते आहे बघणाराला ! जाऊन बघ ना तूं. उमरखानांच्या बंगल्यांत व्हरांड्यांतच टाकून ठेवलं आहे. सय्यदनं गंमतीनं त्यांना दिलं तें.--देणं साहजिक नाहीं का ? त्यांचा तो जांवईच व्हायचा आहे लवकरच !—छान होईल सोयरीक ! मोत्याच्या व्यापारांतले दोन राजे एकत्र होणार म्हणा ना ! सय्यद अमीर आहे अन् आज शेंपन्नास पडावांचा मालक आहे तर उमरखान दौलतीनं सवाई अमीर आहे. इथं या बंदरांतच नव्हे तर कारवार, कोचीन, चारपांच बंदरांत त्याच्या शेंपन्नास पडावांचे ताफे तरंगताहेत !—धेनुकुंजचं सारं वेंचक मोतीं आज त्याच्या अलवाणांत आहे म्हणा ना !—बडी जंगी होणार शादी ! आम्हां गांवच्या लोकांना मोठमोठ्या दावती होतील, इथली ब्रँको नाहीं तर अस्सल विलायती दारू खायला मिळेल !—वा रे सय्यद !—तुला सांगूं ? सय्यद म्हणजे शराब आहे बघा. हवासा वाटतो पण जवळ न करणं बरं ! नकोसा वाटतो पण दूर करवत नाहीं ! आलं ध्यानांत ? हूऽऽऽप् ! वाः !—या खुदा !—अरे भाई, गाडी उभी कर बाबा. मला इथं पिराच्या वाडीवरच उतरायचं आहे ना !—हां—तेवढं तें अंड्यांचं टोपलं इकडे करा मियांजी—बहोत अच्छा ! मुंबईवाल्या साहेबा, आदाब अर्ज, बंदगी ! "

असें म्हणून म्हातारबुवा चालूं लागले व मिनिटभर थांबलेली मोटारहि निघाली. निघतांना तिनें आवाज केला,

" हुस्स्ऽ ! "

जणूं तिनेंहि सुस्कारा सोडला व मनाशीं म्हटलें,

" सुटलें एकदांची म्हातारबुवांच्या टकळींतून ! "

---

# प्रकरण ७ वें



## सुखकारक दुःख



केशवकाका कलेचे उपासक आणि सृष्टिसौंदर्याचे भोक्ते होते, पण त्यांच्या संवयी ऐषआरामाच्या आणि आळसाच्या होत्या. त्यामुळें संध्याकाळीं फिरावयास जायची सुधीरनें गोष्ट काढली कीं "बैस रे, गप्पा मारूं. चहा पिऊं या काय आणखी एकदां ?" हें त्यांचें ठराविक उत्तर असे. दोन दिवस हा क्रम झाल्यावर तिसरे दिवशीं सुधीरनें युक्ति केली. काकांना विचारायचा वेडेपणा न करतां त्यानें कपडे केले, हातांत काठी घेतली आणि म्हटलें,

"काका, मी फिरून येतों किनाऱ्यावर. मीं अजून ती बाजू पाहिलीच नाहीं. परवां तर आपण जाणार इथून. येतों लांब चक्कर घेऊन म्हणजे भूकहि लागेल सणसणीत. अं ?"

काकांनीं त्याची युक्ति ओळखली व हंसून म्हटलें,

"समजलं ! बरं—जा."

सुधीर निघाला तो बंदराच्या रस्त्यानें निघाला.

रस्ता फारसा रुंद नव्हता पण अतिशय स्वच्छ होता. दुतर्फा लहान लहान घरें होतीं पण सारीं घरें रस्त्यापासून आंत बऱ्याच अंतरावर होतीं त्यामुळें दोहीं बाजूंस नारळीच्या छोट्या छोट्या बागाच लागून राहिल्यासारख्या वाटत. हा रस्ता बराच लांबपर्यंत जाऊन मग बंदराच्या हमरस्त्याला मिळत असल्यामुळें येथें रहदारी फारशी नसेच, आणि या वेळीं तर ती अगदींच नव्हती. त्यामुळें वन-शोभेनें शृंगारलेल्या रस्त्यानें एकान्तीं विहार करण्यांत जो विलक्षण आल्हाद असतो तो सुधीरच्या मनांत या वेळीं परिपूर्ण भरला होता. मनांत सुखदायक विचार चालू असले म्हणजे मनुष्य उल्हसित असतो यांत संशयच नाहीं. पण दुसऱ्याहि एक प्रकारचा उल्हास मनुष्याला कधीं कधीं अनुभवास येतो. त्या वेळीं मनांत कसलाच विचार नसतो, सुखदुःखाचे सारे विषयच विरून गेलेले

असतात, आणि जणूं मनाची शुद्ध, सात्विक अवस्था प्रगट होते. या प्रकारचा आनंद जनसंमर्दांत दुर्लभ असतो; शान्त सृष्टिसौंदर्याच्या दर्शनानेंच या आनंदाची प्रतीति एखादे वेळीं येते. आत्तां सुधीरचें मन असल्या आनंदानेंच हलकें झालें होतें, व त्यामुळें तो लांब लांब ढांगा टाकीत, हातांतली काठी गरगर फिरवीत व अस्पष्टशी शीळ घालीत चालला होता.

त्याची शरीरयष्टि उंचट, मजबूत आणि अतिशय बांधेसूद होती, व पावलें टाकण्याची त्याची लकब पहातांच त्याच्या स्वभावांतला दृढनिश्चय, साहसप्रियता आणि महत्त्वाकांक्षा कोणींहि ओळखली असती. त्याचे कपडे साधे होते, पण त्याच्या अंगावर सफाईनें बसल्यामुळें शोभत होते. दोन दिवसांच्या मुक्कामानें तांबूस झालेल्या त्याच्या धोतराचा कसलेला काचा त्याच्या कमरेपासून एकेका टांचेपर्यंत तंग राहून शोभत होता, आणि अंगांतल्या शिकारी थाटाच्या गरम कोटाचे फुगीर खिसे कमरेच्या दोन्ही बाजूंस डौलानें झुलत होते. कोटाची कॉलर मानेच्या दोन्ही बाजूंनीं अशा ऐटीनें खालीं उतरून पहिल्या गुंडीवर पोंचली होती कीं जणूं आपल्या अंगाखालच्या पराक्रमी छातीचा आणि प्रेमळ हृदयाचा तिनें अभिमान धरला होता. त्याची कान्ति त्याच्या आईसारखी गौरवर्ण व तेजःपुंज होती. त्याचा चेहेरा फुगीर नव्हता. गालांचीं हाडें किंचित् वर असल्यासारखीं वाटत. नाक सरळ होतें पण किंचित् डाव्या बाजूस त्याची ठेवण असावी असा संशय येण्यासारखा होता. डोळे तेजस्वी पण टपोरे नसून किंचित् खोल व भेदक होते, केंस काळेभोर होते, आणि या वेळीं त्यानें टोपी काढून डाव्या हातांत धरली असल्यामुळें त्यांतल्या पुढच्या झुपकेदार बटा त्याच्या रुंद कपाळावर दर पावलागणीक टेकत होत्या.

सुधीर आजूबाजूला पहात नव्हता. बंदरावर जावयाचें त्यानें ठरविलें असल्यामुळें सरळ नाकासमोर दृष्टि ठेऊन तो रस्ता आक्रमीत होता. त्याची अस्पष्ट शीळ चालूच होती व मन कोणत्याहि विचारांत न गुंततां मोकळें असल्यामुळें वेगानें चालण्याचीच एक प्रकारची तंद्री त्याला लागली होती.

पण तो छोटा, शान्त रस्ता संपून रहदारीचा राजरस्ता सुरू होतांच त्याची ती तंद्री संपली. त्या रस्त्यावर येतांच माणसांची व गाड्यांची वाहतुक त्याला दिसली व तेथून बंदर थोड्याच अंतरावर असल्यामुळें बंदरावरचा ठराविक ठशाचा उग्र हिरवट वासहि त्याला एकदम आला. मुंबईच्या व्हिक्टोरियाच्या ठशाच्या

पण तिच्यापेक्षां पसरट घाटाच्या आणि जराशा ओंगळ अशा दोनतीन गाड्या त्याच्यापुढून गेल्या त्यांत कोणी तरी षोकी लोक फेरफटका करावयास निघाले होते. रस्त्यानें माणसें चाललीं होतीं त्यांत एकहि स्त्री नव्हती; नाहीं म्हणावयास पणजीची कांहीं मंडळी आलेली असावीत त्यांत एक स्त्री कमरेशीं घट्ट चुणलेल्या शुभ्र वस्त्राचें घुंगट डोक्याभोंवतीं दोन्ही हातांनीं धरून दुतर्फाच्या दुकानांची मौज पहात चाललेली मध्येंच दिसली. बंदरावर कसल्या तरी अवजड मालाची खेप टाकून परत सुटलेल्या एका खटारेवाल्यानें आपला "रथ" मारे भरधांव सोडला होता आणि खटाऱ्याच्या खडखडाटाची कटकट कमी होती म्हणूनच कीं काय आपल्या पिंजलेल्या भसाड्या आवाजांत तो इष्काला मारे आळवून राहिला होता.

खुद्द बंदराच्या धक्क्यावर शोभेपेक्षां दाटी आणि घाणच दृष्टीला पडेल हें जाणून बंदराकडे उजव्या हाताला वळण्याऐवजीं सुधीरनें रस्ता ओलांडला व मग तसेंच पुढें बिनवाटेच्या प्रदेशांतून चालत जाऊन किनाऱ्याची बंदराच्या डाव्या बाजूची बगल गांठली. तेथें पोंचतांच स्वच्छ, शुभ्र, मऊ वाळवंटाचा मोठा पट्टा, व भरतीच्या आवेगामुळें त्या वाळवंटाकडे धांव घेणाऱ्या लाटांचा सूर्यप्रकाशांतील चकचकाट त्याला दिसला. त्याच्या पाठीमागें किनाऱ्याची मर्यादा नारळीच्या उंच झाडांनीं रेखलेली दिसत होती, व त्या वृक्षराजींच्या आड एखाद्या पडदानशीन स्त्रीप्रमाणें छोटी धेनुकुंज नगरी लपली होती व बाहेरचें जग हळूच पहात होती. त्याच्या उजव्या बाजूला बंदरांत कित्येक पडाव वारुळापाशीं मुंग्यांचा थवा व्हावा तसे धक्क्यापाशीं जमले होते, सामानाची चढउतार सुरू होती, आणि त्यांत गुंतलेल्या माणसांच्या राकट आरडाओरडीचे प्रतिध्वनि सारखे उठत होते. बंदराच्या त्या बाजूस सुमारें पाव मैलाच्या अंतरावर लहानशा उंचवट्यावर एक मोठा बंगला दिसत होता, तो उंचावर असल्यामुळें तर डोळ्यांत भरण्यासारखा होताच पण त्याचा घाट आणि टुमदारपणाहि चटकन् नजर खेंचून घेई. डोक्यावर ओझें घेऊन बंदराकडे चाललेल्या एका माणसाला सुधीरनें विचारलें,

"तो बंगला कोणाचा हो?"

"तुला माहीत नाहीं? कुठचा रे तूं?"

मोटारमधल्या बडबड्या म्हाताऱ्याच्या उत्तराची सुधीरला ताबडतोब आठवण झाली व तर्क लढवून त्यानें विचारलें,

" सय्यदचा ? "

" असं कसं एकेरी बोलतोस ? सय्यदसाहेब अमीरसाहेब असं म्हण."

" हो हो. त्यांचाच का बंगला ? "

" तर ! सय्यदसाहेबांच्या वडिलापर्यंत अमीरमंडळी जुन्या राजवाड्यांत रहात होती. पण सय्यदसाहेब बडे षोकी; त्यांनीं हा बंगला टेंकडीकर बांधला. आतां येवढ्या मुलखांत या बंगल्याच्या तोडीचा एकच बंगला आहे. "

" तो कुठला ? "

" म्हणजे तुला इथली कांहींच माहिती नाहीं तर ! "

" नाहीं. सांगा ना."

" तूं बंदराच्या डावीनं निघाला आहेस ना ? असाच नीट जा. नाहीं म्हटलं तर अर्धा पाऊण मैल गेला कीं दिसेल मी म्हणतों तो उमरखानसाहेबांचा बंगला. तो बघून घे अन् मग सांग मला."

सुधीरला त्याच्या बोलण्याच्या तऱ्हेचें हंसूं आलें, कारण बंगला पाहिल्यावर त्याला पुन्हां सांगायचें ही अट विलक्षणच होती व तें सांगण्यासाठीं त्याला गांठायचें म्हणजे पंचाइतच होती. पण त्यानें हंसूं आवरलें व नुसतें म्हटलें,

" बरं, बरं. अच्छा, सलाम ! "

मग एका ' जंटलमेन ' त्रयस्थाला आपण आपल्या गांवची फारच महत्त्वाची माहिती सांगितली अशा विचारानें आनंदून ओझेवाला पूर्वीच्या दुप्पट वेगानें पावलें टाकीत बंदराकडे गेला, व सुधीर उलट दिशेला किनाऱ्याच्या वाळूवरून निघाला.

तो पुरता अर्धा मैलहि गेला नसेल तों किनाऱ्यानें इतकें वळण घेतलेलें त्याला आढळलें कीं आतां बंदराचा भाग पार त्याच्या दृष्टीआड झाला होता. आंत भर पाण्यांत जे पडाव होते तेच त्याला दिसत होते, आणि बंदरावरचा कलकलाट त्याला मुळींच ऐकूं येत नव्हता. बाकीच्या देखाव्यांतहि बदल झाला होता. मऊ मऊ वाळूचा प्रदेश संपून समुद्राच्या लाटा वाळूवर घसरत येण्याऐवजीं खडकावर खळखळतांना किंवा मोठमोठ्या धोंड्यांवर आपटतांना दिसूं लागल्या होत्या. किनारा सखल होता तो एकदम उंच झाला होता, व पुढें पुढें आणखी उंच होत गेलेला

दिसत होता किंबहुना एखाद्या लहानशा डोंगराचा तुटलेला उभा कडा असावा तसें किनाऱ्याचें स्वरूप झालें होतें व समुद्राच्या पात्रांत मोठमोठ्या शिळांची गर्दी झाली होती. मखमलीसारख्या गुलगुलीत वाळूवरून बिनधोक मजेनें चालण्याचें सौख्य आतां सुधीरला मिळत नव्हतें. दगडादगडांवरून पावलें टाकीत, कधीं उडी घेत व कधीं भिजलेल्या खडकावरून जपून चालत सुधीरला जावें लागत होतें.

अशा रीतीनें सुमारें अर्धा मैल गेल्याबरोबर एका भव्य बंगल्याचा पार्श्व-भाग सुधीरला दिसला. त्यानें मुंबईस किती तरी टोलेजंग बंगले पाहिले होते, व मुंबईचे ते एकाहून एकेक भव्य प्रासाद ज्यानें पाहिले आहेत त्याला बडोद्याच्या मकरपुऱ्याचें किंवा जयाजीमहालासारख्या राजप्रासादांचेंदेखील कौतुक वाटणें कठीण असतें. त्यामुळें उंचवट्यावरच्या त्या बंगल्याचें सुधीरला मोठेंसें आश्चर्य वाटावें हें शक्यच नव्हतें. पण एक तर धेनुकुंजासारख्या प्रान्तांत गेल्यावर माणूस साहजिकपणेंच आपलें कौतुक थोडें सवंग विकतो; आणि शिवाय बंगला जरी विस्तीर्णपणानें नजरेंत भरण्यासारखा नसला तरी त्याच्या बांधणींत जो एक गोडवा होता त्यामुळें ठसकेबाज दिसत होता यांत शंकाच नाहीं. सुधीर कांहीं शिल्पकलेंतला तज्ञ नव्हता. पण कोणत्याहि कलेंतल्या अस्सल सौंदर्याचें असें आहे कीं तें अनभिज्ञासहि चटकन् आनंदाचा उद्गार काढावयास लावल्याशिवाय रहात नाहीं. त्यामुळें अठराव्या शतकांतली ऐन मुसलमानी तऱ्हा, जवळ गोंव्यापर्यंत येऊन ठेपलेली पोर्तुगीज तऱ्हा, आणि विसाव्या शतकांतली ताजी इंग्लिश तऱ्हा, या सर्वांचें त्या बंगल्याच्या बांधणींत साधलेलें मनोहर मिश्रण सुधीरला ताबडतोब गोड वाटलें, व बंगल्याकडे पहात तो क्षणभर थबकून उभा राहिला.

त्या बंगल्याच्या चौफेर व्हरांड्याची जी पश्चिमाभिमुख बाजू होती तिचे शुभ्र खांब या वेळीं कलंडत्या सूर्याच्या ऐन समोर येऊन तळपत होते, व्हरांड्याच्या पलीकडे अंतर्गृहाच्या खिडक्यांच्या तावदानांवरहि झगझगीत प्रकाश पडला होता, पण त्या साऱ्या खिडक्यांना आंतून उंची गुलाबी कापडाचे पडदे असल्यामुळें सूर्यकिरणेंहि त्या रंगाची छटा घेऊन परत फिरलेलीं दिसत होतीं. जणूं एखाद्या कामिनीनें आपल्या मैत्रिणीच्या एकान्तांत डोकवावें आणि स्वतःच लज्जेनें रक्तवदन होऊन परत फिरावें तद्वत् त्यांची अवस्था झाली होती.

बंगल्याच्या पूर्वेकडच्या बाजूस जें एक घाटदार प्रासादशृंग काढलें होतें तें कामातुर वल्लभानें झोंपेंतून उठविल्यामुळें आळस देण्याचा बहाणा करणाऱ्या स्त्रीच्या वर केलेल्या हाताप्रमाणें शोभत होतें. आणि हा सर्वच देखावा बंगल्याभोंवतालच्या माडांच्या दाटींतून दिसत असल्यामुळें त्याला स्वप्नलोकांतील दृश्याच्या पुसटपणाची अवर्णनीय आकर्षकता आली होती.

सुधीर ती शोभा पहात पहात पन्नाससाठ पावलें पुढें गेला तेव्हां त्या बंगल्याच्या मागच्या बाजूनें समुद्रावर यावयास रुंद रस्ता खोदला आहे असें त्याला आढळून आलें. बंगल्याच्या आवारांतून एक वांकडी तिकडी खडबडीत वाट निघाली होती ती एकदोन मोठाल्या वृक्षांना आणि मोठमोठ्या शिळांना वळणें घालून समुद्रतीरापर्यंत येऊन पोंचली होती. त्या वाटेच्या पलीकडे टेकडीच्या कडप्याला आंत बांक आला होता व तेथें एखाद्या छोट्याशा गुहेसारखी खडकाची जागा बनली होती. ती जागा अतिशय स्वच्छ असल्यामुळें व सुधीर आतां कांहींसा दमला असल्यामुळें त्याला तेथें बसावेंसें वाटलें. तो बसला, व समुद्राच्या लाटा त्याच्यापासून पांचसात यार्डांवर येऊन खळाळत होत्या त्याकडे पहात राहिला.

भरतीचा ऐन भर असल्यामुळें लाटांवर लाटा उसळून ज्या रेषेवर येणाऱ्या-जाणाऱ्या लाटांची टक्कर होई, तेथें एकसारखा पांढऱ्या सफेत फेंसाचा खेळ चालला होता. जणूं दुधाच्या घागरी घेऊन तीराकडे धांवत येणाऱ्या तरुण गोपिकांच्या हातून धांवपळींत घागरी पडून फुटल्या होत्या व दुधाच्या धारांचा सडा झाला होता. लाटा जितक्या आवेगानें येत तितक्याच वेगानें परत जात; त्यामुळें येणाऱ्या लाटा वल्लभाच्या भेटीला धांवणाऱ्या अभिसारिकाच आहेतसें वाटे, तर परतलेल्या लाटा परपुरुषाच्या कामचेष्टेनें भेदरून पळणाऱ्या कुलांगना तर नव्हेत असा भास होई. प्रत्येक लाट गर्जून आपटली कीं तिच्या पाण्याचा झोतच्या झोत सुधीर बसला होता त्या जागेपासून दहावीस हातांपर्यंत चढे; आणि त्या झोताचे हजारों फांटे लहानमोठ्या धोंड्यांच्या मधल्या फटीफटींतून घुसत ते बिळाकडे चपळाईनें धांव घेणाऱ्या शुभ्र सर्पांप्रमाणें वाटत. लाट हाबकून परत फिरली कीं तिच्या गर्जनेचा ध्वनि ओसरून जाई व मग दुसरी लाट हापटून गर्जेपर्यंत त्या दगडाधोंड्यांत घुसणाऱ्या झोतांचा सळसळाटच कानीं येई. जणूं सर्पांच्या उपमेंत न्यून राहूं नये म्हणून ते फूत्कारच चालू होते.

तें अवर्णनीय ऐश्वर्य पहाण्याच्या नादांत सुधीर भान विसरून गेला होता, इतक्यांत—

" मत् छोडो ! मत् छोडो !—"

असे कोणा मुसलमानी स्त्रीचे शब्द त्याला बंगल्याच्या वाटेकडून ऐकूं आले व त्यावर लागोलाग—

एक हंसण्याची लकेर त्याच्या कानीं आली !

ती ऐकतांच तो चकित झाला.

हंसण्याची लकेर नव्हे, स्वर्गसंगीताची ती तानच होतीसें त्याला भासलें. स्फटिकासारखी जलधारा पायऱ्यापायऱ्यांवरून उड्या घेत असतां तिच्या लाडिक नृत्याचाच जणूं ध्वनि निघाला. जणूं टपोरे मोती सरांतून ओघळून टपटप वाजले. कोवळें तारुण्य आणि रसाळ कंठमाधुरी यांच्या मिलाफाचे बुंदच जणूं मोहोळांतून मधाचे थेंब ठिबकावे तसे ठिबकले.

प्रथम ऐकूं आलेले शब्द बोलणाऱ्या स्त्रीहून ही हंसणारी स्त्री भिन्न होती, व त्या दोघीहि समुद्रतीरावरच येत होत्या हें सुधीरच्या ताबडतोब लक्षांत आलें, व गुहेच्या वळणाच्या पुढच्या बाजूस येतांच त्या आपल्याला दिसतील अशा अपेक्षेनें तो पहात राहिला. मात्र त्या पुढें येतील तेव्हां आपण मान वळवून त्यांच्याकडे पहात आहोंत असें त्यांना दिसणें बरें नव्हे अशा विचारानें समुद्राकडेच त्यानें आपलें तोंड ठेवलें. तितक्यांत त्या हंसणाऱ्या स्त्रीचे

" जेवर ! जेवर--! बेटा—ए--"

असे शब्द ऐकूं आले, व ते ती कोणाला उद्देशून बोलली असावी त्याचा सुधीर तर्क करूं लागला तोंच त्या बाजूनें एक कुत्रा नाचत बागडत आला व अगदीं लाटांच्या माऱ्यांतल्या खडकावर जाऊन कान टवकारून व शेपटीचें थोटूक खालीं करून उभा राहिला. तो कुत्रा लहानखुराच होता व तो बागडत आला तो इतक्या चपळाईनें कीं एखादें हरीणच आलें कीं काय असा सुधीरला क्षणभर भास झाला. त्याचा रंग पिवळसर होता, त्याला केंस अगदीं बेताचे होते, आणि त्याच्या अंगाची स्वच्छता कमालीची होती, त्यामुळें पहिला भास जरी नाहींसा झाला तरी सुधीरला तें अजूनहि एखाद्या हरिणाच्या पिलासारखेंच वाटत होतें.

पण त्या गोजिरवाण्या कुत्र्यापेक्षां त्याची मालकीण केव्हां दृष्टिपथांत येईल याबद्दल सुधीर अधिक आतुर होता, व त्याची आतुरता सफल व्हावयास फारसा वेळ लागला नाहीं.

त्या दोघी स्त्रिया गुहेच्या आडोशाच्यापुढें आल्या तेव्हां सुधीरनें मान वळविली असती तर त्याला त्यांचे चेहरे अगदीं समोरून दिसले असते. पण सुंदर चेहरे पाहण्यासाठीं अविचारानें धांवणाऱ्या दृष्टीला कुलीनता नांवाची एक मोठी बहीण आहे व तिचा तिला बराच धाक वाटतो. त्यामुळें सुधीरची दृष्टि वळली नाहीं व त्या स्त्रिया बऱ्याच पुढें आल्यावर जेव्हां पाठमोऱ्या दिसूं लागल्या तेव्हांच तो त्यांच्याकडे पाहूं लागला, आणि तेव्हां मात्र त्याला निःशंकपणें पाहतां आलें.

त्या दोघींपैकीं एक बऱ्याच वयाची असावीसें दिसलें, व साहजिकपणेंच सुधीरची दृष्टि दुसऱ्या स्त्रीवर खिळून राहिली.

ती मध्यम उंचीची होती, व मुसलमान असून गुजराथी पद्धतीची साडी नेसली होती. उंची, झिरझिरित साडी नितंबावर लपेटून बसल्यामुळें तिच्या पावलापावलागणिक एकेका नितंबाच्या गोल रेषा उमटत व अस्पष्ट होत होत्या, आणि खालचा झोल वर खालीं हालून तिच्या गोऱ्यापान पोटऱ्या कमीजास्त दृष्टीस पडत होत्या. वाऱ्याचा एक झोत येऊन तिचा पदर डोक्यावरून घसरून उजव्या खांद्यावर फडफडत राहिला त्या वेळीं आपणास कोणी पहात असेल ही कल्पनासुद्धां नसल्यामुळें तिनें तो निःशंकपणें तसाच राहूं दिला, व तिच्या पाठीची डावी बाजू उघडी पडली. तिनें क्रेप कापडाचें इंग्रजी पद्धतीचें ब्लाउझ अंगांत घातलें होतें त्याचा आकाशी रंग तिच्या गौरवर्णाला साजत होता, आणि ब्लाउझ व साडी यांच्यामधून तिच्या कृशकटीवरचें अंग किंचित् दिसत होतें त्याला कसली उपमाच सांपडण्यासारखी नव्हती. तिच्या डाव्या हाताचा दंड बहुतेक ब्लाउझच्या बाहींत आच्छादलेला होता, पण बाकीच्या उघड्या हाताकडे लक्ष जातांच नेत्रांना तेथून फिरविणें कठीण होतें. तिच्या मानेचा भाग नीट दिसला असता तर कदाचित् भुजलतेचें सौंदर्यहि लोपलें असतें. पण तो नीटसा दृष्टीस पडत नव्हता. कारण तिनें आपल्या लांब, सडक, काळ्याभोर केंसांची वेणी घालून ती तशीच पाठीवर सोडली होती, व वेणीच्या मानेजवळच्या भागावर खडा बसविलेला एक रुंद हस्तिदंती चाप

लावला होता. वेणींतून खुल्या ठेवलेल्या केंसांच्या बटा वाऱ्यानें भुरभुरत होत्या त्या इकडून पाठीकडून मोठ्या मनोहर वाटत होत्या, आणि नितंबापर्यंत पोंचणाऱ्या त्या केशपाशाकडे पहातांच असंख्य कामशरांनीं आपली कुटिलता लपविण्यासाठीं या केशगुंफेचा बहाणा तरकेला नसेल अशी शंका येण्यासारखी होती.

ती कुत्र्याला आवरण्यासाठीं लगबगीनें आली. हातांनीं आर्जवाच्या खुणा करीत तिनें तीनचारदां म्हटलें,

" जेवर ! आ बेटा ! इदर आ ! ए !—"

पण मिळालेलें स्वातंत्र्य सोडून मुद्दाम सांखळीकडे जेवर कसा जाईल ? तो एकदां तिच्याकडे वळून पाही व " मी नाहीं जा ! " असें एखाद्या हट्टी लाडक्या मुलानें म्हणावें तशा अर्थाचा अंगाचा चाळा करून व आवाज काढून पुन्हां समुद्राकडे तोंड फिरवी.

जेवर मुकाट्यानें येत नाहीं असें पाहून त्या तरुणीनें किनाऱ्यावरचा एक खडा उचलला व त्याच्या अंगावर भिरकावून म्हटलें,

" चल ! नाहीं तर—"

त्या वेळीं तिच्या मानेलाहि जोराचा हिसका बसला व तिच्या केंसांतला तो चमकदार खड्यांचा चाप तिच्यामागें खालीं गळून पडला. तिचें सारें लक्ष कुत्र्याकडे होतें त्यामुळें तिला तें कळलें नाहीं.

अंगावर खडा येत आहे हें पाहतांच जेवरनें उडी मारली. पण परत येण्याऐवजीं तो बागडत दुसऱ्या एका दगडावर जाऊन उभा राहिला.

तें पाहून ती तरुण स्त्री मनापासून हंसली, व अंतःकरणाचें मुग्धत्व आणि माधुर्य ध्वनित करणारें तें मनमोकळें हंसणें ऐकतांच सुधीरला पुन्हां निर्मळ स्वरांची रेखीव तान ऐकल्याचा भास झाला.

" थांब हो ! " असें म्हणून त्या तरुणीनें पुन्हां खडा हातांत घेऊन फेकण्यासाठीं हात वर केला, व तें पहातांच खडा सुटतांच उडी मारायच्या तयारीनें जेवर कान टवकारून उभा राहिला, व 'भू भूऽऽऽ' असें एकदां भोंकला; जणूं " असं काय बरं करतेस ?—मला खेळूं दे ना जरा ! " असेंच तो आर्जवानें त्या तरुण स्त्रीला म्हणत होता.

ती तरुण स्त्री हंसली व म्हणाली,

" तूं भारी हट्टी आहेस. मीं तुला सोडलं हेंच चुकलं."

ती दुसरी स्त्री म्हणाली,

" तरी मी तुला सांगत होतें सोडूं नकोस म्हणून ! "

" खरंच बाई ! पण जुबी, आतां तो द्वाड पाण्यांत गेला म्हणजे ? हो पुढं, अन् आण ना पकडून त्याला ! "

" आणतें. कसा जातो पाहतें पाण्यांत." असें म्हणत जुबेदा पुढें सरसावली.

पण जेवरचा स्वभाव न ओळखतां प्रतिज्ञा केल्याचा तिला लवकरच पश्चात्ताप झाला. ओढणी सावरतां सावरतां पळणाऱ्या मध्यम वयाच्या जुबेदासारख्या किंचित् स्थूल स्त्रीचा व जेवरसारख्या अचपळ कुत्र्याचा शिवाशिवीचा डाव सुरू झाला तर त्याचा परिणाम काय होईल तें सांगायला का पाहिजे ? जुबेदा जवळ येईपर्यंत ऐटींत थांबावें व तिनें धरावयासाठीं म्हणून हात पुढें करतांच टुणदिशीं उडी मारून लांब जावें असें जेवरनें चारपांच वेळां करतांच जुबेदा थकून गेली, व मग तिनें त्याला शिव्या द्यावयास सुरुवात केली. ती म्हणाली,

" जाईनास जहन्नममध्यें एकदांचा ! सैतान !—"

तिची ती फजीति व राग पाहून त्या तरुण स्त्रीला हंसतां हंसतां पुरेवाट झाली. पण मग जेवरची दांडगाई वाढूं देतां कामा नये असें वाटून ती दरडावून ओरडली,

" जेऽवर ! येतोस का नाहीं ! बस कर मस्ती ! चऽऽल ! "

तिचा राग जणूं जेवरला कळला. तो बागडत तिच्याकडे आला, तुटकी शेपटी जोराजोरानें हालवीत त्यानें तिचीं पावलें व पाय चाटले, आणि तिनें पट्ट्यांत अडकविलेली सांखळी निमूटपणें सहन केली.

मग लवकरच ती तरुण स्त्री जुबेदाबरोबर परत फिरली. तिचें तोंड वळल्याबरोबर तिला आपण दिसणें बरें नव्हे असें वाटून सुधीर जरा सरकून आड झाला. आड झाल्यामुळें तिचा चेहेरा त्याला समोरून पाहतां आला नाहीं. तिचा गोड शब्द मात्र कांहीं वेळ त्याला ऐकूं येत होता. पण तोहि लवकरच ऐकूं येईनासा झाला.

मग एखाद्या स्वप्नांतून जागें झाल्याप्रमाणें त्याला क्षणभर वाटलें.

तो मंद पावलांनीं गुहेच्या बाहेर आला व पुढें होऊन जी वाट वर बंगल्याकडे गेली होती तिच्या दिशेला पाहूं लागला.

त्या तरुण स्त्रीची पाठमोरी आकृति माडांच्या गर्दीतून त्याला मधून मधून दिसत होती. थोड्याच वेळांत ती स्त्री व्हरांड्याच्या पायऱ्या चढून अंतर्गृहांत गेल्यामुळें तेंहि दृष्टिसौख्य संपलें.

मग तो वळला.

तितक्यांत त्याची नजर मधांशीं पडलेल्या त्या चापावर गेली. चाप पडल्याचें त्या तरुणीला शेवटपर्यंत कळलेंच नव्हतें त्यामुळें तो तसाच पडला होता.

सुधीरनें तो उचलला, निरखून पाहून खिशांत घातला, व घरीं परत जावयासाठीं झपाझप पावलें टाकण्यास सुरुवात केली.

त्याला परत आलेला पहातांच काकांनीं म्हटलें,

" वा ! मला वाटलं तूं आतां पृथ्वीप्रदक्षिणाच करून येणार ! "

सुधीरनें तें बोलणें नुसतें हंसण्यावारी नेलें.

काका म्हणाले,

" कुठल्या बाजूला गेला होतास ?—काय काय पाहिलंस ?—सांग तरी."

" बंदरावर गेलों होतों " असा आरंभ करून त्या बाजूचेंच त्यानें इतकें वर्णन केलें कीं जणूं तो तासभर बंदरावरच बसून राहिला होता; आणि त्या वर्णनाच्या शेवटीं " मग बंदरावरनं उठलों अन् जरा तीरातीरानं हिंडून परत आलों." येवढीच पुस्ती जोडली, व " फार उशीर झाला, नाहीं ? जेवायचं झालं आहे ? " असें म्हणत विषयच पालटायचा प्रयत्न केला. कां कोण जाणे आपण जें अद्वितीय स्त्रीसौंदर्य पाहिलें त्याच्याविषयीं काकांच्याजवळ उघड बोलण्याची त्याला लज्जा वाटली. मात्र तें सौंदर्य त्याच्या अंतर्दृष्टीपुढून क्षणभरहि दूर होईना. ती स्त्री दृष्टीस पडली याबद्दल त्याचें मन आनंदित झालें होतें, तर उलट तिचा चेहरा पहावयास मिळाला नाहीं याबद्दल त्याच्या मनाला सारखी चुटपुट लागली होती.

ती पुन्हां पहावयास मिळेल काय ? आणि तिच्याशीं एखादा शब्द बोलावयास मिळेल काय ?

—या दोन प्रश्नांवर त्याच्या मनाची नाना तऱ्हेची कसरत चालू होती.

दुसरा दिवस उजाडला तेव्हां उद्यां तर आपण धेनुकुंज सोडून जाणार, पुन्हां आपण कशाला येणार इकडे, मग पाहिलें तेवढ्यावरच मनाचें समाधान करून जायचें, का पुन्हां ती दृष्टीस पडावी म्हणून प्रयत्न करावयाचा, अशा

विचारांनीं त्याच्या मनाला काडीचा स्वस्थपणा उरूं दिला नाहीं. त्याचें लक्ष गप्पाविनोदांतहि नव्हतें व खाण्यापिण्यांतहि नव्हतें. सकीना एकदां हंसून म्हणाली,

" तुमचं चित्त असं बावरल्यासारखं कशानं झालं आहे आज ? "

" कुठं ?—छे ! " सुधीर म्हणाला.

" धेनुकुंज सोडून जायचं जिवावर आलं आहे त्याच्या." काका म्हणाले.

सुधीर चपापला. काका असें कसें बोलले याचें त्याला आश्चर्य वाटलें. इतकीहि शंका त्याला त्या क्षणीं आली कीं आपण जें सांगितलें नाहीं तें न सांगतांहि काकांनीं तर्कानें ओळखलें कीं काय ? पण दुसऱ्याच क्षणीं ती शंका किती वेडेपणाची होती तें त्याच्या लक्षांत आलें, व सकीनाकडे पाहून तो हंसला.

दिवसभर विचार करून करून त्यानें एक गोष्ट मात्र मनाशीं ठरविली. पुन्हां कालच्या स्थळीं संध्याकाळीं जावयाचें.

त्याप्रमाणें युक्तीनें काकांची परवानगी घेऊन तो निघाला, व गुहेच्या जागीं येऊन पोंचला.

कालच्यासारखीच आजहि भरतीची शोभा पसरली होती, पण सुधीरला ती जणूं दिसतच नव्हती. लाटा आपल्या नर्तनानें त्याला प्रसन्न करूं पहात होत्या पण तो तिकडे ढुंकूनहि बघेना. त्या व्यर्थ परिश्रमानेंच जणूं त्या लाटांना फेंस येत होता व अवमानित झाल्यामुळें त्या क्रोधानें फणफणत होत्या. पण सुधीरचें लक्ष त्यांच्या आर्जवाकडे नव्हतें त्याप्रमाणेंच त्यांच्या रुसव्याकडेहि नव्हतें. कालच्याप्रमाणेंच ती तरुण स्त्री बंगल्याच्या वाटेनें येईल अशा कल्पनेनें तो त्या दिशेनें कांहीं शब्द ऐकूं येतो कीं काय याची अत्यंत उत्कंठेनें वाट पहात उभा राहिला.

तो जवळ जवळ दोन घटका तसा उभा राहिला असेल. चारपांचदां गुहेंतून निघून बंगल्यांतून येणाऱ्या वाटेच्या तोंडाशीं येऊन लांबवर बंगल्याकडे दृष्टि टाकूनहि त्यानें पाहिलें. पण ती स्त्री येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना.

शेवटीं त्याच्या मनांत एक विचार आला, व तो वर बंगल्याकडे जावयासाठीं वाट चढूं लागला. वाट ओलांडून तो बंगल्याच्या आवारांत पोंचला. तेथें तो क्षणभर थबकला. आसपास कोणी नोकरमाणूस दिसतें काय म्हणून त्यानें पाहिलें. पण कोणी दिसलें नाहीं. मग तो पुढें झाला व पायऱ्या चढून जाऊन व्हरांड्यांत उभा राहिला.

आंतून कोणीसें विचारलें,

" कोन है ?—"

ते शब्द ऐकतांच कांहीं एक विचित्र संवेदना सुधीरच्या शरीरांतून चमकून गेली. त्या तरुण स्त्रीचाच तो आवाज होता यांत शंकाच नाहीं !

त्यानें सफाईदार हिंदुस्थानींत उत्तर दिलें,

" मी आहें. जरा काम आहे."

आपलें उत्तर ऐकतांच पडदा राखण्यासाठीं ती स्त्री आंत धांवत जाईल अशी सुधीरची कल्पना होती. पण काय आश्चर्य ? तसें होण्याऐवजीं ती चार पावलें पुढें होऊन दाराजवळ आली व सुधीरहि पुढें झाल्यामुळें दोघांची दृष्टादृष्ट झाली. तिला पहातांच सुधीर चमकला. त्या दिवशीं रात्रीं ज्या स्त्रीच्या हाताच्या स्पर्शाचा आपल्याला भास झाला तीच ही असें त्याला वाटलें. तो तिच्याकडे निरखून पहात राहिला.

कालच्यासारखीच आजहि ती साडी नेसली होती व घरांतच वावरत असल्यामुळें तिनें पदर डोक्यावरून न घेतां खांद्यावर रुळता सोडला होता. ती मंद पावलें टाकीत दाराकडे आली होती, व तिच्या चेहऱ्यावर जिज्ञासेचा भाव उमटला होता. काल पाठीमागून दिसलेल्या मोकळ्या बटा आज कपाळाच्या दोन्ही बाजूंवर रुळत असलेल्या दिसत होत्या, व विपुल केशभाराचे फुगोटे तिच्या दोन्ही कानांच्या अर्धभागावर तरंगत होते. भुंवया वक्र असूनहि त्यांनीं आच्छादलेल्या पाणीदार नेत्रांत अत्यंत सरल वृत्तीचें प्रतिबिंब नाचत होतें. नाकपुड्या विशेष रेखीव असल्यामुळें गुलाबकळींतल्या दोन कोमल पाकळ्या अलग दिसाव्या तशा भासत होत्या. आणि जणूं त्या सुकुमार पाकळ्यांना श्वासाबरोबर हालण्याचे परिश्रम असह्य वाटूं नयेत म्हणून हिऱ्याच्या चमकीचा डाव्या बाजूस आधार दिला होता. जिव्हणी इतकी अरुंद, इतकी नाजूक व इतकी रक्तवर्ण होती कीं जणूं चित्रकारानें आपल्या लाल रंगाचा ब्रश फिरवून एक लहान धनुष्याकृति रेषाच काढली होती.

सुधीरनें एका क्षणार्धांत तें सौंदर्य पाहून घेतलें व ऐटबाज हिंदुस्थानींत तो म्हणाला,

" माफ करा. पण उमरखानसाहेबांचा हाच बंगला ना ? "

" हो. पण दिलगिरीची गोष्ट, बाप्पा परगांवीं गेले आहेत."

" होय का—"

" आपण परमुलुखांतून आलेले दिसतां. आपलं काय काम आहे तें मला सांगण्यासारखं असलं तर बाप्पांना मी पत्रांतनं कळवीन."

कांहीं उत्तर करण्याऐवजीं सुधीर क्षणभर तिच्याकडे पहातच राहिला. तिचें बोलणें ऐकून तो आश्चर्यानें थक्क होऊन गेला. आधीं मुळीं जी वास्तविक सक्त पडदानशीन असेल अशी त्याची कल्पना होती ती ही मुलगी खुशाल त्याच्या-पुढें येऊन बोलूं लागली याचेंच त्याला मोठें नवल वाटलें होतें. त्यामुळें ती एकेक प्रश्न विचारूं लागली, व एखाद्या शिकल्यासवरलेल्या मुलीला शोभेल अशी बोलण्याची सफाई तिच्या बोलण्यांत दिसून आली तेव्हां तें त्याचें नवल फारच वाढलें. त्याच्याशीं बोलतांना मधेंच तिनें आपल्या उजव्या कानावरचा केंसांचा झुबका चाचपला तेव्हां तिच्या नाजूक, कळीदार बोटांकडे त्याचें लक्ष जाऊन त्या बोटांच्या नखांवर जी गडद गुलाबी छटा पसरली होती ती सारखी पहावीशी त्याला वाटली. आणि बोलतांना तिची चिमुकली धनुष्याकृति जिव्हणी खुली होऊन ओठांची जी मधुर हालचाल झाली ती पाहून आपण कांहीं बोलण्यापेक्षां तिचेंच बोलणें सारखें चालावें असा त्याला मोह पडला.

पण लगेच तो भानावर आला व म्हणाला,

" नाहीं, माझं कांहीं तसं तुमच्या वडिलांशीं काम नव्हतं. माझी अन् त्यांची ओळखहि नाहीं. त्यांनाच मला भेटायचं होतं असंहि नाहीं."

" म्हणजे ? "

" हा चाप मला सांपडला तो या बंगल्यांतल्याच कोणाचा तरी असावा असं मला वाटलं म्हणून—"

" ओहो !—जुबी ! ए जुबी ऽ!—" अशा हांका मारीत ती अंतर्गृहांत गेली व लगेच जुबेदाला धरून घेऊन परत आली, आणि सुधीरच्याजवळ तिला आणून व त्यानें चिमटींत धरलेला चाप दाखवून म्हटलें,

" देख ! जो हरवला म्हणून मी काल येवढी रडलें अन् नोकराचाकरांना रात्रीं किनारा धुंडाळायला लावलं तोच हा द्वाड चाप !—"

सुधीरनें चाप पुढें केला व तिच्या हातीं दिला. मग तो म्हणाला,

" माझ्या हातून आपली येवढी सेवा झाली याचा मला फार आनंद होत आहे."

"छे! असं कसं?" तिनें मान हालवून हंसून म्हटलें, "उलट आपले आभार कसे मानावे हें न समजून मी गोंधळून गेलें आहें. बाप्पा असते अन् त्यांची आपली गांठ पडली असती तर फार बरं झालं असतं!"

सुधीरनें हंसत तिच्याकडे पाहिलें त्या वेळीं तिनें लाजून आपली दृष्टि चुकविली व तिच्या गालांवर एकदम लाल रंग चढला असें त्याला वाटलें.

तो म्हणाला,

"बरं, आतां मला रजा असावी--"

पण तिनें वर पाहिलें नाहीं. "अच्छा" असा अगदीं अस्पष्ट आवाजांत तिचा शब्द उमटला. जणूं आंवडा येऊन तो ती गिळीत होती. तिनें खालीं घातलेली मान तशीच ठेवली.

या तिच्या कृतीचें सुधीरला अत्यंत आश्चर्य वाटलें. तिच्या वागण्यांतला मोकळेपणा असा एकदम नाहींसा कां व्हावा?

ती वर मान करून आपल्याकडे पाहील अशा अपेक्षेनें सुधीर क्षणभर थबकला. पण तिनें दृष्टि वर केली नाहीं, आणि तिच्या गालावरची लाली मात्र वाढली.

शेवटीं आणखी उभें राहणें अप्रशस्त दिसेल असा विचार करून सुधीर वळला, आणि व्हरांड्याच्या पायऱ्या उतरून आपल्या वाटेला लागला.

दुसऱ्या दिवशीं काकांच्याबरोबर सुधीर मुंबईस परत जावयास निघाला. धेनुकुंजनगरीची सीमा ओलांडून मोटार वेगानें धांवूं लागली तेव्हां सुधीरला कांहीं चमत्कारिकच वाटूं लागलें. असल्या अस्वस्थतेचा अनुभव त्याला पूर्वीं कधींच आला नव्हता. त्याला काय वाटत होतें तें त्याचें त्यालाच नीट कळत नव्हतें. पण जबर भूक लागली म्हणजे पोटांत जसा मोकळेपणा वाटतो तसला मोकळेपणा आपल्या सबंध शरीराला जडला आहेसें त्याला वाटत होतें. डोकें किंवा पोट दुखावें तसें आपलें मन दुखत आहे असें त्याला भासलें. आपल्या जीवनाला अत्यंत अवश्य अशी कांहीं तरी वस्तू येथें धेनुकुंजांत टाकून आपण दूर जात आहोंत असें वाटून तो विव्हल झाला. हृदयाला एक चमत्कारिक ओढ बसली आहेसें त्याला वाटलें. ती घटकेंत शल्यवत् वाटे तर घटकेंत सुखदायकहि वाटे. पण त्याला सगळ्यांत कशाची हुरहुर लागली असेल तर ही कीं—

तिचें नांवहि आपण विचारलें नाहीं!

# प्रकरण ८ वें

## मीनाक्षी



जिचें नांव कळलें नाहीं म्हणून कांहीं एका चमत्कारिक सुखकारक दुःखाचा जाच सोशीत सुधीर प्रवास करीत होता ती मीनाक्षी त्या दिवशीं सूर्य चांगला वर आला तरी पलंगावर तशीच पडून राहिली होती. पातळशी उंची दुलई तिच्या अंगावर होती व ती छातीपर्यंत घेऊन तिच्यावर तिनें आपले दोन्ही हात ठेवले होते. तिच्या अंगांत निजावयाच्या वेळेसाठीं म्हणून घातलेला अगदीं सैलसा खमीस असल्यामुळें गळयापासचा बराच भाग उघडाच होता, आणि गळयांतली पातळ सोन्याची सांखळी त्यावर चमकत होती. पांढऱ्या शुभ्र उशीवर तिनें आपलें मस्तक टेकलेलें होतें व तिचे काळेभोर केंस किंचित् अव्यवस्थितपणें दोन्ही बाजूंस रुळत होते.

तिनें थोडीशी चळवळ केली व मग डाव्या कुशीवर वळून पांघरुणाशीं चाळा केला. जणूं तिला स्वस्थता वाटत नव्हती त्याचा दोष त्या पांघरुणाकडेच होता. समोरच्या खिडकीकडे तिची दृष्टि गेली तों नारळीच्या झाडांच्या शेंड्यावरचे फांद्यांचे झुबके मंद मंद हालत होते, व एका फांदीवर बसलेलें एक पक्ष्यांचें जोडपें त्या हिंदोल्यावर आपल्या पिलांच्या कौतुकाच्या गोष्टी बोलण्यांत रमलें होतें. सूर्याचा झगझगीत प्रकाश जिकडे तिकडे भरला होता. जणूं अंधकारानें कलंकित झालेली सृष्टि आपल्या अधिकारांत घेण्यापूर्वी सूर्य तिला सचैल स्नान घालून पुनीत करून घेत होता. खालीं किनाऱ्यावर लाटांच्या गर्जना चालू होत्या त्यांचा अवरोधित ध्वनि ऐकूं येत होता.

पण तें पाहण्याकडे किंवा ऐकण्याकडे मीनाक्षीचें चित्त नव्हतेंसें दिसलें. किंबहुना तिनें तें कांहींच पाहिलें किंवा ऐकलें नसावें. कारण तिची दृष्टि जरी खिडकीकडे होती तरी समोर दिसणाऱ्या वस्तूंपेक्षां त्यांच्यापलीकडे कोठें तरी

नजर दिल्यासारखा तिच्या दृष्टींत भाव होता. तिनें पुन्हां किंचित् चळवळ केली, उजव्या नितंबावरचा उजवा हात उचलून त्या हातानें केंस मागें लोटल्यासारखें केलें व एक निःश्वास सोडला.

त्याच वेळीं जुबेदा खोलीचें दार ढकलून आंत आली आणि जवळ येऊन व मीनाक्षीच्या उजव्या दंडावर हात ठेवून म्हणाली,

"आज उठायचा विचार आहे कीं नाहीं तुझा?"

जुबेदा जरी दासीधर्माची होती तरी उमरखानांच्या घरांत तिला कोणी दासी म्हणून वागवींत नव्हते. मीनाक्षीची आई वारली तेव्हां मीनाक्षी पुरी पांच वर्षांचीहि नव्हती, व तेव्हांपासून आज तेरा वर्षें जुबेदानेंच अत्यंत प्रेमळपणानें तिचें संगोपन केलें होतें. मीनाक्षीवरचें तिचें अमर्याद प्रेम पाहून उमरखानांकडे आलेल्या एका कवीनें एकदां थट्टेनें नवी म्हण जुळविली होती, कीं "आई मरो आणि दाई जगो."

जुबेदाचा प्रश्न ऐकून मीनाक्षी कुशीवर होती ती वळून उताणी झाली. पण ती कांहींच बोलली नाहीं. तिनें फक्त आपले पंजे एकमेकांत गुंतवून छातीवर ठेवले व वरच्या छताच्या नक्षीकडे नजर दिली.

तें पाहून जुबेदानें दोन्ही हात तिच्या अंगावर टेकले व वांकून विचारलें,

"हें काय? उठतेस ना?"

जणूं जुबेदा आपल्याजवळ आल्याचें आत्तांच लक्षांत आल्यासारख्या चर्येनें मीनाक्षीनें तिच्याकडे पाहिलें, व पंजे एकमेकांतून सोडवून व उजव्या हातानें जुबेदाचा दंड धरून तिनें विचारलें,

"त्यांना तूं नांवसुद्धां कसं विचारलं नाहींस?"

जुबेदाला तो प्रश्न यत्किंचित्हि समजला नाहीं. ती म्हणाली,

"त्यांना कुणाला?"

"नाहीं—कांहीं नाहीं—"

असें कांहींसें पुटपुटून मीनाक्षीनें मान हालविली. ती किंचित् हंसली व उद्गारली,

"जुबी!—"

ती आतां कांहीं तरी सांगणार असें वाटून जुबेदा म्हणाली,

"काय?"

पण कांहीं बोलण्याऐवजीं मीनाक्षी तिच्याकडे पहातच राहिली. चंद्रबिंबाच्या आड एखादें मेघपटल क्षणभर दिसावें व लगेच तें दूर होऊन चंद्रबिंबाची शोभा प्रगट व्हावी, तद्वत् किंचित् उत्सुकता व किंचित् चिंता दर्शविणाऱ्या विचित्र भावाची छटा तिच्या मुद्रेवर निमिषमात्र दिसली, व लगेच विरली. तिनें जुबेदाच्या दंडावरचा आपला हात हुलेपणानें खालीं घेतला व नजर फिरवून पुन्हां छताकडे वर पाहिलें.

जुबेदाला तिचें तें सगळेंच करणें चमत्कारिक वाटलें. तिनें तिचा उजवा हात दोन्ही हातांत पकडला व म्हटलें,

" मीना !—बेटा, कहो—"

" नही, कुछ् नही—"

असें म्हणून मीनाक्षी हंसली व मग आपल्या अस्वस्थ मनस्थितीवरून जुबेदाचें लक्ष उडविण्यासाठीं ती एकदम पांघरूण दूर फेंकून उठली व पलंगावरून उतरत म्हणाली,

" छे ! दिवस इतका वर आला असेल ही कल्पनाच नाहीं ! अन् जुबी, तूं तरी मला आधीं येऊन उठवावंस कीं नाहीं ! बाप्पा अन् तूं माझे असे लाड करतां अन् मला बिघडवून ठेवताहां बरं का ! अठरा वर्षांची मुलगी आठ वाजतां उठते ! कोणीं ऐकलं तर शरमेची गोष्ट म्हणतील ! हं चल जुबी, आतां तरी लवकर मला चूळ करूं दे, नाहीं तर गाण्याचे मास्तर येऊन बसतील अन् छडीनं झोडतील मला उशीर केल्याबद्दल !—"

अशी गोड, लाडकी बडबड करून तिनें जुबेदाला धरून अंतर्गृहाकडे धांव घेतली.

पण तिचा हेतू मात्र साध्य झाला नाहीं. जुबेदा प्रेमळ असली तरी धूर्त होती, आणि तिनें ज्या या सुकुमार लतेचें आज इतके दिवस लालन केलें होतें तिचा स्वभाव तिनें पुरा जाणला होता. ती प्रफुल्लित केव्हां होते व कशानें होते, आणि ती केव्हां कोमेजते व कां कोमेजते याचा तिनें चांगला अभ्यास केला होता. त्यामुळें मीनाक्षी आपला नाष्टा संपवून गाण्याचें शिक्षण घ्यावयासाठीं जेव्हां दिवाणखान्याकडे गेली तेव्हां तिच्याकडे कांहीं वेळ पहात राहून जुबेदानें आपली मान हालविली व म्हटलें,

" पोरी, माझ्या लक्षांत आलं नाहीं असं तुला वाटतं होय ? "

मीनाक्षी दिवाणखान्यांत गेली तों तिचे शिक्षक तिची वाटच पहात बसले होते. त्यांच्याकडे पाहून हंसून ती म्हणाली,

" बंदगी—"

खांसाहेबांनीं तिचा प्रणाम स्वीकारला व आधींच लावून ठेवलेल्या तंबो-ऱ्याच्या तारांवरून पुन्हां बोट फिरविलें व त्या सुरांत आहेत कीं नाहीं हें अजमावण्यासाठीं मान जरा झुकवून भ्रुकुटीला आंठ्या घातल्या. एकाग्रतेनें कान देऊन ऐकण्याच्या वेळीं मनुष्यानें कपाळाला व भुंवयांना आंठ्या कां घालाव्या व डोळे किलकिले कां करावे या प्रश्नाची चिकित्सा मानसशास्त्रज्ञांनीं करण्यासारखी आहे असें खांसाहेबांचा तो आविर्भाव पाहतांच मनांत येण्यासारखें होतें.

खांसाहेबांनीं तंबोरा जुळवून हातीं देतांच मीनाक्षीनें तो छेडण्यास प्रारंभ केला. त्यांतून भरगच्चपणें निघणाऱ्या षड्जपंचमांचा ध्वनिसंगम खांसाहेबांनीं डोळे मिटून एकतानतेनें मिनिट दोन मिनिटें ऐकला, मग ध्वनीचा उन्माद आल्यासारख्या आविर्भावानें नेत्र उघडून मीनाक्षीकडे पहात म्हटलें,

" हां. चलो. "

आणि पलीकडे बाह्या पडला होता तो जवळ ओढून घेऊन प्रारंभ केला,

धी—धी—धागेत्रक

मीनाक्षीनें स्वर लावला व कालाचा ठोका खांसाहेबांच्या तालांत दिसतांच सुरुवात केली,

" कुंजन पधारो राज "

तिच्या कण्ठांतून चिजेचे स्वर निघतांच ते मूळ होते त्याहून दुप्पट गोड वाटूं लागले व हातांनीं ताल चालू ठेवून खांसाहेब त्या स्वरांच्या माधुर्याचें डोळे मिटून सेवन करूं लागले.

खांसाहेब शरीरानें धिप्पाड होते. त्यांचा चेहरा भव्य होता आणि विपुल दाढीमिशांमुळें तो अधिकच भव्य वाटत होता. ते मूळचे उत्तरहिंदुस्थानांतले, गढवालचे राहणारे. त्यांचीं पन्नासपंचावन वर्षें तिकडेच गेलीं होतीं. पण दोन वर्षांपूर्वीं उमरखान मोत्यांचा सौदा पटवायसाठीं भोपाळकडे गेले होते तेव्हां खांसाहेबांची गांठ पडतांच त्यांनीं अत्याग्रह करून मीनाक्षीला शिक्षण देण्यासाठीं त्यांना आपल्याबरोबर धेनुकुंजास आणलें. उमरखानांनीं त्यांना भरपूर तनखा सुरू केला, रहावयास एक घर दिलें व सर्व प्रकारें त्यांची बरदास्त राखली.

आपण उगीच देश सोडून इकडे आलों असा पस्ताव्याचा विचार आज दोन वर्षांत खांसाहेबांच्या मनांत एक दिवसहि आला नव्हता, आणि मीनाक्षीसारख्या बुद्धिमती व आवाजदार शिष्येला शिकविण्याचा येथें मिळणारा आनंद तर आपल्या भाग्यांत होता म्हणून आपल्याला मिळाला असें त्यांना नेहमीं वाटे. ते पहा तक्क्याला टेंकून, उजवी मांडी उभी ठेवून व आडव्या घातलेल्या डाव्या मांडीच्या आधारानें डग्गा धरून ताल वाजवीत ते किती आनंदभरानें डुलत आहेत.

त्या गुरुशिष्येच्या आनंदाचा विरस करण्याचें पाप कोणी तरी करील काय? पण तें पाप शेवटीं घडलेंच.

उमरखानांचा वृद्ध हिंदू मुनशी, देवशरण, घाबऱ्या घाबऱ्या मीनाक्षीला हांका मारीत आंत आला व हातवारे करीत कायसें बोलूं लागला.

तेव्हां कानाशीं धरलेला तंबोरा दूर करून मीनाक्षीनें विचारिलें,

"काय? आहे काय देवशरण?—"

"आपल्या शिक्षेंत मीं व्यत्यय आणला याची माफी असावी," हातवारे करीत देवशरण म्हणाला, "पण आपण आल्याशिवाय भागायचं नाहीं असं मला वाटलं म्हणून मीं हा अतिक्रम केला. जरा आपण बाहेर यायला पाहिजे."

"म्हणजे—असं आहे तरी काय?"

"म्हातारा लतीफ पाणबुड्या आहे ना—"

"हूं?"

"उमरखानसाहेबांनीं मागच्या मोत्यांच्या मोसमांत त्याला सय्यद अमीर-साहेबांकडे नोकरीला दिला होता—"

"माहीत आहे मला."

"पण आठपंधरा दिवसांत त्याचं अन् अमीरसाहेबांचं कांहीं भांडण झालं अन् त्यानं त्यांची नोकरी सोडली."

"तेंहि आलं होतं माझ्या कानावर."

"झाल्या नोकरीचे पैसे मागायला लतीफ पांचसहा वेळां गेला, पण दर वेळेस अमीरसाहेबांनीं त्याला रागानं अपशब्द बोलून हांकून दिलं."

"होय?" एकदम भ्रुकुटी चढवून मीनाक्षी उद्गारली.

"हो—अन् आज म्हणे लतीफ पुन्हां गेला तों—आपणच बाहेर येऊन लतीफचं म्हणणं ऐकावं म्हणजे कळेल सारं."

" चला येतें मी " असें म्हणून मीनाक्षीनें तंबोरा आडवा ठेवला आणि ती देवशरणबरोबर बाहेर गेली.

बाहेर व्हरांड्याखालीं म्हातारा लतीफ उभा होता. त्यानें मीनाक्षीला पाहतांच सलाम केला. अनेक वादळांशीं झुंजून आपल्या ठाणावर टिकलेलें एखादें झाड असावें तसा लतीफ होता. मोत्यांसाठीं पाणबुडेपणा करण्याचा त्याच्या घरांतला पिढीजात धंदा होता. त्याचा आजोबा पाणबुड्यांना जो एक विचित्र फुफ्फुसांचा रोग होतो म्हणतात त्यानें मेला होता, व त्याचा बाप मोतीं वेचतां वेचतां अपघातानें दगावला होता, आणि अशाच कोणत्या तरी प्रकारचें मरण आपल्याला येणार हें लतीफ जाणून होता. वृक्षाची साल दिवसगतीनें खरखरीत व्हावी त्याप्रमाणें त्याच्या रोड पण काटक शरीरावर वयपरत्वें सुरकुत्या आल्या होत्या. त्याच्या गालांचीं हाडें उंच होतीं, गाल खोल गेलेले होते, आणि डोळे बारीक, किलकिले असल्यानें त्याचा चेहरा जपानी थाटाचा, भावशून्य व किंचित् भयकारक दिसे. आगबोटीवरचे खलाशी घालतात तसलें निळ्या रंगाचें कुडतें व विजार त्यानें एका सरकारी लिलावांत घेतली होती ती त्याच्या अंगांत होती, व कानटोपीसारखी धाबळीची लाल टोपी त्यानें डोक्यावर वांकडी चढविली होती पण तिनें त्याचे पांढरे करडे केंस आच्छादायचें उगीच सोंग केलें होतें इतकेंच.

त्याचा सलाम घेऊन मीनाक्षीनें विचारलें,

" क्यं लतीफ ! क्या हय ? "

" साहेबान्, बडी अफसोसकी बात हय ! "

" काय, झालं तरी काय ? "

" झालं ?—माणसाचा निढळाचा घाम ध्यायचा अन् त्याचा दाम द्यायचा नाहीं ही सैतानी कोणत्या मुलखाची साहेबान् !—"

हे शब्द बोलतांना लतीफचा स्वर चमत्कारिक झाला आणि त्याचे हातवारेहि विचित्रच दिसले. जणूं अत्यंत संतापानें त्याला कांहीं तरी बोलायचें होतें, पण मीनाक्षीच्यासमोर आपल्या तोंडून वावगा शब्द जातां कामा नये याचीहि त्याला जाणीव असल्यामुळें भांड्यांत वाफ कोंडल्यावर भांड्याची स्थिति व्हावी तशी त्याची स्थिति झाली होती. तो पुढें म्हणाला,

" गेल्या मोसमांत अमीरसाहेबांच्या मचव्यावर मी पंधरा दिवस खपलों त्याचे पैसे मी मागायचे नाहींत ? कां नाहीं ?—तेवढ्या पंधरा दिवसांत किती

शिंपला मीं त्यांच्या पदरांत टाकला त्यांनाच सांगा म्हणावं खुदाची कसम खाऊन ! मी का हरामचे पैसे मागतों आहें ?—तुमच्या वडिलांनीं मला हुकूम केला म्हणून मी अमीरसाहेबांच्या मचव्यावर जायचं कबूल केलं. नाहीं तर मीं काम पत्करलंहि नसतं अमीरसाहेबांचं ! काम घेऊन पैसा द्यायचा नाहीं ही नीत या आमच्या बंदरीं कधीं देखली नव्हती आजपवतर ! अमीरांनीं टोपीवाल्याची बूट पाटलूण उचलली तशीच ही नवी बेपारी नीत उचललेली असेल. जेव्हां जावं पैसे मागायला तेव्हां तेव्हां शिव्याखेरीज बात नाहीं ! अन् काय सांगायचं साहेबान्, दोन दमडीच्या नोकराकडून दर वेळीं त्यांनीं मला हांकून दिलेलं आहे ! मला ! या लतीफला ! ज्यानं उभ्या उमरींत तांडेलाकडनंसुद्धां कधीं उणा शब्द बोलून घेतला नाहीं ! दर वेळीं वाटे एक लाथ कमरेंत मारून त्या नोकराला मरणच दाखवावं त्याच्या मस्त मालकाच्या डोळ्यादेखत ! पण या प्रकरणांत तुमच्या वडिलांची अब्रू मला संभाळायची ! त्यांनीं मला अमीरसाहेबांच्या तैनातींत दिला ! माझ्या वागण्यानं त्यांना वाईट वाटतां कामा नये ! अशा विचारानं दर वेळीं राग गिळून परत आलों !—पण साहेबान्, आज अखेर झाली !—अखेर झाली ! ”

हे उद्गार काढतांना लतीफनें डाव्या हातानें आपल्या कुडत्याचा छातीवरचा भाग गोळा करून दाबला व मानेला झटका दिला. जणूं एखादी जिव्हारी जखम तो आतां उघडी करून दाखविणार होता व त्यापूर्वीं तो आपलें मन घट्ट करीत होता.

मीनाक्षी त्याच्याकडे पहात राहिली. जेवढें ऐकलें तेवढ्यानें तिची प्रसन्नता पार नाहींशी झाली होती. तिच्या कपाळावर एक अस्पष्ट आढी दिसूं लागली होती व तिचा खालचा ओंठ किंचित् दांताखालीं सांपडत होता.

“ आज आठ दिवस खोपट्यांत बायको तापानं बेभान होऊन पडली आहे. तिन्ही कच्चीं बच्चीं तर आज महिनाभर आडवीं आहेत. माझा थोरला या वेळीं असता तर त्यानं घर सावरलं असतं ! पण दर्यानं त्याला पोटांत घेतलं तुम्हांला माहीतच आहे. बायकोसाठीं किरिस्ती डागदाराला चार दिवस आणला. काल बोलवायला गेलों तर तो म्हणतो आधीं झालेले दाम दिल्याविना मी यायचा नाहीं. गाडग्यांत तर मीठमिरची आणीन म्हटलं तर दमडी नाहीं. अशा खराब वक्ताला अमीरसाहेबांकडे गेलों अन् सगळी हालत सांगून म्हटलं पैसे द्या. माझे उजू

पैसे मीं हवे म्हटले तर माझा काय अपराध झाला ?—पण माझ्या तोंडची बात पुरी संपली पण नाहीं तों त्यानं कोंपऱ्यांतला चाबूक घेतला अन् माझ्या पाठी-वर सप्‌दिशीं कडाडवून म्हणाला, पुन्हां इथं पाय टाकशील तर जीव घेईन!—हा पहा, माझ्या पाठीवर वळ दिसत असेल. पाहिलात ?—"

मीनाक्षीनें पाहिलें तों लतीफच्या काळ्या सुरकुतलेल्या चामड्यावर भली मोठी निळसर लालसर रेषा उमटलेली होती. तिच्या अंगावर शहारे आले, व तिनें दृष्टि झटकन् फिरवली.

लतीफनें कुडतें पुन्हां खालीं सरकवलें व म्हटलें,

"साहेबान्, अमीरानं माझ्या पाठीवर चाबूक ओढला त्या वेळीं या डाव्या पंजाच्या पकडींत धरून त्याची मुंडी मुरगळायला मला उशीर होता ?—पण तुम्ही माणसं मला देवमाणसं आहांत. उमरखानसाहेबांचा दिल दुखेल असं मला कांहीं करायचं नाहीं. म्हणून तिथून निघालों अन् तुमच्या वडिलांच्या चरणापाशीं फिर्याद द्यायला आलों. खानसाहेब गांवीं गेले आहेत तर मुनशीला सांगितलं मला तुमची भेट चालेल. चाबूक उचलून चमकावणं अमीराला पोरखेळ वाटला असेल. पण त्याला ठाऊक नाहीं कीं डाव धरून मरण दिलं तर फुर-शाच्या डंखापेक्षां जालीम देईन. पण साहेबान्, तुम्ही सांगाल तर पाठीवरचा हा वळ आंवडा गिळून पचवीन अन् त्याची याद या जन्मीं करणार नाहीं! सांगा, साहेबान्, तुमची भाकर इतकीं वर्षं खाल्ली, तुम्ही हुकूम कराल तो ऐकेन."

इतकें बोलून लतीफ थांबला खरा, पण आंतून उसळणारा त्याच्या संतप्त हृद-याचा आवेग संपला नव्हता, त्यामुळें वादळांत एखादें जुनें खोड गदगदां हालावें त्याप्रमाणें त्याच्या जीर्ण शरीराला कंप सुटला होता व त्याचे हातवारे अस्वस्थपणाचे होत होते.

मीनाक्षीदेखील तें सारें ऐकून अत्यंत अस्वस्थ झाल्यासारखी दिसली. आपल्या मनांत उसळलेले विचार दाबण्याचा ती प्रयत्न करीत होती व त्यासाठींच जणू तिचा डावा हात वक्षस्थलावर राहिला होता. पण पाणी जसें अडविलें तर दुसरीकडून वाहतें त्याप्रमाणें हृदयांत दाबलेले विचार जणू तिला नकळत तिच्या मुद्रेवर प्रगट झाले होते व तिच्या मुखमंडलावर एकदम कृष्णपटल दिसूं लागलें होतें.

लतीफ बोलेनासा झाल्यावर ती क्षणभर स्तब्ध उभी राहिली व मग म्हणाली,

"मी सांगेन तें ऐकायला तूं तयार आहेस?"

"बेशक!"

"मुनशीकडून मी तुला पन्नास रुपये देवविते ते आत्तां घेऊन जा. देवशरण, याच्या पदरांत आत्तां पन्नास रुपये टाका. लतीफ, यापलीकडे मला या वेळीं कांहीं सुचत नाहीं. बाप्पा आले म्हणजे ते तुला सांगतील."

इतकें बोलून ती झटकन् वळली व जाऊं लागली. पण तेवढ्यांत तिनें मुनशीला म्हटलें,

"अन् देवशरण, खांसाहेबांना सांगा मला आतां चक्कर येते आहे, आज पुरे तालीम."

ती जीं गेली ती आपल्या खोलीकडे गेली व अंथरुणावर अंग टाकून तिनें उशींत आपलें मस्तक लपविलें. विव्हल झालेल्या स्वरांत ती कण्हली,

"माझ्या नशिबा!—"

जुबेदा तिच्या मागोमागच खोलींत आली होती. तिनें तिचा तो असहाय उद्गार ऐकतांच जवळ जाऊन तिच्या मस्तकावरून हात फिरविला व म्हटलें,

"मीना! बेटा, हें काय?—काय झालं?"

उशींत लपविलेलें मस्तक झटकन् उचलून जुबेदाचा हात जणूं आधारासाठीं पकडीत ती म्हणाली,

"जुबी, लतीफनं सांगितलेलं ऐकलंस ना सारं तूं?—असल्या पशूशीं मी संसार करीत जन्म काढायचा! बाप्पांचं सारं वात्सल्य या एका बाबतींत अगदीं नष्ट कसं झालं आहे? जुबी, जुबी!—एवढं हें माझं नशीब टळायचं नाहीं का?—"

असें म्हणून तिनें आपलें मस्तक जुबीच्या छातीवर टेंकलें व डोळे मिटून घेतले.

जुबीनें तिच्या मस्तकाचें चुंबन घेतलें व डोळ्यांतलीं आंसवें तिच्या केशभारावर गळूं दिलीं.

कांहीं वेळानें देवशरण तेथें आला व त्यानें सांगितलें कीं आजच्या डाकेनें आलेल्या पत्रांत उमरखानसाहेबांचें पत्र असून उद्यां सकाळीं आपण धेनुकुंजला येऊन पोंचूं असें त्यांनीं लिहिलें होतें.

तें ऐकतांच घटकेपूर्वीचा खेदाचा विषय जणूं मीनाक्षीच्या विचारांतून पार नाहींसा झाला व ती एकदम सरळ बसून म्हणाली,

" उद्यां बाप्पा येणार ?--खरं ? पाहूं पत्र ? "

देवशरणनें पुढें केलेलें पत्र तिनें घेऊन वाचलें व मग तें परत त्याच्या हातीं देत ती म्हणाली,

" ओह्हो ! क्या बडी बात हय !—जुबी, चल बाई, आत्तांपासून बाप्पांच्या खोलीची टापटीप मला पाहिली पाहिजे. मी नवा रेशमाचा चित्ता भरून ठेवला आहे त्याची बाप्पांना आधीं दाद लागूं द्यायची नाहीं अं जुबी ! नाहीं तर भाबडेपणानं टाकशील सांगून. तुझ्या पोटांत गुपित म्हणून कसं तें रहात नाहीं ! बाप्पांनीं रेशीमकाम भिंतीवर पाहून विचारलं पाहिजे हें कोणाचं म्हणून !—परवां मुंबईचा फेरीवाला आला होता त्याच्याजवळ आपण गुच्छदान घेतलं आहे तें कुठं ठेवलं आहेस जुबी ?—आण तें. तें खोलीच्या मधोमधच्या टेबलावर मांडायचं बरं का ? तें पाहतांच बाप्पा थक्कच होणार !—चल, जा, आण तें !—अन् मुनशी, ड्रायव्हरला सांगा गाडी सकाळीं बरोबर आठला तयार ठेवायला. बाप्पांना आणायला बंदरावर जायचं त्यांत उशीर होतां कामां नये ! बरं का ? सक्त ताकीद द्या त्याला !—आणखी हें पहा, बाप्पांच्या गुडाखूसाठीं—"

असे मुनशीलाच नव्हे तर साऱ्या नोकराचाकरांना नाना प्रकारचे हुकूम सोडतां सोडतां मीनाक्षीची धांदल उडाली. तिची ही धांदल नेहमींची होती. उमरखान जरी आठदहा दिवस फिरतीवर गेले असले तरी ते परत यावयाचें कळलें कीं जणूं ते साता समुद्रांपलीकडून परत घरीं येणार अशापैकीं मीनाक्षी आनंदानें भांबावून जावयाची व इतर सर्वांना भांबावून सोडावयाची हें नेहमींचें ठरलेलें होतें. त्यामुळें तिची ती लगबग पाहून देवशरणला किंवा इतर नोकरांना नवल वाटलें नाहीं.

पण जुबेदा मात्र तिच्याकडे पहातच राहिली. कारण, अर्ध्या घटकेपूर्वीच मीनाक्षीनें ढाळलेलीं ऊष्ण आंसवें तिच्या छातीवरच्या वस्त्रभागांवरून अजूनहि पुरीं वाळलीं नव्हतीं. सय्यद अमीरशीं आपलें लग्न लावण्याचा बेत करण्याबद्दल तिनें बापाविषयीं उच्चारलेले किंचित् कठोर शब्द अजूनहि तिच्या कानांत घुमत होते. पण बाप घरीं परत येणार हें कळतांच त्या आनंदभरांत

मीनाक्षी जणूं तें सारें दुःख पार विसरली होती. अर्ध्या घटकेपूर्वीं ही खरोखरच आपल्या कुशीला बिलगून रुदन करीत होती काय असा जुबेदाला तिच्याकडे पाहतां पाहतां भ्रम वाटला. तिच्या अमर्याद पितृभक्तीचें किती कौतुक करावें असें तिला होऊन गेलें.

आणि या घटकेला मीनाक्षीच्या पितृभक्तीचें जसें कोणालाहि कौतुक वाटण्यासारखें होतें तसेंच दुसऱ्या दिवशीं सकाळीं बंदरावर पितापुत्रीची भेट झाली ती पाहतांच उमरखानांच्या वात्सल्याचेंहि पाहणाराला कौतुक वाटलें असतें. एखाद्या अर्भकाला बाहुपाशांत घ्यावें तसें त्यांनीं मीनाक्षीला जवळ घट्ट धरलें व म्हटलें,

"बेटा! मजेमें हय?—"

आणि तें म्हणतांना त्यांचा गद्गद स्वर नीटसा उमटलाहि नाहीं.

त्यांच्या कोटाच्या मधल्या बटनाशीं बोटांचा चाळा करीत मीनाक्षीनें उलट विचारलें,

"तुमची सफर मजेंत झाली?—"

"हो हो. फार मजेंत. पण प्रवासांत कितीहि मौज आली तरी परत घरीं येऊन तूं अशी भेटलीस कीं जो आनंद होतो त्याला कशाचीच सर नाहीं."

हें बोलतांना खानसाहेबांनीं लेकीचें मस्तक थोपटलें.

खानसाहेब उंच नव्हते; पण ठेंगणे असले तरी त्यांचा बांधा फारच मजबूत होता. त्यांच्यांत व मीनाक्षींत साम्य फारच कमी होतें. कारण मीनाक्षी आपल्या आईच्या वळणावर गेली होती. फक्त नाकपुड्यांचा रेखीवपणा मीनाक्षीनें त्यांच्यापासून उचललेला दिसत होता. मात्र खानसाहेब देखणे नसले तरी देखण्या पत्नीचा व त्यांचा जोडा शोभला असेल अशी त्यांजकडे पाहतांच खात्री पटण्यासारखी होती. त्यांचा चेहरा भरलेला व भव्य होता, आणि त्यांनीं हनुवटीवर जी आंखूड, कोचदार दाढी राखली होती तिच्यायोगानें त्यांच्या मुद्रेत एक प्रकारचें गांभीर्य आलें होतें. त्यांच्या किंचित् खोल डोळ्यांकडे पाहतांच त्यांतून अधिकाराची करडी नजर आणि प्रेमळपणाची कोंवळी दृष्टि सारख्याच स्वाभाविकपणें बाहेर पडत असेल याविषयीं संशय राहण्यासारखा नव्हता. आणि त्यांच्या जिव्हणीच्या ऐटींत जसा करार आणि

जरब दिसे तशीच त्यांच्या जाडशा खालच्या ओंठावरून त्यांच्या रसिकतेची व कलासक्तीची साक्ष पटत होती.

मीनाक्षीचें मस्तक थोपटतां थोपटतां खानसाहेबांनीं कसली तरी आठवण झाल्यासारखें केलें व म्हटलें,

" हां पण मीना, माझ्याबरोबर कोण आलं आहे तें तूं पाहिलंच नाहींस ! "

" कोण ? "

" बघ ना." असें म्हणत खानसाहेब तिच्यासकट मागें वळले.

एक अगदीं उतार वयाचा, किडकिडीत बांध्याचा व अत्यंत प्रसन्न चेहऱ्याचा इसम मागें उभा होता त्यानें हास्य केलें व मीनाक्षीला विचारलें,

" क्यं ? मीना ?—"

मीनाक्षी आनंदभरानें म्हणाली,

" ओह्हो ! अस्लमकाका !——आजची ही सकाळ मोठी आनंदाची पर्वणीच दिसत आहे ! "

तें ऐकून मीनाक्षीच्या चतुर बोलण्याचें कौतुक करण्यासाठीं म्हणून अस्लमकाकांनीं तिच्या वडिलांकडे पाहून हास्य केलें.

मीनाक्षीच्या वडिलांचा व अस्लमकाकांचा फार जुना स्नेह होता. धेनुकुंजाच्या दक्षिणेस पंचवीसतीस मैलांवर बांदेष म्हणून जें लहानसें गांव आहे तेथें अस्लम डॉक्टरीचा धंदा करीत असत. पण हा धंदा ते केवळ परोपकारासाठीं करीत. त्यांची बांदेषच्या आसपास मोठी जमीनदारी होती व शिवाय त्यांच्या घरांत पिढीजाद सावकारीहि चालत होती. डॉ. अस्लम उमरखानांपेक्षां सहज पंधरावीस वर्षांनीं वडील होते पण ते त्यांच्याशीं अगदीं बरोबरीनें व खेळीमेळीनें वागत, आणि उमरखानहि त्यांच्याशीं बरोबरीनें वागण्यांतसुद्धां आपल्या वर्तनांतील आदराचा भाग कधीं लोपूं देत नसत. बांदेषच्या बाजूला प्रवास झाला कीं, उमरखान येतांना अस्लमकाकांना ओढून बरोबर आणल्याशिवाय रहात नसत आणि मग अस्लमकाकांना घरीं परत जावयाची परवानगी मिळवितां मिळवितां मुष्कील होत असे. धंद्यानिमित्त उमरखानांनाच हालायची वेळ आली तर वेगळें. आणि खानसाहेबांच्याकडे डॉ. अस्लम पाहुणे आले कीं दोघांना बुद्धिबळाचा पट मांडून बसण्याखेरीज कांहीं सुचत नसे. केव्हांहि पहावें

तों खानसाहेबांच्या दिवाणखान्यांत हे दोघे स्नेही पाळीपाळीनें गुडाखू ओढीत, गंभीर चेहरे करून, एकमेकांचीं मोहरीं कापण्यांत मग्न झालेले दिसत.

त्या दोघांच्या या नादिष्टपणाला उद्देशून मीनाक्षी हंसत म्हणाली,

" काका तुम्ही आलां आहांत, पण बुद्धिबळाचा पट आणखी मोहरीं परवांच मीं समुद्रांत टाकून दिलीं आहेत. तुम्ही आलांत कीं बसतां सारखे डाव मांडून. माझ्याशीं चार शब्द बोलायलासुद्धां तुम्ही राजी नसतां, माझ्या घरांत असला नादिष्टपणा मी नाहीं चालूं द्यायची !—"

यावर डॉ. अस्लम मनःपूर्वक हंसले व म्हणाले,

" बरं बरं. पण मी खानसाहेबांच्या घरीं पाहुणा आलों आहें, तुझ्या घरीं नाहीं. त्यांचं घर तुझं कुठलं ? तुझी शादी झाली म्हणजे मग तुला हक्काचं घर म्हणून त्या बंगल्याकडे बोट दाखवितां येईल, अन् मग तिथं येतांना आम्ही आपण होऊनच आमचा उंट-हत्तींचा सरंजाम मागं ठेवून येत जाऊं ! समजलीस मीना ! "

हें बोलतांना त्यांनीं दूर दिसणाऱ्या सय्यद अमीरच्या बंगल्याकडे बोट दाखविलें.

त्यांची कल्पना मीनाक्षी आपल्या कोटीनें लाजेल व चिडल्याचा कांहीं तरी खोटा आविर्भाव करील. पण त्यांनीं पाहिलें तों अमीरच्या बंगल्याकडे वळून पाहण्याऐवजीं मीनाक्षीनें मान खालीं घातली व तिची चर्या गंभीर होऊन तिच्या कपाळावर अढीदेखील चढलेली दिसली.

त्यांना त्याचें जरा नवल वाटलें. त्यांनीं उमरखानांकडे पाहिलें तों तेहि मीनाक्षीच्या त्या मुद्रेवरील अनपेक्षित विकाराचें मनाशीं आश्चर्य करीत असावेतसें दिसलें.

तितक्यांत बंदरालगतच्या रस्त्यावर एक ऐटबाज मोटार येऊन थडकली आणि तींतून सय्यद अमीर बाहेर पडला.

उतरल्याबरोबर त्यानें तोंडांतली सिगारेट फेंकून दिली व हातांतली शिशवीची काठी ऐटबाजपणें टेकीत तो ही मंडळी उभी होती तिकडे येऊं लागला. त्यानें मीनाक्षीकडे पाहिलें व प्रसन्न मुद्रेनें हास्य केलें.

पण मीनाक्षीनें उलट हास्य करण्याऐवजीं मान फिरविली आणि ती झटकन् तेथून जी निघाली ती आपल्या मोटारींत जाऊन बसली.

सय्यद जवळ आला व उमरखानांचें व डॉ. अस्लमचें स्वागत करून म्हणाला, " आपण आत्तां सकाळीं येणार हें मला कळलं होतं. पण कामं संपवून निघतां निघतां यायला उशीरच झाला. तरी बरं बंदरावर गांठ पडली—"

त्याच्या त्या बोलण्यावर सहास्य मुद्रेनें खानसाहेबांनीं कायसें उत्तर दिलें; पण त्यांचें चित्त त्या उत्तरांत नव्हतें. मीनाक्षी सय्यदला टाळून गाडींत जाऊन बसली याचें त्यांना आश्चर्य वाटलें होतें व हें तिनें बरें केलें नाहीं अशीहि रुख-रुख त्यांच्या मनांत उत्पन्न झाली होती.

त्यांनीं मीनाक्षीकडे पाहिलें तों ती जणूं बंदरावर आपल्या ओळखीचें कोणी नाहींच अशा वृत्तीनें गाडींत बसली होती व हातांतल्या लोंकरीच्या विणकामांत सर्वस्वीं गढल्यासारखी दिसत होती.

खानसाहेबांना तें बरें वाटलें नाहीं.

---

# प्रकरण ९ वें

## चंदनाची उटी



सारखा बुद्धिबळाचा डाव मांडून न बसण्याबद्दल मीनाक्षीनें थट्टेथट्टेनें दिलेली ताकीद डॉ. अस्लमनीं बंदरावर मान्य केली खरी, पण त्या कबुलीप्रमाणें ते व उमरखान वागले असतील अशी कल्पना कोणीं करूं नये. व्यसनी माणसाच्या व्यसनाहूनहि बुद्धिबळांचा नाद माणसाला अंकित करतो. दारूबाजाला जसें ग्लास समोर दिसल्यावर राहवत नाहीं तसेंच बुद्धिबळांच्या गोडींत सांपडलेल्या माणसाचें आहे. इतकेंच काय, दारूबाजाला सामान्यतः संध्याकाळींच निशापाण्याची वासना होईल पण बुद्धिबळें खेळणाऱ्याला अमुक काल उक्त आणि अमुक निषिद्ध असें नाहींच. त्यामुळें डॉ. अस्लम आल्यापासून तीनचार दिवस त्यांचीं आणि उमरखानसाहेबांचीं बुद्धिबळें जीं चालू झालीं त्यांना खंडच नव्हता. मीनाक्षीला बुद्धिबळांतले सूक्ष्म प्रकार फारसे समजत नसत. किंबहुना तो डावच तिला आवडत नसे. अर्धा अर्धा घटका एकेका खेळीचा विचार करीत दोघां माणसांनीं एकमेकांसमोर चित्रासारखें बसावयाचें ही कल्पनाच तिला हिडिस वाटे, व अस्लमकाकांची चेष्टा करतांना ती बुद्धिबळाविषयींचें आपलें हें मत बोलूनहि दाखवी. त्यावर अस्लमकाका म्हणत,

"बायकांना बुद्धिबळाचा डाव आवडत नाहीं हें सरळच आहे. ज्यांना बुद्धीच नाहीं त्यांना बुद्धिबळें कशीं आवडावींत ?"

"तर तर !" मीनाक्षी यावर म्हणे, "असं नाहीं कांहीं ! बायकांची बुद्धि अधिक सौंदर्यशोधक आणि चपल असल्यामुळं ती या घुम्या, रुक्ष डावांत रमत नाहीं बरं का !"

ती तिची कोटि ऐकून व बोलण्याच्या वेळीं होणारे तिचे लाडके हावभाव पाहून डॉ. अस्लमना मोठें समाधान वाटे व ते खानसाहेबांकडे वळून म्हणत,

" बडी चलाख हय ! हिच्या भावी पतीची कशी त्रेधा उडणार तें मला आतांच दिसतं आहे स्पष्ट."

यावर उमरखान हंसत आणि आनंदभरित मुद्रा करून गुडाखूचा मनसोक्त झुरका घेऊन नळी अस्लमकाकांच्यापुढें करीत.

याप्रमाणें बुद्धिबळाच्या खेळाविषयीं जरी मीनाक्षीच्या मनांत अप्रीति होती तरी दिवाणखान्यांत डाव पडलेला असला म्हणजे ती आपल्या व्यवसायांतून फुरसत सांपडली कीं वडिलांच्या किंवा काकांच्या शेजारीं बसून रहात असे. त्यांचा डाव ती पहातहि नसे; हातानें ती लोकरीचें किंवा कशिद्याचें कांहीं काम करी, आणि वडिलांचें व काकांचें मधूनच कांहीं बोलणें निघालें तर तिकडे लक्ष देई व त्यांत भागहि घेई.

आत्तांहि ती याप्रमाणेंच बसली होती.

रात्रींचे नऊ वाजून गेले होते व चमचमीत भोजनाचा समाचार घेतल्या-नंतर ज्या ताज्या वृत्तीनें डावाला सुरुवात होते त्या वृत्तींत खानसाहेब व अस्लम-काका होते. गुडाखूच्या खुशबूनें सारा दिवाणखाना दरवळून गेला होता. दिवाणखान्याच्या मध्यभागीं एक झगझगीत दिवा टांगलेला होताच, पण जेथें खानसाहेब व अस्लमकाका यांच्यासाठीं समोरासमोर दोन लोड मांडले होते तेथें दोन मोठालीं शामदानें ठेवलेलीं होतीं. त्या शामदानांच्या ज्योतीभोंवतीं घोटाळणाऱ्या चित्रविचित्र किड्यांच्या वांकड्यातिकड्या फेऱ्या चालू होत्या. मध्येंच समुद्राकडच्या खिडक्यांतून वाऱ्याचा झोत आला म्हणजे शामदानांच्या ज्योति हालत व तशा त्या हालल्या म्हणजे अस्लमकाकांची सावली भिंतीवर पडली होती तीहि कंप पावून कांहीं विचित्रच दिसे. दिवाणखान्यांत इतकी कमालीची स्तब्धता होती कीं खानसाहेब किंवा अस्लमकाका गुडाखूचा झुरका मारीत तेव्हां " गुड गुड गुड " असा जो शब्द निघे तो किती तरी मोठा वाटे.

मीनाक्षी बापाच्या उजव्या हाताला लोडाला टेंकून बसली होती व अस्लम-काकांनीं मुद्दाम तिच्यासाठीं आणलेलें इसापनीतीचें सोपें इंग्रजी पुस्तक वाच-ण्यांत दंग झाली होती. एखादी खेळी उत्तम साधल्याबद्दल त्या बुद्धिबळपटूंना जितका आनंद होत होता तितकाच एखादा कठीण इंग्रजी शब्द लागला व समजला कीं तिला होत होता.

बराच वेळ तिचें वाचन झालें तरी त्या दोघांचा डाव आटपण्याचें चिन्ह दिसेना. तिच्या पुस्तकांत देवापाशीं राजा मागून घेणारे बेडूक मूर्ख ठरले, पंजांतून उंदराला जिवानिशीं सोडून देणाऱ्या सिंहाचे उपकार उंदरानें फेडले, सर्वांचेंच ऐकणाऱ्या म्हाताऱ्याचा बैल शेवटीं पाण्यांत बुडून मेला, सिंहाचें कातडें पांघरणाऱ्या गाढवाची फटफजिती झाली, आणि उगीचच्या उगीच लांडगा आला रे आला म्हणून ओरडा करणाऱ्या गुराख्याचीं सारीं मेंढरें लांडग्यानें खाऊन टाकलीं तरी तिनें पाहिलें तों त्या दोघांचा डाव चालूच होता. डाव संपायला किती अवकाश आहे त्याचा अदमास घेण्यासाठीं तिनें पटावरचीं मोहरीं कोणकोणत्या घरांत आहेत तें निरखून पाहिलें.

तितक्यांत तिच्या वडिलांनीं घोडें पुढें टाकलें व त्याबरोबर गुडगुडीची नळी एकदम तोंडावेगळी करून व टाळी वाजवून अस्लमकाका ओरडले,

"बहोत अच्छी! आतां दोन डावांत तुमच्यावर प्यादी! समजलांत!— बोला, आहे कबूल?"

उमरखानांनीं कांहीं वेळ पटाकडे पाहिलें व पुढें कोणत्या खेळी क्रमप्राप्त आहेत तें त्यांच्या लक्षांत येतांच ते म्हणाले,

"अरे तिच्या! असं झालं काय? मीं घोडं उगीच टाकलं पुढं. कबूल आहे बुवा. झाली प्यादी!"

"हः हः हा!" करून अस्लमकाका हंसले व मीनाक्षीकडे पाहून म्हणाले, "तुझ्या बापाला उगीच अभिमान आहे आपल्या खेळाचा!"

मीनाक्षी नुसती हंसली.

गुडगुडीची नळी हातांत घेत उमरखानांनीं म्हटलें,

"मग टाकायचा आहे का आणखी एक डाव? परत आहेर करून टाकतों प्यादीचा तुम्हांला! माझा अभिमान खोटा समजत तुम्हीं झोंपीं जावं हें नाहीं मला बरं वाटत."

"नको नको, ती पहा मीनाक्षीच्या कपाळावर केवढी अढी चढली ती. आज तीन दिवस सारखा डाव मांडून बसल्याबद्दल आधींच तिचा जबर राग झाला असेल आपल्यावर, अन् आतां इतक्या रात्रीं नवा डाव सुरू केला तर ती इथनं उठून निघूनच जाईल. अन् पुढं मग आपल्या सासरीं ती मला कधीं येऊं यायची

नाहीं. मी तर तिची शादी झाली कीं अमीरसाहेबांकडे दोनदोन महिने जाऊन तळ द्यायचा मनांत बेत करून ठेवला आहे. नको, डाव नको. गुंडाळा पट !"

असें म्हणून अस्लमकाका मोठ्यानें हंसले. पण मीनाक्षी उलट हंसली नाहीं इतकेंच नव्हे तर तिनें मानेला नापसंतीदर्शक झटका देऊन हातांतल्या पुस्तकाकडे दृष्टि फिरविली, आणि तिच्या चर्येवर एकदम कृष्णछाया पसरली.

खानसाहेबांच्या तें ध्यानांत आल्यावांचून राहिलें नाहीं. मीनाक्षीच्या चेहऱ्यावरची ही अप्रसन्नतेची छाया आज तीन दिवस त्यांना पुनः पुन्हां दिसली होती व दर वेळेस त्यांना त्याबद्दल आश्चर्य वाटलें होतें. सय्यदबद्दलचा कांहीं विषय निघाला किंवा लग्नाबद्दल उल्लेख करून डॉ. अस्लमनीं कांहीं विनोद केला कीं मीनाक्षीच्या हंसत्या चेहऱ्यांत झटकन् चलबिचल होई. श्रावण महिन्यांत हिरव्याचार शोभिवंत कुरणावर आकाशांतल्या धांवत्या ढगाची भली मोठी सावली झर्रदिशीं इकडून तिकडे पसरलेली दिसावी आणि जरा वेळानें जावी त्याप्रमाणें तिच्या मुद्रेवर फेरबदल झालेला त्यांच्या वारंवार दृष्टीस पडला होता.

खानसाहेबांप्रमाणेंच डॉ. अस्लम यांच्याहि ध्यानांत ती गोष्ट आली होती, व म्हणून काल रात्रीं बुद्धिबळें संपवून ते दोघेच जेव्हां गप्पा मारीत बसले तेव्हां त्यांनीं खानसाहेबांजवळ तो विषय काढून म्हटलें होतें,

" खानसाहेब, मीनाबद्दल एक गोष्ट तुमच्या ध्यानांत आली ना ? "

" हं—त्याचंच मी मनाशीं सारखं आश्चर्य करतों आहें."

" कां बरं असं व्हावं ? तिची चर्या एकदम पालटते यांत शंकाच नाहीं. कां बरं ?—"

" कांहीं कळत नाहीं—"

" लग्न ठरविण्यापूर्वी तिच्या मनाचा कल तुम्ही पाहिलाच असेल. अन् सय्यदबद्दलहि तुम्हीं पूर्ण विचार केला असेलच. तुम्ही सूज्ञच आहांत. मीं तुम्हांला कांहीं शिकवायला पाहिजे असं नाहीं. पण तुमचा जांवई व्हायला सय्यद सर्वस्वी लायक आहे अशी तुम्हीं आपल्या मनाची पुरी खात्री करून घेतली आहे ना ? अन् तो कितीहि लायक असला तरी मीनाला तो पसंत वाटतो कीं नाहीं याचा घ्यायचा तसा अदमास तुम्हीं घेतला आहे ना ?—"

" डॉक्टर, असल्या गोष्टींत मुलींच्या मनाचा कल पाहणं मला पसंत नाहीं. मी नव्या मताचा माणूस आहें अन् म्हणूनच मीनाला इतकं स्वातंत्र्य

देऊन मीं वाढवलं कीं मी धनाढ्य आहें म्हणूनच इथले लोक मला तोंडावर हंसत नाहींत. तिच्या शिक्षणाची मी किती नानाप्रकारं काळजी घेतली तुम्हांला माहीतच आहे. या सबंध पश्चिम किनाऱ्याच्या प्रान्तांत इतकी सुविद्य अन् कलावती मुलगी मिळायची नाहीं असं तुम्हीच नेहमीं कौतुकानं म्हणतां. पण हें सारं झालं तरी मीनासारख्या कोवळ्या वयाच्या मुलीला नवरा पसंत करण्याची अक्कल असते हें मला मान्य नाहीं. माझं हें मत तुम्हांला विलक्षण वाटेल, पण तें आहे खरं. म्हणून तिच्या मनाची सय्यदकडे कितीशी ओढ आहे हें अजमावण्याचा मीं कधीं प्रयत्नच केला नाहीं. लग्नानंतर प्रेम आपोआप उत्पन्न होतं अशा मताचा मी आहें. मीना सय्यदच्या घरीं गेली कीं त्याच्यावर ती खचित प्रेम करूं लागेल."

इतकें म्हणून खानसाहेबांनीं गुडगुडीचा एक दीर्घ झुरका घेतला, आणि पुढें म्हटलें,

"अन् तुम्हीच सांगा सय्यद काय वाईट आहे ? त्याची संपत्ति विस्तारानं आज माझ्याइतकी नसली तरी ती खानदानीची आहे. राजवंशांतला तो आहे. डॉक्टर, या लग्नांत माझा एक फार खोल हेतू आहे तो तुम्हांला सांगायला हरकत नाहीं. आमचं कूळ कितीहि झालं तरी बाटलेल्या मुसलमानाचं. आमचं रक्त अस्सल मुसलमानी नाहीं तुम्ही जाणतांच. मग मीना जर सय्यदच्या घरांत दिली तर अस्सल मुसलमानी रक्ताच्या राजवंशाशीं आमच्या कुळाचा संबंध घडून येऊन आमच्या कुळाची इभ्रत शतपटीनं वाढायची नाहीं ?"

हें ऐकून डॉक्टरनीं मान हालविली. पण ती पसंतीची होती कीं नापसंतीची होती तें नीटसें कळण्यासारखें नव्हतें. म्हणून खानसाहेब पुन्हां म्हणाले,

"अन् हा माझा हेतू सोडला तरी सय्यद मीनाला पसंत असण्यासारखाच नाहीं का ? तो स्वरूपवान आहे, तरुण आहे, श्रीमंत आहे, सगळं कांहीं आहे ! आतां—आतां—"

खानसाहेब जरा घोंटाळले व म्हणाले,

"तुम्हांला सगळ्याच गोष्टी स्नेहभावानं उघड सांगतों आहें म्हणून सांगतों कीं तो जरा व्यसनी अन् स्वभावानं तापट आहे. पण लग्न होऊन माणूस बायकोबरोबर रमला कीं जवानीचे हे दोष जातात, नाहीं का ? मीनाचा सहवास

त्याला मिळाला कीं सय्यद आपोआप निवळेल. मीं ठरवलं आहे त्यांत मीनाचं सुखच आहे याविषयीं मला शंका नाहीं."

असें म्हणून खानसाहेब काल रात्रीं हंसले होते व त्यावर डॉ. अस्लम यांनींहि "तुमच्या मनाची तशी खात्री असल्यावर मग माझं कांहीं म्हणणं नाहीं." असें हंसत म्हटलें होतें व दोघांची गुडगुडी त्यानंतर मोठ्या मजेंत चालू झाली होती.

पण काल रात्रीं कृत्रिमपणानें दाबलेली मनाची रुखरुख आपल्या मनांत जशीच्या तशीच आहे असें आज सकाळीं उठल्यानंतर थोड्याच वेळांत खान-साहेबांना समजून आलें. गप्पाविनोदांत सय्यदचा किंवा मीनाक्षीच्या विवा-हाचा विषय साहजिकपणेंच निघे व त्या त्या वेळीं मीनाक्षीची मुद्रा एकदम पालटे. सय्यदची निशाणबाजी असामान्य म्हणून साऱ्या पश्चिमकिनाऱ्यावर ख्याति पण तो विषयसुद्धां निघालेला मीनाक्षीला खपला नव्हता. ती अस्लम-काकांना कडवटपणें म्हणाली होती,

"हरणाची शिकार साधायच्या वेळीं चित्तासुद्धां असं कांहीं चातुर्य दाखवतो कीं बोलायची सोय नाहीं, म्हणून त्या वेळच्या त्याच्या पवित्र्यांत प्रगट होणाऱ्या सौंदर्यावर मोहित होऊन चित्त्याला कोणी आपल्या घरांत आणून मोकळं सोडीत नाहीं!"

हे उद्गार तिनें काढले तेव्हां अस्लमकाकांनीं खानसाहेबांकडे अशा कांहीं रोखानें पाहिलें कीं जणू "खानसाहेब, तुम्ही मारे काल रात्रीं मीनाला सय्यद पसंत असणारच अशा विश्वासानं बोललांत, पण हें पाहिलंत?" असेंच त्यांना म्हणावयाचें होतें.

डॉ. अस्लमची ती अर्थपूर्ण दृष्टि अजून खानसाहेबांच्या अंतर्दृष्टीला स्पष्ट दिसत होती, आणि आतां बुद्धिबळाचा डाव आवरतां आवरतां अस्लमकाकांनीं मीनाक्षीची तिच्या लग्नाचा उल्लेख करून चेष्टा करतांच तिनें झटक्यानें मान वळवून हातांतल्या इसापनीतीकडे दृष्टि फिरविलेली जेव्हां त्यांना दिसली तेव्हां ते मनांत चांगलेच चरकले—

चरकले, पण त्याच क्षणीं त्यांचें एक मन त्यांना म्हणालें,

"असा चरकशील तर मीना तुझ्या डोक्यावर बसेल!"

वात्सल्य बोबड्या शब्दांत म्हणालें,

" या पोरीला तूं प्राणाहून प्यार समजतोस, आणि तिची जन्मगांठ घालायच्या वेळेस तिला कशापासून सुख आहे तें विचारीत नाहींस ? "

पण कीर्तीची हांव घोगऱ्या स्वरांत म्हणाली,

" मूर्ख आहेस, या चिमुरड्या पोरीची लहर कसली चालूं देतोस ? सय्यद काय वाईट आहे ? आणि तो तिला नापसंत असला तरी कुळाचा मोठेपणा तुला वाढवायचा आहे कीं नाहीं ? "

या चिथावणीचाच त्यांच्या मनावर पगडा बसल्यामुळें एक दुष्ट कल्पना त्यांना सुचली. त्यांना वाटलें अमुक विषय आपल्याला प्रिय नाहीं हें समजतांच आपले वडील तो सोडून देतात अशी जर मीनाक्षीची समजूत झाली तर तिला तें एक प्रकारचें उत्तेजनच मिळेल, व स्वतंत्रपणें वागण्याची तिची बुद्धि बळावत जाऊन पुढें ती आपल्याला फारच जाचक होईल. तेव्हां या वेळीं तिला आपण उलट असें भासविलें पाहिजे कीं या लग्नाच्या बाबतींत तिची कांहीं भिन्न आवडनिवड असेल तर ती आपण मुळींच चालूं देणार नाहीं. मीनाक्षीच्या नाखुषीचें कौतुक करण्याऐवजीं ती आतां वेळींच पार मोडून काढली पाहिजे असें उमरखानांना वाटलें, व त्या हेतूनें तिच्या विवाहाचा विषय तसाच सोडून देण्याऐवजीं तो मुद्दाम तिच्यादेखत वाढविला पाहिजे असा त्यांनीं विचार केला. ते म्हणाले,

" खरंच डॉक्टर, आणखी तीनचार दिवस तुम्ही इथं आहांत तंवर एका महत्त्वाच्या गोष्टीची सारी ठरवाठरव तुमच्या विचारानं करून टाकावी असं माझ्या मनांत आहे."

खानसाहेबांच्या बोलण्याचा झोंक अस्लमकाकांना माहीत नव्हता त्यामुळें गुडगुडीची नळी तोंडावेगळी करून सरळपणानें त्यांनीं विचारलें,

" कोणची गोष्ट म्हणतां ? "

मीनाक्षीनेंहि इसापनीति मांडीवर पालथी टेंकून बापाकडे पाहिलें. ते पुढें काय बोलणार याची तिला कल्पनाच नव्हती.

तिनें आपल्याकडे वळून पाहिलें हें पाहून खानसाहेबांना बरें वाटलें. त्यांना तें हवेंच होतें. आपल्या बोलण्याला विनोदाची छाया न येईल इतक्या बेतानें हंसत ते म्हणाले,

" आमच्या मीनाचं लग्न आतां लवकरच उरकून टाकावं मी म्हणतों. लग्न मनाशीं ठरवून ठेवल्यानंतर प्रत्यक्ष समारंभाला उगीच दिवसगत करण्यांत काय अर्थ आहे ? तेव्हां तुम्ही व मी एकदां बसून कोणते दिवस सोयीचे वगैरे ठरवूं. नाहीं का ? "

मीनाक्षीच्या चेहऱ्यावर आतां कोणता भाव प्रगट होतो तें खानसाहेबांना पहावयाचें होतें. तिच्या नापसंतीचा वेळींच बींमोड करण्याच्या हेतूनें त्यांनीं बुद्धि-बळांतल्या खेळासारखा हा एक अदमाशी डाव टाकून पाहिला होता, व आपल्या बोलण्याचा मीनाक्षीवर काय परिणाम होतो तें पाहून त्यांना आपल्या वागण्याचें धोरण ठरवायचें होतें. म्हणून ते जरी डॉ. अस्लमशीं म्हणून बोलले तरी त्यांच्याकडे पाहण्याऐवजीं त्यांची सूक्ष्म नजर मीनाक्षीच्या चेहऱ्याकडेच वळली.

पण दुर्दैवानें त्यांचा तो खोल हेतू साध्य झाला नाहीं.

कारण तितक्यांत एक मोटार अतिशय वेगानें येऊन आगाशीखालीं थांब-ल्याचा आवाज झाला, कोणी तरी दोनतीन इसम मोटारीचीं दारें धाडधाड वाजवीत उतरलीं असेंहि वाटलें, आणि दुसऱ्याच क्षणीं त्यांच्या पायांचे व्हरां-ड्यांतल्या फरशीवर आवाज होऊन ते दिवाणखान्याच्या मुख्य दरवाजांतून आंत शिरलेसुद्धां.

उमरखानांनीं तोंड वळविलें व ते इसम दिसतांच ते सय्यदच्या नोकरांपैकीं आहेत हें ओळखून विचारलें,

" क्यं ? "

त्या नोकरांनीं लवून सलाम केला व म्हटलें,

" कसुरीची माफी असावी. पण डॉक्टरसाहेबांस घेऊन आपण बंगल्यावर यायला पाहिजे अशी मालकांच्या मासाहेबांची अर्जी कानावर घालायला आलों. एक मिनिटसुद्धां उशीर झाला तर—घात होईल. असतील तसे बोलावून आण अशी मासाहेबांची ताकीद आहे."

त्या नोकरांचें तें घाबऱ्या घाबऱ्या केलेलें भाषण ऐकून व त्यांचे घाबरलेले चेहरे पाहून सर्वांनाच मोठा विस्मय वाटला.

अर्धवट उठत खानसाहेब म्हणाले,

" मासाहेबांचा निरोप आहे तेव्हां आम्ही येतोंच म्हणून तुम्ही पुढं होऊन सांगा. पण काय रे, भानगड तरी काय आहे ? "

त्या दोन इसमांपैकीं एक म्हणाला,

" मालकांच्यावर एका वाघिणीनं हल्ला केला अन् बरीच जखम झाली आहे डाव्या दंडाला—"

" जखमी झाले आहेत अमीरसाहेब ? " एकदम आश्चर्य वाटून खानसाहेबांनीं विचारलें, " काय सांगतोस काय ? अन् ते शिकारीला गेले आहेत याची आम्हांला कल्पनासुद्धां नाहीं !—"

" कुठून असणार ?—बंगल्यावरच्यासुद्धां बहुतेक माणसांना कांहीं कल्पना नाहीं. शिकारीचा बेत ठरलेला नव्हताच मुळीं. पण कोळीवाडीकडच्या जंगलांतली एक वाघीण आजुबाजूच्या खेड्यांतलीं गुरं खात आहे अशी हाकाटी आज पंधरावीस दिवस माजली होती अन् मालकांनीं तिकडल्या लोकांना सांगून ठेवलं होतं कीं तिचा माग लागला तर ताबडतोब वर्दी द्यायला या. त्याप्रमाणं आज तिकडले लोक आले. मग मालकांना का खाना सुचणार ? तसेच मोटारींत बंदुका घेऊन चढले अन् गेले. शिकारीच्या ऐन वेळीं निशाण चुकलं अन् वाघीण अंगावर आली म्हणे ! मंचल बिंचल न घालतां खडी खडी शिकार करायची मालकांची हौस आपल्याला माहीतच आहे. पण आज बुरा वख्त आला अन् कधीं नव्हे तें निशाण चुकलं. भोंवतालच्या लोकांनीं वेळींच वाघिणीला गोळी घातली म्हणून नुसत्या जखमेवर भागलं. एक परी खुदाची खैरच म्हणायची."

" हो तर काय " असें उद्गारत नोकरानें पुढें केलेल्या कोटांत खानसाहेबांनीं हात घातले.

डॉ. अस्लमनींहि पोषाख केला, आपल्या छोट्या कातडीबॅगेंत काय आहे नाहीं पाहिलें व ती बंद केली, आणि मग खानसाहेब व ते निघाले.

जातांना खानसाहेब मीनाक्षीला म्हणाले,

" तूं नीज आतां. आमची वाट पहात बसण्यांत अर्थ नाहीं. कदाचित् बराच उशीर होईल आम्हांला."

मीनाक्षीनें मान हालविली. ती त्यांच्याबरोबर दरवाजापर्यंत गेली, ते मोटारींत बसून निघेपर्यंत पायऱ्यांवर उभी राहिली व मग परतली.

तिच्या खोलीच्या दारापुढच्या व्हरांड्यांत कोणसें उभें होतें तें पाहून तिनें विचारलें,

" कोण तें ? "

" कोणी नाहीं, मी—"

तो त्यांच्या घरचा सैंपाकी होता.

सय्यदच्या घरचे दोन नोकर परत जाऊं लागले तेव्हां त्यांपैकीं एकाला त्यानें ओढून म्हटलें होतें,

" ये रे, जरा विडी तर ओढशील—"

सैंपाक्यानें हा विडीचा आहेर कशासाठीं केला होता हें त्या नोकरानें ओळखलें. सय्यदच्या घरीं जो आकस्मिक प्रसंग ओढवला होता त्याचें रसभरित वर्णन सैंपाक्याला ऐकायचें होतें, व तें ऐकून स्वतःचीहि कांहीं मल्लिनाथी करायची होती. सय्यदची हकीगत तिखटमीठ लावून कोणाला तरी सांगण्याचें सौख्य त्या नोकरालाहि वास्तविक या वेळीं हवेंच होतें. असें कांहीं घडलें कीं नोकराचाकरांच्या जिभा वक्तृत्वासाठीं भारी उत्सुक असतात, आणि गजकर्णासारखीच ही बडबडीची वितवित कुठें तरी मनःपूत पुरी करायला मिळाल्याशिवाय त्यांना चैन पडत नाहीं. त्यामुळें सैंपाक्यानें लक्षणार्थानें विडी प्यायला बोलाविलेलें पाहून त्या नोकराला बरेंच वाटलें. तथापि नाटक करून तो म्हणाला,

" छे रे भाई, विडी कसली पितोस ?—खानसाहेब येताहेत म्हणून निरोप न्यायला पाहिजे ताबडतोब ! "

" अरे यार, माहीत आहे ! हा जातोच आहे कीं गाडी घेऊन. तो सांगेल निरोप. ये रे आमच्या मालकांची गाडी आली कीं तुला परत तुमच्या बंगल्यावर पोंचवायला लावीन आमच्या ड्रायव्हरला. मग तर झालं ? ये ये. उतर, हं—"

आपलें नाखुषीचें नाटक चालू ठेवून तो नोकर आपल्या संवगड्याला म्हणाला,

" काय रे बुवा, उतरूं का ? तूं सांगत असशील तर उतरतों."

संवगड्यानें रुकार दिला, ती स्वारी उतरली, आणि मग सैंपाक्यानें त्याला व्हरांड्याच्या एका बाजूला नेलें व विड्या पेटवून झाल्यावर विचारलें,

" अमीरसाहेबांची ही काय भानगड आहे ? सांग तरी. तुझ्याशिवाय आम्हांला कसं कळायचं ? "

शेवटच्या त्या खुशामतीच्या वाक्याची पेरणी सैंपाक्यानें मुद्दामच धोरणानें केली होती, व त्याच्या हिशोबाप्रमाणें तिला अंकुर फुटून त्या नोकराच्या बडबडीचें जंगीच पीक त्याच्या पदरांत पडलें.

मीनाक्षीला व्हरांड्यांत हेच दोघे दिसले. तिला पाहतांच ते जरा मागें सरले व गप्प बसले. मीनाक्षी खोलींत गेली. हातांतलें इसापनीतीचें पुस्तक ठेवण्यासाठीं ती खिडकीजवळच्या कपाटाकडे गेली, व तेथें जराशी उभी राहिली तों बाहेर व्हरांड्यांत सैंपाक्याचें व त्या नोकराचें (त्यांच्या दृष्टीनें हलक्या आवाजांत) बोलणें पुन्हां सुरू झालें होतें त्यांतले कांहीं शब्द तिच्या कानीं आले. ते ऐकून ती चपापली व तें बोलणें ऐकत उभी राहिली. तिला त्यांचें सगळें बोलणें स्पष्ट ऐकूं येत नव्हतें. पण जें तिनें ऐकलें तें हें—

सैंपाकीः—" काय सांगतोस ? वाघीण पंचवीसतीस यार्डांच्या टप्प्यांत होती?"

नोकरः—" काय झूट सांगतों कीं काय तुला ? मालकांच्याबरोबर महमद्या गेला होता त्यानंच सांगितलं. पदरचं सांगण्यांत मला काय किफायत ? "

सैंपाकीः—" तसं नाहीं रे. पण पंचवीसतीस यार्डांच्या टप्प्यांतली वाघीण अमीरसाहेबांनीं हुकूं दिली म्हणजे भलतं नवल आहे ! "

नोकरः—" हं—"

सैंपाकीः—" अर्ध्या मैलावरचंसुद्धां निशाण अचूक मारणाऱ्या अमीरसाहेबांचं इतक्या नजीकचं निशाण चुकलं हें साऱ्या दुनियेला नवलाचंच वाटेल."

नोकरः—" दुनियेला वाटेल. आम्हांला नाहीं—"

सैंपाकीः—" म्हणजे ?—"

नोकरः—" म्हणजे अमीरसाहेबांच्या कांहीं खाजगी गोष्टी आम्हांला माहीत आहेत ना ?—आम्हांला नाहीं नवल वाटायचं—"

सैंपाकीः—" कसं म्हणतोस ? "

नोकरः—" या गोष्टी आम्ही प्राण गेला तरी कोणाजवळ सांगायचे नाहीं, अन् तूंहि कोणाशीं त्याची वाच्यता करूं नकोस हो. तुला म्हणूनच सांगतों. नाहीं तर काढशील लांब जीभ कुठं तरी—"

सैंपाकीः—" वा ! असं कुठं झालं आहे ? घे—ही घे विडी—"

नोकरः—" त्याचं असं आहे, आत्तांशा मालकांचं निशापाण्याचं प्रमाण जरा वाढत चाललं आहे. अन् निशा प्रमाणाबाहेर झाली कीं माणसाचा हात चळल्यावांचून राहील ?—आज वाघीण अंगावर धांवून आली म्हणून आजचा प्रकार लोकांच्या ध्यानांत आला. पण या महिन्यांत निशा जादा होऊन निशाण चुकण्याचा हा तिसरा प्रसंग ! "

सैंपाकीः--" काय, सांगतोस काय ? ऐकावं तें एकेक--"

नोकरः--" मेरी कसम, ही बात तूं कोणाजवळ जान गेली तरी बोलूं नकोस हो ! "

सैंपाकीः—" छे रे वेडा तर नव्हेस तूं ! पण म्हणजे तुझं म्हणणं आजहि अमीरसाहेबांनीं जरा जादा—"

नोकरः--" अरे जे लोक वाघिणीची वर्दी द्यायला आले त्यांनीं जंगलांतल्या एका झोंपडींत मालकांच्यासाठीं एक बाई आणून ठेवली होती. मालक तिथं आधीं गेले अन् शराब--"

येवढे शब्द ऐकतांच सर्वांगांतून एखादी विखारी धार कांपत गेल्यासारखें मीनाक्षीला झालें. नको पुढचे शब्द ऐकणें अशा शिसारीनें तिच्या सर्वांगावर शहारे आले. ती उभी होती तेंथून झटकन् दूर होऊन मंचकावर येऊन पडली, व शरविद्ध हरिणीप्रमाणें तिनें असहायपणें मानेला झटके दिले. विचाराच्या वेदना असह्य होऊन तिनें डोळे मिटले--

तों काय चमत्कार !

ज्या रूपसंपन्न तरुणानें तिचा खड्याचा चाप परत आणून दिला होता त्याची हास्यवदन मूर्ति तिच्या अंतश्चक्षूंपुढें स्पष्ट उभी राहिली, आणि ती पाहतांच तिचें सर्वांग एका विलक्षण सुखकारक संवेदनेनें पुलकित झालें ! जणूं प्रखर अग्निवृष्टि संपून अमृततुल्य शीतलधारांची एकदम वृष्टि झाली. जणूं रुक्ष वाळवंटांतला कष्टदायक प्रवास संपून नंदनवनाच्या सीमेवरील पुष्पवाटिकेंत तिचें पाऊल पडलें. जणूं ग्रीष्मऋतूंतल्या सूर्यसंतापानें विव्हल झालेल्या तिच्या सुकुमार देहावर कोणी हलक्या हातानें चंदनाची सुगंधी उटी घातली !

अंतश्चक्षूंपुढचें तें नयनमनोहर रूप अधिक स्पष्ट दिसावें म्हणून मीनाक्षीनें आपले डोळे अधिकच गच्च मिटून घेतले, व सुखसेवनाच्या ऐन उन्मादाच्या वेळीं माणसानें सोडावा तसा एक विचित्र निःश्वास तिच्या नाजूक, रक्तवर्ण ओंठांवाटे बाहेर पडला.

---

# प्रकरण १० वें



## शपथ घेतली—व मोडली !



डॉ. अस्लम आपल्या गांवीं परत आले व आपल्या नित्याच्या व्यवसायाला लागले. पण कामाकडे त्यांचें चित्त लागेना. मीनाक्षीबद्दलचे विचार त्यांच्या मनांत सारखे येत, व ते आले म्हणजे या बाबतींत आपण कांहीं तरी करावयास पाहिजे असें तर त्यांना वाटे पण काय करावें याविषयीं मात्र त्यांचें मन घुटमळत राही. सय्यदच्या बंगल्यावर ते व खानसाहेब एकाएकीं बोलावणें आल्यावरून गेले त्यानंतरच्या तीनचार दिवसांच्या मुक्कामांत मीनाक्षी त्यांना पूर्ण प्रसन्नवृत्तींत कधींच दिसली नव्हती. डोकें दुखत आहे किंवा कसेंसेंच होत आहे अशा कांहीं तरी सबबीवर ती मुळीं आपल्या खोलींतच पडून राही; आणि नेहमींप्रमाणें बुद्धिबळाच्या डावापाशीं येऊन बसलीच तर जेव्हां जेव्हां पहावें तेव्हां उदास वृत्तीनें कुठें तरी शून्य दृष्टी लावून बसलेली त्यांना दिसे. लग्नाचा विषय तिला अप्रिय वाटतो येवढें आतां त्यांच्या लक्षांत आलें होतें त्यामुळें तत्संबंधीं एखादी कोटि सुचली तरी ती ते मनांतल्या मनांत ठेवीत. पण इतर प्रकारचा विनोद त्यांच्या विनोदी स्वभावाला हवा तेवढा सुचण्यासारखा होता. पण त्या विनोदाचाहि मीनाक्षीवर परिणाम होत नाहीं असेंच त्यांना पुनः पुन्हां आढळून आलें.

मीनाक्षीची अप्रसन्नता एकदम इतकी कां वाढावी हें त्यांना कळेना. विवाहाच्या विषयाबद्दलचें कोणतेंहि बोलणें तिला नकोसें वाटत होतें हें घेनुकुंजच्या बंदरावर उतरण्याच्या घटकेपासूनच त्याच्या नजरेस आलें होतें. पण सय्यद जखमी होऊन आल्याची बातमी ज्या रात्रीं आली तिच्या दुसऱ्या दिवसापासून त्यांनीं सूक्ष्मपणें पाहिलें तों लग्नाबद्दल कोणीं कांहीं बोलणें काढलें कीं दिसणारा तिचा भ्रकुटिभंग त्या बोलण्यापुरताच नव्हे तर शशिलांछनासारखा कायमचाच

तिच्या मुखचंद्रावर दिसत असल्यासारखें त्यांना वाटलें. जणूं त्या कटु विषयाची चर्चा तिच्या मनांत सारखी चालू होती.

मध्यंतरीं एकदां ज्याप्रमाणें त्यांनीं उमरखानांच्याजवळ मीनाक्षीच्या लग्नाचा विषय काढून पाहिला होता तसा तो पुन्हां काढण्याचा त्यांनीं दोनतीन वेळां प्रयत्न केला. पण त्या दिवशीं उमरखानांनीं ज्या मोकळेपणानें आपले विचार व हेतू उघड करून सांगितले होते तो मोकळेपणा त्यांच्या उत्तरांत डॉ. अस्लम यांना दिसला नाहीं. मीनाक्षीच्या वृत्तींत दिसणारा फरक त्यांना मान्य होता. पण "हंः ! लग्नाचा अन् याचा काय संबंध ?—तिला जरा बरं नाहीं म्हणून झाली आहे तिची चर्या अशी !" येवढ्यावरच ते त्याबद्दलची चर्चा थांबवीत. सूज्ञ व ज्ञानी मनुष्यानें एखादें कार्य ठरविल्यानंतर कोणीं कांहीं अपशकुन त्याच्या नजरेला आणले तर तो जसे त्या विषयाला कांहीं महत्त्वच नाहीं अशा अभिप्रायाचे उद्गार काढील तसेच उद्गार उमरखानांनीं दर वेळीं काढले होते. त्यांची ती वृत्ति पाहून डॉ. अस्लमना मोठा अचंबा वाटला होता. मीनाक्षीला टांचणी टोंचली तर स्वतःला कट्यारीची जखम झाल्याप्रमाणें घाबरे होणारे उमरखान या लग्नाच्या बाबतींत तेवढे इतके कठीण कां व कसे होत आहेत हें त्यांना कळेना. केवळ कुळाची इभ्रत शतपटीनें वाढेल या एका मोहानें उमरखानांच्या वात्सल्यावर विरजण पडलें आहे काय असा प्रश्न त्यांच्या मनांत उभा राही, व त्या वेळीं उमरखानांकडे निरखून पाहिलें कीं ते त्यांना एखाद्या भव्य, उग्र कोड्यासारखेच भासत. ते मनाशीं म्हणत,

"म्हणजे आईच्या वात्सल्यासारखं बापाचं वात्सल्य बावनकशी, शुद्ध नसतं तर ! कीर्तीची हांव, मताचा अभिमान, शहाणपणाचा अहंकार असले विकार बळावून तें वात्सल्य नाहींसंहि होत असेल ! होत असेल ?—खुदा जाने !—"

'खुदा जाने' असा आपल्या आत्मगत विचारांचा समारोप डॉ. अस्लमना करावा लागे याचें कारण त्यांना स्वतःला मूलबाळ नव्हतें. त्यांची बायको दहा-बारा वर्षांपूर्वी निवर्तली होती ती मूलबाळ न होतांच. आणि त्यानंतर ते विधुरावस्थेंतच राहिले होते.

पण त्यांना स्वतःला मूलबाळ नव्हतें म्हणून त्यांनीं मीनाक्षीला स्वतःच्या लेकीप्रमाणें मानलें होतें; व तसें त्यांनीं मानलें होतें म्हणून तिचें म्लान वदन पाहून त्यांच्या मनाला सारखी व्यथा लागून राहिली व उमरखानांच्या वाग-

ण्याचा अधिकच विस्मय व थोडासा रागहि वाटूं लागला. आणि ते ज्या दिवशीं घेनुकुंजाहून निघाले त्या दिवशीं जो प्रकार घडला त्यामुळें तर त्यांची ही मनस्थिति अधिकच बळावली.

त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं ते एकटेच दिवाणखान्यांत ईझीचेअरवर पडले होते. उमरखानांचे कांहीं मचवे कोचीनकडे रवाना व्हावयाचे होते व त्यांवरील तांडेलाचें व नाखव्यांचें कांहीं भांडण उपस्थित झालें होतें तें तोडावयासाठीं म्हणून उमरखान बंदराकडे गेले होते. बंगल्यांत जिकडे तिकडे शान्त होतें. बहुतेक नोकर चाकर कामें आटोपून विसांवा घेत होते. लांब मोटारच्या तबेल्यांत त्यांपैकीं एकदोघे गप्पा मारीत बसले असावेत. त्यांपैकीं कोणी तरी मधूनच हंसत होते. जवळ व्हरांड्यांत जेबर कुत्रा मधूनच कोणावर तरी गुरगुरे. एका खिडकीच्या तावदानाचा बोलट बसवायचा राहिला होता त्यामुळें तें तावदान वारा येई जाई त्याप्रमाणें मागें पुढें हालून आवाज करी. आणि कोपऱ्यांतल्या एका शिशवीच्या तिवईवर कांहीं वर्तमानपत्रें पडलीं होतीं तीं मधून मधून फडफडत.

त्या शान्त वेळची ती विश्रान्ति डॉ. अस्लमना मोठी सुखाची वाटत होती, व ते अर्धवट डोळे मिटून मोठ्या मजेंत खुर्चीवर पडले होते. इतक्यांत त्यांच्या डाव्या हातालगतच्या खिडकीपुढून व्हरांड्यांतून मीनाक्षी जातांना त्यांना दिसली. ती आपल्या खोलींतून मधल्या दालनांत जुबेदाकडे जात असावी. ती दिसतांच डॉ. अस्लम पडल्यापडल्या म्हणाले,

" मीना, मीना !--"

मीनाक्षी खिडकीपासून तीनचार पावलें पुढें गेली होती. पण अस्लमची हांक ऐकतांच ती मागें आली व त्यांच्यासमोर येऊन म्हणाली,

" काका, तुम्हीं हांक मारलीत मला ? "

" हो. कुठं निघालीस ? तुला कांहीं काम नसलं तर ये कीं, आपण बोलत बसूं. मी एकटाच आहें."

" तुम्ही एकटेच आहांत ? " आश्चर्य दाखवून मीनाक्षीनें विचारलें, " म्हणजे ? —मला वाटलं तुमच्या दोघांचा डाव पडला असेल ?—बाप्पा कुठं आहेत !—"

असें म्हणत ती जवळच्या दारांतून आंतच आली व अस्लमकाकांच्या खुर्चीजवळ येऊन उभी राहिली. ती जवळ येतांच डॉ. अस्लम नीट सावरून बसले

व त्यांनीं पलीकडची एक खुर्ची उजव्या हातानें ओढून तिच्यासाठीं मांडली. ती बसत असतां तिच्याकडे पहात डॉ. अस्लम म्हणाले,

" खानसाहेब गेले आहेत कांहीं कामानिमित्त बंदरावर."

" अस्सं. म्हणून तुम्ही एकटे आहांत तर ! "

" हं. मग काय करणार ? पडलों आहें आपला खुर्चीवर ! खानसाहेबांच्या घरीं पाहुणचाराची रीत या मुक्कामांत माझ्या निदर्शनाला आली आहे. कांहीं महत्त्वाचं काम असलं कीं बाप खुशाल पाहुण्याला एकटा ठेवून कामं उरकायला जातो अन् लेक जी आपल्या खोलींत दार बंद करून बसते तिला पाहुण्याबद्दल कांहींच फिकीर नसते. मला वाटतं आतां पाहुण्यानं नीट उमजून आपलं येणं बंद करावं अन् आपला बोज राखून घ्यावा हेंच बरं !—"

डॉ. अस्लमनीं हा विनोद मुद्दामच केला होता व शेवटचीं वाक्यें बोलतांना ते मीनाक्षीकडे निरखून पहात होते. आपल्या विनोदानें मीनाक्षी हंसेल व मग खेळीमेळीनें व तिच्या मनाला यत्किंचित्‌हि न दुखवितां ज्या विचारांनीं तिची प्रसन्नता आज दोनतीन दिवस पार नष्ट केली होती ते आपल्याला समजून घेतां येतील अशी त्यांची कल्पना होती.

परंतु विनोदाचा फुंकर मोठा विचित्र आहे. पुष्कळदां असें होतें कीं तो फुंकर घालणारा आपल्याकडून मारे शीतोपचार म्हणून तो घालतो. पण अत्यंत जिव्हाळ्याच्या ठिकाणच्या जखमेला फुंकरदेखील बोंचून असह्य होतो त्याप्रमाणें विनोदाचा परिणाम दुःखाच्या उपशमांत होण्याऐवजीं कोंडलेला दुःखभार एकदम फुटून प्रगट होण्यांतच कधीं कधीं होतो. डॉ. अस्लमच्या थट्टेच्या भाषणाचा या वेळीं असाच परिणाम झाला.

त्यांच्या बोलण्यांतले शेवटचे शब्द जसजसे बाहेर पडले तसतसें मीनाक्षीच्या चेहऱ्यावर अधिकाधिकच गांभीर्य येत गेलें. ध्यानींमनींहि नसलेला आरोप आपल्यावर झालेला माणसानें ऐकला म्हणजे त्याच्या चर्येवर ज्याप्रमाणें विस्मय, खेद, राग, पश्चात्ताप, इत्यादि विकारांच्या छाया गर्दी करूं लागतात तशी एक विचित्र संमिश्र छटा तिच्या सुंदर मुखमंडलावर अधिकाधिक दाट होत गेली. शेवटीं ते विकार तिला आवरेनात व काकांच्या तोंडून आणखी असलेच शब्द बाहेर पडतील या भयानें ती मध्येंच म्हणाली,

" काका—काका !—"

डॉ. अस्लमनीं पाहिलें तों हुंदका आवरल्याप्रमाणें तिचे ओंठ हालत होते, व आसवांचा कड नेत्रांपर्यंत येऊन ठेपल्याप्रमाणें तिच्या पापण्या थरथरत होत्या.

तें दिसतांच त्यांना अगदीं विरमल्यासारखें झालें. आपण बोललों कोणत्या उद्देशानें आणि त्याचा परिणाम हा काय झाला असें त्यांच्या मनांत आलें. काय बोलावें तें त्यांना सुचेना.

मीनाक्षी म्हणाली,

" काका, चुकलं खरंच माझं! इकडे दिवाणखान्यांत बसायला न येतां माझ्या खोलींत पडून राहिलें त्याचा तुमच्या दृष्टीनं असा अर्थ होईल हें अगदीं कसं माझ्या ध्यानांत आलं नाहीं! तुम्हीं माझ्यावर आरोप करावा असंच वरवर पाहणाराला माझं वागणं वाटण्यासारखं आहे. पण—पण, काका, तुम्हीहि वरवर पाहणारांपैकींच का? तुमचंहि लक्ष माझ्या मनःस्थितीकडे जाऊं शकत नाहीं?—"

इतकें बोलून तिनें डॉ. अस्लमकडे पहावयाचें सोडून मान खालीं घातली, व संभाळून धरलेल्या पाण्यानें कांठोकांठ भरलेल्या पेल्याचें तोंड जरा खालीं झुकतांच त्यांतून पाणी सांडावें तसे तिच्या डोळ्यांतून अश्रू खालीं पडले ते डॉ. अस्लमना दिसले.

ते खुर्चीवर बसल्या बसल्या पुढें वांकले व म्हणाले,

" मीना, वेडे पोरी, इतकं कसलं दुःख मनांतल्या मनांत कोंडलं आहेस? छे छे! बेटा, तुझे हे डोळे आंसवांसाठीं का आहेत?—उमरखानांची लेक अशी रडायसाठीं जन्माला आली आहे?—"

" उमरखानांची लेक झालें म्हणूनच हें रडणं नशिबीं असेल कदाचित्—"

असें मीनाक्षी म्हणाली. पण तिनें मान वर केली नाहीं. फक्त डोळे पुसतांना हातांत धरलेलें पदराचें टोंक थोडें पिळवटल्यासारखें केलें.

" छे छे! असं बोलायचं काय कारण?—" डॉ. अस्लम कष्टी चेहरा करून म्हणाले, " अन् त्यांतून असं कुढत रहाणं तर अगदीं वाईट. मला सांग बरं नीट कसलं दुःख तूं येवढं मनाला लावून घेतलं आहेस?—"

" काका," असें उद्गारून मीनाक्षीनें एकदम वर पाहिलें. जणूं सहानुभूतीचें शुभदर्शन होईल अशी खात्री वाटतांच जगावरचा रुसवा सोडून तिनें वर मान केली. ती म्हणाली,

" काका, माझं दुःख समजून घ्यावंसं खरंच वाटतं तुम्हांला ?—मला वाटलं होतं बागवानाला जसं आपण फुलझाडांची निगा राखतों त्यांत कांहीं चूक आहे असं कधीं वाटतच नाहीं तद्वत् तुम्ही सारींच वडील माणसं स्वतःच्या शहाणपणांत गुंग असतां !—"

" असं कसं म्हणतेस बेटा !—सांग, सांग सारं मला मोकळं मन करून !--"

" काका " मीनाक्षी म्हणाली—

पण तितक्यांत उमरखानांची मोटार बंगल्याच्या आवारांत शिरल्याचा आवाज झाला व तो ऐकतांच तिनें झट्दिशीं मान फिरवून म्हटलें,

" बाप्पा आले वाटतं—"

उमरखान येतांच ती फार वेळ दिवाणखान्यांत राहिली नाहीं; व त्यानंतर तिची व डॉ. अस्लम यांची एकीकडे भेट झालीच नाहीं.

ते धेनुकुंजहून परत बांदेषला निघाले कीं त्यांना निरोप द्यावयासाठीं बंदरापर्यंत जाण्याचा तिचा परिपाठ होता. पण या वेळीं ते कपडे करून निघाले तरी त्यांच्याबरोबर जाण्याकरितां वस्त्रें बदलण्याची तिची कांहींच तयारी दिसेना. उमरखान बाहेर व्हरांड्याच्या खालीं उतरून नोकरांना कांहीं सांगत होते, व डॉ. अस्लम व मीनाक्षी एकटींच दिवाणखान्यांत होतीं. तेव्हां डॉक्टर तिला म्हणाले,

" हें काय ? माझी निघायची वेळ झाली. तूं कपडे केव्हां करणार ? "

" काका, मला माफ करा. आज मी तुम्हांला इथंच निरोप देतें--"

" म्हणजे तूं बंदरापर्यंत येत नाहींस ? "

" अंहं--"

" तें कां ?--"

" नको—माझ्यावर रागावूं नका. पण---"

तितक्यांत उमरखान आंत आले.

त्यांनीं मीनाक्षीला एकदां विचारलें, " तूं येत आहेस ना ? " व तिनें नाहीं म्हटल्यावर " अच्छा " म्हणण्यापलीकडे तिच्याकडे लक्षच दिलें नाहीं. डॉ. अस्लमना त्यांच्या त्या वागण्याचा मोठा विस्मय वाटला. पण त्याबद्दल बोलावें कीं न बोलावें असें वाटून ते स्तब्ध राहिले.

सय्यद अमीर आतां बरा झाला होता. त्याचा हात अजून पट्टींत अडक-

विलेला होता, पण हिंडाफिरायला त्याला त्या हाताची अडचण होत नव्हती. डॉ. अस्लमना निरोप द्यायला तो बंदरावर आला होता, व त्याला पाहतांच मीनाक्षी बंदरापर्यंत कां आली नाहीं तें डॉक्टरांच्या ध्यानांत आलें.

सय्यद बंदरावर येण्याचा संभव तिला माहीत होता व तो व आपण एकत्र येण्याचा प्रसंगच नको अशा विचारानें तिनें बंदरापर्यंत न येण्याचें ठरविलें होतें यांत शंकाच नाहीं.

धेनुकुंजहून निघावयाच्या दिवशीं जे हे प्रसंग घडले ते डॉ. अस्लमच्या मनांत सारखे घोळत होते, व त्याबद्दलच्या विचारांनीं त्यांच्या मनांत कांहीं एक विचित्र अस्वस्थता उत्पन्न झाली होती. बांदेषला परत येऊन पोंचल्यावर त्यांचें चित्त कामाकडे किंवा कशाकडेच लागेना तें या अस्वस्थतेमुळेंच.

या अस्वस्थतेंत त्यांनीं तीन दिवस घालविले व बराच विचार करून शेवटीं एक पत्र उमरखानांस लिहिलें. त्यांनीं जें पत्र लिहिलें तें कांहीं मोठें लांबलचक नव्हतें. पण वेचक शब्दांत उमरखानांचें वात्सल्य जागृत करण्याचा त्यांनीं यत्न केला होता, मीनाक्षी किती सद्गुणी व चतुर मुलगी आहे त्याची त्यांनीं उमरखानांस थोडक्यांत आठवण करून दिली होती, ती उगीचच्या उगीच रुसवा धरून बसेल काय असा प्रश्न केला होता, सय्यदशीं तिचें लग्न करण्याचें निश्चित ठरविण्यांत आपली कांहीं चूक तर होत नाहीं हें तपासून पाहण्याचा उमरखानांस मित्रत्वाच्या नात्यानें आग्रह केला होता, आणि निदान सय्यदच्या व्यसनीपणाची लोकवार्ता खरी असेल तर मीनाक्षीचा त्याच्याशीं विवाह करण्यापूर्वी त्याचीं व्यसनें अजीबात थांबलीं पाहिजेत असें वडीलकीच्या नात्यानें उमरखानांनीं त्यास निक्षून सांगितलें पाहिजे असें शेवटीं लिहिलें होतें.

योगायोग असा कीं डॉ. अस्लमचें हें पत्र ज्या वेळीं उमरखानांच्या हातीं पडलें त्या वेळीं ते सय्यदशींच बोलत आपल्या दिवाणखान्यांत बसलेले होते.

निजाम-हैदराबादकडले मोत्याच्या व्यापारांतले दोघे दलाल आज दोन दिवस धेनुकुंजला आले होते व सय्यदनें व खानसाहेबांनीं मिळून त्यांच्याशीं येत्या मोसमासंबंधीं अतिशय किफायतीचा करार आज ठरवून टाकला होता. कराराचा कागद वगैरे नुक्ताच झाला होता, ते दलाल सय्यदच्या बंगल्यावर उतरले होते त्यांची खानसाहेबांच्या मोटारींत बंगल्याकडे रवानगी करण्यांत आली होती, व जरी रात्र पडली होती तरी सय्यद खानसाहेबांशीं गप्पा

मारण्यासाठीं मुद्दाम मागें राहिला होता. दलालांशीं खलबत चालू असतांना नोकराचाकरांना आंत येण्याची सक्त मनाई होती, त्यामुळें खानसाहेबांचीं आजच्या संध्याकाळच्या डाकेनें आलेलीं पत्रें तशींच घेऊन थांबलेला नोकर आत्तां आंत गेला व त्यानें तीं खानसाहेबांपुढें ठेवलीं.

डॉ. अस्लमचें पत्र वाचल्यावर खानसाहेबांनीं तें घडी करून खिशांत घातलें, बाकीच्या पत्रांप्रमाणें टेबलावर टाकून दिलें नाहीं. तसें करण्यांत तें कोणाच्या नजरेस पडूं नये येवढाच त्यांचा हेतू होता. त्यांतील विचारसरणी त्यांना पटली असें मुळींच नव्हे. उलट ते मनाशीं म्हणाले,

"ज्यांना मुलं नसतात अशीं माणसं ज्यांना मुलं आहेत अशा माणसांना मुलांशीं कसं वागावं तें शिकवायला लागलीं कीं कांहीं तरी हास्यास्पद गोष्टी सांगायला लागतात!—मीनाक्षी सद्गुणी अन् चतुर नाहीं असं कोण म्हणतो?—पण ज्या बाबतींत तिला अक्कल असणं शक्य नाहीं त्या बाबतींत मीं तिच्या मनाचा कल पाह्यचा! वा!—हंः! माझी कांहीं चूक होत असेल!—अगदीं खुळा आहेस अस्लमकाका तूं!—तुला एक लडकी असायला हवी होती म्हणजे समजलं असतं तुला हें सारं!"

अशा प्रकारें त्या पत्राची अवगणना करीत खानसाहेबांनीं तें खिशांत घातलें खरें; पण सृष्टीचा एक मोठा नियम असा आहे कीं अत्यंत कळकळीनें सांगितलेला किंवा लिहिलेला शब्द खिशांतच नव्हे पाताळांत दडपला तरी परिणाम केल्याशिवाय रहात नाहीं. त्यामुळें पत्र खिशांत ठेवल्यानंतर खानसाहेब जरी सय्यदशीं पूर्वींप्रमाणें संभाषण करूं लागले तरी आपल्या चित्तांत चलबिचल झाली आहे ही जाणीव त्यांना स्वतःला सारखी होती. मध्येंच त्यांचे नेत्र त्यांना नकळत सय्यदकडे निरखून पाहण्यासाठीं वळत, आणि एखाद्या खोडकर मुलाला अमुक वस्तूशीं खेळूं नकोस असें बजावलें असतां त्यानें मुद्दाम डोळा चुकवून त्या वस्तूला स्पर्श करून पहावा त्याप्रमाणें त्यांचें मन हळूच विचार करी "मीनाक्षीला हा पति योग्य आहे काय?" पण या मनाला प्रयत्नानें दाबून खानसाहेबांनीं संभाषणाचा आनंद कमी होऊं दिला नाहीं. हैदराबादच्या दलालांशीं करार ठरविण्यांत सय्यदनें जो धूर्तपणा, हिशोबीपणा आणि कर्तृत्व दाखविलें होतें त्याबद्दल त्यांना आज त्याचें खरोखरच मोठें कौतुक वाटत होतें. तें कौतुक त्यांनीं पुनः पुन्हां बोलून दाखविलें, सय्यदनेंहि त्यांचे पुनः पुन्हां

आभार मानले, गुडगुडीच्या आळयापाळया मोठ्या प्रेमानें झाल्या, हास्य-विनोदहि झाला आणि शेवटीं सय्यद उठत म्हणाला,

" जाऊं द्या मला आतां. तुमच्याशीं बोलत बसायचा मोह मोठा कठीण आहे. असाच बसलों तर उद्यांपर्यंत तरी मी घरीं जाईन कीं नाहीं कुणास ठाऊक ! पण जातों. रात्रीं हैदराबादच्या पाहुण्यांना बडी मेजवानी देणार आहें मी ! नोकरांना सारी व्यवस्था ठेवायचा हुकूम दिलाच आहे. पण आपणहि वेळेवरच बंगल्यावर परतावं हें बरं. नाहीं का ?—"

त्या क्षणीं खानसाहेबांच्या काय मनांत आलें कोण जाणे, पण ते एकदम गंभीर होऊन म्हणाले,

" पण अमीरसाहेब, जरा बसा. मला तुमच्याशीं महत्त्वाचं कांहीं बोलायचं आहे. बसतां ? "

खानसाहेबांच्या मुद्रेवर झटकन् चढलेली गांभीर्याची छटा सय्यदच्या ध्यानांत आली नाहीं. तो आनंदी वृत्तीनें म्हणाला,

" हां हां, जरूर. कहीये ! "

आणि बसला.

" अमीरसाहेब," खानसाहेब म्हणाले, " तुम्ही माझे जांवई होणार आहांत तेव्हां एखाददुसरी गोष्ट तुम्हांला सांगायचा मला अधिकार आहे. नाहीं ? "

" नाहीं कसा खानसाहेब ! आहे, खचित आहे." असें सय्यदनें उत्तर दिलें खरें, पण ते काय बोलणार आहेत तें त्याच्या लक्षांत न आल्यामुळें त्याची मुद्रा किंचित् त्रस्त झालेली दिसली. इतकेंच नव्हे तर खानसाहेब जें काय बोलणार तें बहुतकरून अप्रियच असणार अशीहि शंका त्याच्या मनांत आल्यावांचून राहिली नाहीं. त्यांच्या चेहऱ्याकडे त्यानें सरळ नजर लावून क्षणमात्र पाहिलें तों त्यांची आखूड कोचदार दाढी त्यांच्या तोंडून निघूं पाहणाऱ्या तीक्ष्ण शब्दांच्या चिन्हासारखीच त्याला वाटली.

खानसाहेब पुढें म्हणाले,

" एखादी गोष्ट केवळ मी सांगतों म्हणून तुम्ही मान्य कराल अमीरसाहेब ?"

" कां नाहीं करणार ?—सांगा."

" सांगूं ? "

" बेशक—"

" आजपासून तुम्ही दारूला शिवणार नाहीं अशी माझ्याजवळ कसम खा."

तें ऐकून सय्यद क्षणमात्र चमकला. सर्वस्वीं त्याच्या कल्पनेबाहेरची गोष्ट खानसाहेबांच्या तोंडून बाहेर पडली होती.

पण तो कितीहि चपापला तरी नाहीं असें उत्तर देणें त्या वेळीं शक्य नव्हतें. तो प्रसंगच असा विचित्र होता.

तो म्हणाला,

" होय, कसम खातों."

मग सय्यद जरा वेळानें तेथून निघाला. मोटारींत बसून बंगल्याकडे जात असतां त्याची मनःस्थिति विलक्षण झाली होती. आपल्या दारूबाजीची हकीगत खानसाहेबांपासून सर्वस्वीं गुप्त राहील अशी वेडी अपेक्षा त्यानें कधीं केलीच नव्हती. पण आपलें व्यसन फार वाढलें आहे हें त्यांना कळणार नाहीं अशी मात्र त्याची कल्पना होती. त्यामुळें खानसाहेबांनीं तो विषय काढतांच त्याला विलक्षण विस्मय वाटला होता. शिवाय, मीनाक्षी-बरोबर लग्न व्हायचें म्हणून दारू सोडली पाहिजे असा जो एक ध्वनि खानसाहे-बांच्या बोलण्यांत होता त्याचें तर त्याला फारच आश्चर्य वाटलें. कारण त्याच्या स्वतःच्या विचारसरणीप्रमाणें व्यसनाचा आणि बायकोचा काय संबंध? बायका म्हणजे ज्यांच्यासाठीं व्यसनें सोडावींत अशा कोणी कुठल्या आल्या आहेत? स्त्री म्हणजे काय? दारूप्रमाणेंच व्यसनाचा एक विषय! हंः! खानसाहेब कांहीं तरी लहर घेऊन बसले आहेत झालें !—

इतक्यांत त्याची गाडी बाजारच्या रस्त्याला लागली व चौकांतलें वळण घेण्याकडे लक्ष गेल्यामुळें विचारांची सांखळी मध्येंच तुटली.

साधा रस्ता लागतांच मात्र त्याचें हांकण्याकडलें लक्ष कमी झालें व त्याच्या मनांतले विचार पुन्हां सुरू झाले. तो मनाशीं म्हणाला,

" मीनाक्षी मला आत्तांशीं कां टाळते त्याचा उलगडा झाला मात्र आतां. माझा व्यसनीपणा तिला नापसंत आहे तर! हंः! जें फूल चाहेल तें खुडावं अन् हुंगावं असा मी आजवर वागत आलों!—पण—मीनाक्षी! इतकी बिकट ही छोकरी असेल अशी कल्पना नव्हती!—पाहूं! बिकट स्त्री हातीं गवसली कीं विशेष सुख असतं!—कधीं कुणासाठीं कसम खाल्ली नाहीं ती या मीनाक्षीसाठीं—जाना दो!—"

बंगल्यांत गाडी शिरेपर्यंत त्याची ही विचारमालिका चालू होती.

गाडी आगाशीखालीं थांबतांच तीनचार नोकर धांवत आले. सर्वांचे कुर्निसात घेऊन तो उतरला. त्याच्या हुकमाप्रमाणें व्हरांड्यांत खूप रोषनाई करण्यांत आली होती, व तेथें विलायती पद्धतीनें खुर्च्या टेबलें मांडलीं होतीं. त्याचे पाहुणे तेथल्याच दोन आरामखुर्च्यांवर पडले होते ते त्याला पाहतांच सरसावून बसले व हंसले. त्यांच्याकडे पाहून हंसत तो तेथून पुढें आपल्या खोलीकडे निघाला. वाटेंत डाव्या अंगाला एक छोटासा दिवाणखाना होता तेथेंहि रोषनाई झाली होती व मेजवानीचा सारा सरंजाम तयार होता. तो आपल्या अंतर्गृहांत पोंचतांच नोकरांनीं पुढें होऊन त्याचे कपडे उतरले, व तो पलंगाच्या कांठावर बसतांच एका नोकरानें त्याचे घरांतल्या घरांत वापरण्याचे स्लिपर साफ करून पुढें धरले.

या सर्व प्रकारांनीं स्वतःच्या वैभवाचा व अधिकाराचा प्रत्यय आल्यासारखें होऊन सय्यदचे मघाचे विचार पुन्हां सुरू झाले. त्याला वाटलें, वास्तविक माझ्याइतक्या धनाढ्य आणि सत्ताधारी माणसाच्या पायावर वाटेल त्या स्त्रीला लोटांगणं घालीत आणण्याची लहर मला आली तर ती मी पुरवून घेतल्याशिवाय राहणार नाहीं. मीनाक्षीसाठीं मीं दारू सोडावी हें खानसाहेबांचं कोठलं बेहिशोबी मागणं ?—ही कसम मीं उगीच खाल्ली. हिचा जाचच होणार आहे मला !—पर कुच फिक्र नहीं !—मीनाक्षीसारख्या अजब पोरीसाठीं !—बस् बस् !

इतक्यांत त्याच्या खास तैनातींतला नोकर महंमद खोलींत आला व त्यानें खुणवितांच बाकीचे नोकर बाहेर गेले.

सय्यदनें विचारलें,

"काय रे ? सगळी तयारी ?"

"हां हूजूर" इतकें म्हणून मग हलका आवाज करून त्यानें म्हटलें, "आपण पाहुण्यांच्याबरोबर घ्यायच्या आधीं इथं खाजगींत थोडी घेणार ना ?—आणूं ना ?"

सबंध जन्मांत आत्मसंयमनाचा प्रसंग सय्यदवर कधीं आला नव्हता, त्यामुळें त्या क्षणीं त्याला भांबावल्यासारखें झालें. मोहाचा पाश मनाभोंवतीं बसत असतांना तो ताड्दिशीं तोडणें साधें काम नव्हे. सतत तपश्चर्या असेल तरच

तो सहज तोडतां येतो. भोगविषय जेव्हां वारयोषितांप्रमाणें खुणा करून भुरळ घालतात तेव्हां त्यांच्यामागें धांव घेणाऱ्या इंद्रियांना खेचून धरावयास अभ्यासाखेरीज दुसरें कसलेंच बळ पुरें पडत नाहीं. विषयाची आसक्ती सदा पुरवीतच गेल्या कारणानें तिची खरी खेंच सय्यदला आजपर्यंत कधीं कळलीच नव्हती. त्यामुळें महंमदचा प्रश्न ऐकतांच तो क्षणभर बावरून गेला. ज्यानें कधीं जन्मांत सारथ्य केलें नाहीं त्याच्या हातीं एकदम पांच बेफाम घोड्यांचे लगाम दिले असतां त्याची जी अवस्था होईल ती सय्यदची झाली.

खालीं मान करून त्यानें क्षणभर विचार केल्यासारखें केलें व मग एकदम वर बघून मान जोरानें हालवून तो म्हणाला,

" नको—महंमद, मला आज मुळीं घ्यायचीच नाहीं !—घ्यायचीच नाहीं ! "

महंमद अत्यंत चकित झाला. पण मालकाशीं आणखी कांहीं बोलायला म्हणून त्यानें जों तोंड उघडलें तों सय्यद तेथून निघूनहि गेला !

सय्यद गेला तो त्याचे पाहुणे व्हरांड्यांत होते त्यांजकडे गेला. एक खुर्ची ओढून घेऊन तो त्यांच्यासमोर बसला व त्यानें सिगारेट पेटवली.

इतक्यांत त्याचा एक नोकर जवळ आला व त्यानें त्याच्या कानांत कांहीं सांगितलें.

त्याबरोबर अत्यंत विस्मयचकित आणि क्रुद्ध झाल्याप्रमाणें सय्यदनें चर्या केली. पाहुण्यांची परवानगी मागत तो उठला व नोकराबरोबर आगाशीखालच्या दरवाजापर्यंत गेला.

तेथें एक उंच, धिप्पाड मनुष्य उभा होता.

मदीना हॉटेलला आग लागली असतां मॅनेजरशीं भांडतांना ज्या इसमाला सुधीरनें पाहिलें होतें तोच हा नव्हे काय ?—हो, तोच. त्या वेळेस त्याचा सारा पोषाख एखाद्या संपन्न माणसाला शोभेल असा होता. आज त्याचीं वस्त्रें मलीन होतीं. पण तोच हा गृहस्थ यांत शंकाच नाहीं !

सय्यद दिसतांच या इसमानें सलाम केला.

सय्यदनें त्याला आपल्या मागोमाग येण्याची खूण केली, व त्याला घेऊन तो एका खोलींत गेला.

तेथें पोंचतांच सय्यदनें दार लावून घेतलें व क्रुद्ध स्वरानें विचारलें,

" बेवकूफ, तूं इथं कशाला आलास ?—"

" साहेब,--"

" चूप, हैवान, तुला कामाला पाठवलं तेव्हांच तुला निक्षून सांगितलं होतं ना कीं उभा जन्म तुला जंगलांतल्या खोपट्यांत तोंड लपवून बसावं लागेल म्हणून ! मग कां आलास ? तुला आपली मोत आठवली होय ?--अन् मलाहि खड्ड्यांत घालायचा विचार आहे कीं काय तुझा ?--"

" साहेब, मला दोनशें रुपये द्या म्हणजे मी रातोरात जातों--,"

" अस्सं ? एकूण तूं माझ्याकडून असे पैसे उकळणार म्हणायचा--"

" छे छे साहेब, फक्त या वेळेस--"

" याद राख, पुन्हां आलास तर तुझा मुडदाहि कोणाच्या हातीं लागणार नाहीं असा साफ नाहींसा करीन तुला !—ठेर इदर ! पैसे आणून देतों. ते मिळाल्याबरोबर काळं कर."

असें म्हणून संतापानें लांब लांब टांगा टाकीत सय्यद तेथून गेला. तो इसम दिसल्यापासून सय्यद एकदम चिडल्यासारखा झाला होता, व पैसे घेऊन तो इसम बंगल्यांतून गेला तरी त्याच्या संतापाचा पारा उतरला नाहीं.

तो परत व्हरांड्यांत आपल्या पाहुण्यांजवळ गेला तरी तो संतापांतच होता. त्यानें खर्र्दिशीं खुर्ची ओढली, व बसतांना त्याच्या पायाला एक खुर्ची थोडीशी लागली त्याबरोबर त्यानें ती लाथेनें थाड्दिशीं लोटून दिली. मधोमध ठेवलेल्या टेबलावर आतां मदिरापानाचें सारें साहित्य आलेलें होतें. त्याकडे दृष्टि जातांच दारूची बाटली खोलण्याची नोकराला खूण करण्याऐवजीं सय्यदनें स्वतःच तावातावानें ती खोलली, ग्लासांत ती ओतून तेवढ्यांत एका नोकरानें जलदी करून सोडा फोडला होता तो घेण्यासाठीं ग्लास पुढें केला, व एका घोंटांत पेला रिकामा करून टाकला.

मग डाव्या हाताच्या बोटानें ओंठाखालचा भाग पुशीत तो स्वतःशीं पुटपुटला,

" मी कधीं कोणासाठीं कसम पाळणारा नाहीं ! "

---

# प्रकरण ११ वें

## बापलेक आणि मायलेक



पुष्कळदां असें होतें कीं माणूस प्रवासाहून येतो तो अतिशय प्रसन्न वृत्तींत येतो, प्रवासांत ज्या ज्या विविध दृश्यांची, माणसांची किंवा प्रसंगांची मनाला मौज वाटली त्याबद्दल घरीं कोणाशीं तरी खूप खूप बोलावें असें त्याला फार वाटत असतें, आणि आपण जो आनंद अनुभवला त्याबद्दल बोलून आपला आनंद पुन्हां घडिभर निर्माण करावा व इतरांसहि तो अंशतः देण्याचें सुख आपण घ्यावें अशी त्याला तीव्र इच्छा असते, पण तो घरीं येतो तों त्या इच्छेच्या पूर्ततेला सर्वस्वीं प्रतिकूल वातावरण तेथें असलेलें त्याला आढळतें.

सुधीरचें असेंच झालें.

तो मुंबईस घरीं येऊन पोंचला तेव्हांपासूनच घरांतील वातावरण कांहीं ठीक नाहीं असें त्याला वाटूं लागलें. दादांना त्यानें वांकून नमस्कार केला तेव्हां "काय? आलास? प्रवास ठीक झाला?—" असें कांहीं तरी कुशल ते हंसतमुखानें विचारतील असें त्याला वाटत होतें. पण आपलें लिहिणें उगीच निमिषार्ध थांबवून त्याच्याकडे एक कटाक्ष टाकण्यापलीकडे दादांनीं कांहींच केलें नाहीं. मग ते लगेच तोंड फिरवून पुन्हां लिहावयास लागले. सुधीरला त्याचा चमत्कार वाटला व किंचित् खेदहि झाल्यावांचून राहिला नाहीं. केशवकाकांच्याबरोबर आपण प्रवासाला गेलों व त्यांच्या सहवासांत सातआठ दिवस घालविले हें दादांना पसंत नसणार अशी सुधीरला थोडीशी कल्पना होती. आपल्या जाण्याला संमति देतांना दादांनीं किती नाखुषीच्या मुद्रेनें दिली होती तें तो विसरला नव्हता. तथापि, नाखुषीनें का होईना त्यांनीं परवानगी जर दिली होती तर अजूनहि ती नाखुषी त्यांनीं मनांत ठेवावी, इतकेंच नव्हे तर ती अधिकच उग्र स्वरूपांत या वेळीं दाखवावी हें त्याला चमत्कारिक वाटलें.

एखाद्या बाटून आलेल्या वेड्या माणसाकडे पहावें तसेंच त्यांनीं आपल्याकडे पाहिलें अशी कल्पना त्याच्या मनांत येऊन गेली.

घरांत जाऊन आई दृष्टीस पडतांच मात्र हें विस्मयाचें व विषादाचें पटल कांहींसें नष्ट होऊन त्याचें मन जरा प्रसन्न झालें.

" आलास ?—आठ दिवसच नव्हतास पण आठ वर्षं ढकलावीं लागल्या-सारखं वाटलं !—"

हे आईचे उद्गार ऐकतांच त्याला अतिशयच हर्ष झाला व कपडे उतरून चूळ भरून, जेव्हां आईनें तेवढ्यांत तयार केलेला चहा प्यावयास तो पाटावर बसला तेव्हां तर दादांच्या त्या विचित्र कटाक्षाची आठवण त्याच्या मनांत उरलीहि नाहीं.

परंतु ही त्याची हर्षवृत्ति अल्पकालिकच ठरली.

कारण चहाचा कप रिकामा करून खालीं टेकीत जेव्हां तो म्हणाला,

" बरं आई, आतां मी जरा चौपाटीवर जाऊन येऊं ?—आठाच्या आंत परत येईन. दादाची जेवायची वेळ चुकूं द्यायचा नाहीं कांहीं ! अं ?—"

तेव्हां त्याची आई म्हणाली,

" हं. ये कीं जाऊन. "

" आठालाच बसतात ना दादा ?—"

" तुला हवं तेव्हां ये. तूं एकटाच जेवायचा आहेस. "

" म्हणजे ? " जरा आश्चर्यानें सुधीरनें विचारलें, " दादांना आज जेवा-यचं नाहीं ?—"

" अंहं—"

" कां ? दुपारीं कुठं जेवायला गेले होते ?—"

" छे !—पण तें मग सांगेन तुला—"

लक्ष्मीवहिनींच्या त्या तुटक बोलण्याच्या वेळीं त्यांचा स्वर जरासा खिन्नच झाल्यासारखें सुधीरला वाटलें व त्यामुळें अधिकच आश्चर्य वाटून तो म्हणाला,

" म्हणजे ?—काय सांगणार आहेस ?—आतांच सांगेनास ?—"

लक्ष्मीवहिनी किंचित् थांबल्या, व मग म्हणाल्या,

" आज चार दिवस झाले, रागानं रात्रीचं जेवणच सोडून दिलं आहे. अन् —जेवत नाहींत म्हणून मीहि रात्रीं जेवत नाहीं—"

" खरंच ? " सुधीर आश्चर्यानें उद्गारला, व कांहीं वेळ तो अगदीं स्तब्ध बसून राहिला.

त्याच्या चित्ताची मोठी चलबिचल झाली. दादांचा रागीटपणा त्याला नव्यानें कळला असें नाहीं. लहानपणापासून दादांच्या रागीट वागणुकीच्या किती तरी आठवणी त्याच्या अवलोकनशील मनांत सांठलेल्या होत्या. किंबहुना त्याला समजूं लागल्यानंतर दादांच्या चारित्र्याविषयीं व शीलाविषयीं जसा त्याच्या मनांतील आदर अनेक प्रसंगांनीं वाढत गेला होता, तसाच त्यांच्या जुन्या संस्कृतीच्या अभिमानांतील हटवादीपणा आणि त्यांच्या स्वभावांतील रागीट-पणा—कधीं कधीं त्या रागीटपणाला निर्दयपणा म्हणावेंसें सुधीरला वाटे—व्यक्त झाला कीं आपल्या मनांतील आदरबुद्धि दुखावली न जातां शाबूत रहावी यासाठीं सुधीरला अनेक प्रसंगीं मोठा प्रयत्न करावा लागला होता.

यांपैकीं बऱ्याचशा प्रसंगांची त्याला या क्षणीं आठवण झाली व त्यामुळें किंचित् विचारमग्न होऊन जरा वेळ तो कांहींच बोलला नाहीं.

नंतर तो म्हणाला,

" पण—काय कारण झालं—नवं—? "

" कसलं कारण ?—आपली चूक म्हणावं अन् स्वस्थ बसावं—"

" तें तर झालंच. पण—सांग ना."

" नको—तुला आणखी वाईट वाटेल."

" कांहींतरी काय बोलतेस बरं आई ? "

" तसं नाहीं—पण अगदीं तुझाच संबंध आहे, म्हणून—"

" होय ? मग सांगच. "

" काय सांगायचं ?—नवं का कांहीं आहे ?—तूं गेलास त्यानंतर दोन दिवसांनीं—मला वाटतं गुरुवार होता त्या दिवशीं—हो, मला उपास होता—गुरुवारींच." असा प्रारंभ करून लक्ष्मीवहिनींनीं त्याला सारी हकीगत सांगितली.

ती अशी.

त्या गुरुवारच्या दिवशीं रात्रीं जेवतांना दादांनीं म्हटलें होतें,

" आज सुधीर इथं असता म्हणजे बरं झालं असतं."

" कां ? " वाढतां वाढतां लक्ष्मीवहिनी म्हणाल्या.

" आज आमची चर्चेची मंडळी उठत होती इतक्यांत जळगांवचे ते मोडक आले होते. आज वर्षभर ते आपल्या मुलीसाठीं सुधीरबद्दल विचारताहेत माहीत आहे ना ? तेच मोडक."

" ते कां आले होते ?—तरी वाटलंच मला तसं."

मग जरा वेळ दादांनीं जेवणाकडेच लक्ष दिलें व नंतर म्हटलें,

" म्हणून म्हटलं सुधीर आज इथं असता म्हणजे बरं झालं असतं. मोडकांना सांगितलं असतं हा आमचा मुलगा. याला काय तें विचारा. तो जाणे अन् तुम्ही जाणे.—हो तर काय ?—"

लक्ष्मीवहिनींना दादांच्या बोलण्याची ती तऱ्हा अगदीं गैर वाटली. ज्या संस्कृतीचा पडदा त्यांच्या मनावर वर्षानुवर्षें वाढला होता तो दूर करून त्यांचें मन बोललें असतें तर " असा त्रागा करणं शोभत नाहीं " असेंच त्यांनीं म्हटलें असतें. पण भावना दाबण्याचीच शिस्त त्यांना जन्मभर लागली होती, त्यामुळें आपला निषेध अगदीं सौम्य करून त्या म्हणाल्या,

" असं कसं ?—"

पण तेवढाहि निषेध दादांच्या प्रगट होऊं पाहणाऱ्या रागाला अवकाश द्यावयास पुरेसा ठरला. ते म्हणाले,

" असंच. एक तर सुधीरला लग्नाच्या आमच्या जुन्या रीती पसंत नाहींत, तेव्हां त्याची काय जी नवी रीत असेल त्या रीतीनंच होईना का त्याचं लग्न, असा विचार मला करायला पाहिजे.—केशवकाकाचं अन् त्याचं सख्य आहे, होऊं दे त्या बाटग्याच्या गुरूपदेशाप्रमाणंच काय व्हायचं तें !—"

लक्ष्मीवहिनींना या बोलण्यांतील प्रत्येक शब्द वेडेपणाचा वाटला. कारण दादांनीं असें बोलावें अशा प्रकारचें सुधीरनें त्यांजजवळ कधींहि भाषण केलें नव्हतें. किंबहुना लग्नाच्या बाबतींत सरळ सरळ असें पितापुत्रांचें बोलणें झालें नव्हतें, व कधीं होणारहि नाहीं हें वहिनी जाणून होत्या. सुधीरचें थोडें फार सुधारकी वागणें व त्याचें केशवभावजींकडे जाणें येणें येवढ्या आधारावर दादा त्याच्याविषयीं हवे ते कुतर्क बांधीत असत, व आपल्याजवळच नव्हे तर परक्याजवळहि बोलून दाखवीत असत हें लक्ष्मीवहिनींना माहीत होतें. असे तर्क बांधतांना सुधीरची आपल्यावर केवढी अढळ भक्ति व निष्ठा आहे याचा विचार हे अगदींच कसा करीत नाहींत याबद्दल त्या आपल्या मनाशीं नेहमीं

आश्चर्य करीत. पण हें आश्चर्य करण्यापलीकडे आणि पितापुत्रांच्यामध्यें मोकळेपणाच्या अभावाचा आणि तदुद्भव गैरसमजाचा पडदा सदाच रहावा याविषयीं खेद मानण्यापलीकडे त्यांच्या हातीं काय होतें ?

किंबहुना त्यांचें व दादांचें नातें तरी मनमोकळेपणाचें कोठें होतें ?—तेथेंहि असलाच एक पडदा होताच कीं नाहीं ?——

असा कांहींसा विचार वहिनींच्या मनांत नेहमीं येई त्याप्रमाणें तो या वेळींहि आला. त्यामुळें त्या कांहींच बोलल्या नाहींत. भाकरीचे चतकोर करून त्यांनीं ते दादांच्या पानांत वाढले, व दुसरी भाकरी तव्यावर होती ती उलटायसाठीं त्या चुलीजवळ जाऊन बसल्या.

दादाच पुढें म्हणाले,

" अन् शिवाय, माझा अपयशी हात सुधीरच्या लग्नाच्या बाबतींत तरी नको पडायला हेंहि खरंच. माझ्या धोरणानं मीं माईचं लग्न केलं म्हणून तिच्या जन्माचं मातेरं झालं असं सुधीरला वाटतंच कीं नाहीं—सुधीरलाच कशाला, तुलासुद्धां वाटतं——तेव्हां——"

हें बोलणें मात्र वहिनींच्यानें शान्तपणें ऐकून घेववलें नाहीं. त्या झटकन् म्हणाल्या,

" पण उगीच कांहीं तरीच तर्क चालवून बोलायचं याला काय म्हणायचं ? "

पण वहिनींच्या या चार शब्दांचा भलताच परिणाम झाला. दादा एकदम म्हणाले,

" हो—मला मुळीं वेडच लागलं आहे—त्यामुळं करतों आहें तर्कट. पण माझा आपला तर्कटी निश्चय आहे, अन् तो मी तुला एकदां सांगणारच होतों. सुधीरचं लग्न व्हावं असं तुला वाटत असेल तर तुलाच पुढाकार घेऊन तें करायला पाहिजे. मी त्याच्या लग्नांत यत्किंचित्हि लक्ष घालणार नाहीं. गतवर्षी या दिवसांत तूं विचारलं होतंस तेव्हां तो म्हणाला होता ना कीं मला लग्नाची इच्छा नाहीं म्हणून. तशीच इच्छा कदाचित् अजूनहि कायम असेल. राह्यचं असेल त्याला काकासारखं स्वच्छंदी !—"

वहिनी हळूच म्हणाल्या,

" पण यंदा विचारलं आहे का त्याला ? "

" विचारणार नाहीं म्हणून सांगतों आहें अन् पुन्हां तेंच विचारतेस याला काय म्हणायचं ! " एकदम तारस्वरानें दादा म्हणाले, " मी त्याला कांऽऽहीं विचारणार नाहीं. मीं विचारण्यानं त्याला सुख व्हायचं नाहीं. तूं विचार, तूं मुलगी पहा, तूं ठरव—"

" अशी रीत आहे का आपल्या घरांत आजपर्यंतची ? " वहिनी अगदीं भीत भीत व नम्र स्वरानें म्हणाल्या.

पण त्यांच्या मृदू स्वरानें दादांच्या बोलण्याला मार्दव येण्याऐवजीं ते उलट अधिक उसळून म्हणाले,

" रीत ? रीत कशाला विचारतेस ? जुन्या वळणाच्या कितीशा रीती आपल्या घरांत कायम राहिल्या आहेत ? जोगांच्या घरांत चिताऱ्याचा छाकटा धंदा कोणीं केला नव्हता तो केशवानं केला ! साहेबी पोषाखाबद्दल जोगांच्या घराण्याला तिटकारा होता पण सुधीर तो पोषाख प्रत्यहीं करतोच ना ! दाढी, हजामत हीं अमंगळ कामं केव्हां करावीं याला तर प्रतिबंधच नसलेला आम्हांला डोळ्यांनीं पहावा लागत आहे ! अन् सुधीरची पंचविशी उलटली तरी तुला सून आली नाहीं हीहि कांहीं आपल्या घरांतली जुनी रीत नव्हे !—नकोच ! हे विचारच नकोत !—मीं निश्चय केला आहे तोच बरोबर आहे—"

हें सारें ऐकून वहिनींना चीडहि फार आली व आश्चर्यहि फार वाटलें. नुसते जळगांवचे मोडक आले एवढें सांगण्यावरून दादांच्या बोलण्याला इतके फाटे फुटावे हें त्यांना अकल्पित वाटलें. असें निष्कारण रागानें भडाभडा हे कां बोलत आहेत त्यांना समजेना. कां यांच्यासारख्या करारी आणि तापट माणसानें भोंवतालच्या माणसांच्या वागणुकीविषयीं वाटणारा असंतोष मनांतल्या मनांत ठेवला म्हणजे मग तो असाच क्षुल्लक कारणानें बाहेर पडून अनावर होतो, असें वहिनी आपल्या मनाशींच आश्चर्य करीत राहिल्या.

पण त्या क्षणीं आश्चर्यापेक्षां चिडीचाच परिणाम वहिनींच्या मनावर अधिक झाला होता. त्यामुळें दादा शेवटचा उद्गार काढून जेव्हां किंचित् थांबले तेव्हां त्या लगेच म्हणाल्या,

" हें सारं कसं होतं आहे सांगूं का ?—लेकीचा राग सुनेवर काढण्यापैकीं होतं आहे !—भावजींच्यावरचा राग घरांत लेकावर का काढायचा ?—"

" अस्सं !—एकूण तुलाहि माझं सारं वागणं मूर्खपणाचंच वाटत !—मीच एकटा चुकतों आहें !—तुला तरी कुठं आमची जुनी राहणी पसंत आहे ?—"

हें ऐकून वहिनींचा सात्विक संताप अनावर झाला. त्या अर्धवट मोठ्यानें पुटपुटल्या,

" अशा बोलण्यापुढं काय कपाळ फोडायचं !"

आणि त्यांनीं हातांतील भांडें खालीं ठेवतांना जरा जोरानें हापटलें.

त्याबरोबर दादांनीं मान वळविली, वहिनींकडे एक क्रुद्ध कटाक्ष टाकला व ते म्हणाले,

" कशाला ?—मी मुळीं पानावरून उठतोंच !"

इतकें म्हणून त्यांनीं खरोखरच अपूष्णी घेतली, व ते पानावरून उठले.

त्या क्षणीं वहिनींच्या हृदयाची स्थिति कशी वर्णावी ? दादांचें सगळें बोलणें व वागणें अगदीं निषेधार्ह वाटत होतें. पण संस्कृतीनें उत्पन्न केलेल्या खोट्या मर्यादेचा बोळाच जणू त्यांच्या तोंडांत कोणीं कोंबला होता, व त्यांना एक शब्दहि तोंडावाटे काढणें शक्य नव्हतें. अनेक संमिश्र भावनांचा दाह त्यांच्या अंतःकरणांतल्या अंतःकरणांत कोंडलेला राहिला, व नंतर किती वेळ तरी चुली-पुढेंच बसून अश्रू ढाळण्यापलीकडे त्या दाहाला वहिनींना वाट देतां आली नाहीं.

त्यानंतर रोजच त्या प्रसंगाची आठवण झाली कीं वहिनींच्या डोळ्यांतून अश्रुधारा वहात असत, व आत्तां सुधीरजवळ ती हकीगत सांगतांना त्यांना अधिक उमाळा येऊन त्या अश्रुधारा अधिकच वहाव्या हें साहजिकच होतें.

सुधीर तें सारें ऐकून फारच खिन्न झाला. त्याला रात्रभर झोंप लागली नाहीं; व दुसऱ्या दिवशीं आईशीं बोलत असतांना तो एकदम म्हणाला,

" आई, तुला एक काम सांगायचं ठरवलं आहे मीं. नाहीं म्हणतां कामा नये अं—"

" तें काय ?"

" करशील ना लगेच ?"

" इश्श्, असं आहे तरी काय ?"

" एखादी तुझ्या पसंतीची मुलगी तुझ्या आढळण्यांत असली तर मला लग्न करायचं आहे—"

सुधीर असें कांहीं बोलेल ही वहिनींची कल्पना नसल्याकारणानें त्या चपापल्या, व आश्चर्य व्यक्त करणाऱ्या दृष्टीनें त्यांनीं सुधीरकडे रेखून पाहिलें.

सुधीर त्यांचें तें पाहणें पाहून म्हणाला,

" कां ? खोटं नाहीं ! खरंच—घरांत हा असा असंतोष असणं बरं नाहीं—"

" मी असंतुष्ट आहें असं तुला वाटतं ?—सून घरांत कशीबशी आलीच पाहिजे अशी मी अधीर झालें आहें असं तुला वाटतं ? "

" नाहीं, तसं नाहीं—पण दादा—"

" त्यांचा असंतोष दूर करायसाठीं तूं वाटेल तें दिव्य करशील हें मला माहीत आहे. दुर्भाग्य असं कीं हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं."

" माझं लग्न मीं होऊं दिलं कीं येईल त्यांच्या लक्षांत, नाहीं का ? "

वहिनींनीं कांहीं न बोलतां जरा वेळ त्याच्याकडे मोठ्या वात्सल्यपूर्ण दृष्टीनें पाहिलें, व मग हलकेच म्हटलें,

" तुझा हेतू दिव्य आहे, पण आशा वेडी आहे. केवळ तुझं लग्न होऊन सून घरांत आली म्हणजे त्यांचा असंतोष दूर होईल ही तुझी समजूत चुकीची आहे. त्यांच्या असंतोषाचीं कारणं फार खोल आहेत. त्यांना जुनं हवं अन् तुला नवं हवं यांत साऱ्याचं मूळ आहे."

वहिनींच्या या बोलण्यांतील एकेक शब्द सुधीरला इतका वेचक व मार्मिक वाटत गेला कीं तो त्यांच्याकडे विस्मयानें पहातच राहिला. सूक्ष्म अवलोकन करून आणि खोल विचार करून भोंवतालच्या परिस्थितीची संगति मनाशीं दृढपणें लावून ठेवल्याप्रमाणें वहिनींच्या तोंडून एकेक वाक्य बाहेर पडत होतें, व तें एकेक वाक्य ऐकतां ऐकतां सुधीरचा विस्मय वाढत होता.

जी आपली आई दादांच्या आज्ञेप्रमाणें वागण्यापलीकडे दुसऱ्या कसल्या गोष्टीचा चिकित्सक विचार करीत असेल अशी त्याची कल्पनाहि नव्हती तिनें दादांच्या व आपल्या स्वभावांतील मूलभूत विरोधाचा इतका मार्मिक उल्लेख केलेला ऐकून सुधीरच्या मनाची स्थिति अमळ चमत्कारिक झाली.

त्याला आश्चर्य तर वाटलेंच पण त्याहिपेक्षां अधिक एक प्रकारचा खेद त्याच्या मनांत आला.

आपल्या आईची ही सारी सुंदर चिकित्सक बुद्धि दादांच्या जुन्या तऱ्हेच्या संसाराच्या दडपणाखालीं आज कित्येक वर्षानुवर्षें सुप्तावस्थेंतच पडून असावी !

आणि आपल्या आईसारख्याच इतर किती तरी स्त्रिया असतील कीं त्यांच्याहि स्वतंत्र बुद्धीला गंजतच पडावें लागलें असेल !

जुन्या संस्कृतीनें घेतलेले हे सारे बळी !

या व असल्याच इतर अस्पष्ट विचारांनीं तो किंचित् भांबावला. काय बोलावें तें त्याला चटकन् सुचेना.

तितक्यांत वहिनीच पुढें म्हणाल्या,

" मी तर तुला एकदांच सांगून ठेवतें, कीं तूं अमक्याच वेळीं लग्न कर अन् अमकीशींच कर असा शब्द माझ्या तोंडून कधीं निघायचाच नाहीं; कारण आंत विचारच तसा नाहीं. तुझी बायको जेव्हां घरांत येईल अन् जी कोणी येईल ती मला लक्ष्मीसारखीच वाटेल. अन् यांच्या संतोषाचं म्हणशील तर तेंहि पण एकदांच सांगून ठेवतें, कीं तो संतोष तुला कधीं साधतां यायचा नाहीं."

त्यानंतर मायलेकांचें बोलणें तेवढ्यावरच थांबलें.

पण आईचें तें बोलणें सुधीरच्या मनांत दोनचार दिवस तसेंच घोळत होतें. कांहीं तरी निर्वाणीचें बोलणें बोलून टाकल्याप्रमाणें आई असें कां बोलली याचा त्याला कांहीं केल्या उलगडा होईना.

---

# प्रकरण १२ वें

## ब्राउनिंगसाहेबानें घड्याळांत पाहिलें



केशवकाकांच्या राहत्या जागेला समुद्राच्या बाजूला जी प्रशस्त गॅलरी होती तेथें कडेला चिकाच्या पडद्याचा आडोसा करून एका आरामखुर्चीवर सकीना पडली होती. संध्याकाळच्या चाराचा सुमार असल्यामुळें सूर्य बराचसा खालीं झुकला होता, आणि सूर्याचीं किरणें व समुद्राच्या जलपृष्ठावरून परावर्तित झालेलीं प्रकाशकिरणें जिकडे तिकडे तिरपलीं होतीं. केशवकाकांच्या मोठ्या दिवाणखान्यांतल्या साऱ्या वस्तूंवर खिडकीखिडकींतून शिरलेला प्रकाशाचा तिरपा झोत पडला होता, आणि तेथें मांडलेल्यांपैकीं दोनतीन चित्रांवर तर तो असा नेमका पडला होता कीं त्यांतील विविध तैलरंग सरमिसळीनें तळपून चित्रें नीट दिसणें अशक्य झालें होतें.

या प्रकाशाचा उपसर्ग टाळण्यासाठींच सकीना पडदा सोडून खुर्चीवर पडली होती. वास्तविक तसें खुर्चीवर पडण्याचेहि श्रम तिला अमळ असह्यच होते, कारण ती तीन दिवसांच्या जोराच्या तापांतून उठल्याला दोन दिवससुद्धां झाले नव्हते; आणि पुढच्या गॅलरींत येऊन खुर्चीवर पडण्याचा अतिप्रसंग आपण केला याबद्दल केशवकाकांचीं बोलणीं आपल्याला खावीं लागणार हेंहि ती जाणून होती. पण चारपांच दिवस अंथरुणावर पडून रहावें लागल्यामुळें त्या अंथरुणाचाच नव्हे, आणि त्या खोलीचाच नव्हे तर कोणत्याहि बंदिस्त दालनाचा सकीनाला वीट आला होता, आणि हमरस्त्यावरची रहदारी पहात गॅलरींत पडलें तर मनाला अंमळ हुशारी वाटेल अशा विचारानें मोलकरणीकडून खुर्ची मांडवून व पडदा सोडवून ती येथें येऊन पडली होती.

चौपाटीवरची संध्याकाळच्या वेळची ऐन रहदारी सुरू व्हावयास अजून अवकाश होता. पण त्या दिवशीं रविवार असल्यामुळें या वेळींहि थोडीफार

रहदारी होतीच. आणि त्यांतून केवळ मनाला कांहीं विरंगुळा वाटावा म्हणून सकीना गॅलरींत आली होती. तिला जरी नुसत्या चकाकत्या समुद्राचा देखावा दिसला असता तरीहि तेवढ्यानेंच तिला बरें वाटलें असतें. तिनें पाहिलें तों भरती उलटून समुद्र आंत हटला होता व भरतीमुळें दबून साफसूफ झालेल्या काळसर वाळूच्या विस्तीर्ण पट्ट्यावर ऊन्ह चमकत होतें. संध्याकाळची विक्रीची घटका साधण्यासाठीं येऊं लागलेले फेरीवाले आपापलीं दुकानें डोक्यावरून उतरून वाळवंटांत उभीं करीत होते. नारळ विकणारे तीनचार मोपले गिऱ्हाइकांच्या शोधार्थ एव्हांपासूनच घिरट्या घालूं लागले होते. आणि एक गुजराथी पाणी-विक्या उजव्या हातांत पाण्याची पिशवी व डाव्या हातांत लोटी घेऊन हिंडत " थंडा जल " असें ओरडूं लागला होता. अलीकडे समुद्रतटाच्या बाजूनें गेलेल्या प्रशस्त रस्त्यावर पाणी शिंपडण्यांत येत होतें व जलसिंचनाच्या आल्हादानें तो राजरस्ता जणूं अर्धवट शीतल व अर्धवट ऊष्ण असे निःश्वास टाकीत होता, ते अंशतः वर सकीना बसली होती तेथपर्यंत येऊन पोंचत होते.

सकीना कांहीं वेळ त्या देखाव्याकडे पहात राहिली. रस्त्यावरच्या पाण्याच्या फवाऱ्याचा वारा क्षीण होऊन तिच्या अंगापर्यंत पोंचला त्या वेळीं तिनें किंचित् शहारल्यासारखें केलें, व ती मागें सरकली. पण मागें सरकण्याच्या क्षणींच तिला रस्त्यावर कोणी तरी दिसलें व पुन्हां अधिकच वांकून तिनें खालीं पाहिलें; आणि जें माणूस असावें अशी तिची कल्पना होती तेंच आहे अशी खात्री पटून ती मनाशींच हंसली व म्हणाली,

" सुधीरचंद्रच !—अन् बहुतेक इकडेच येत आहेत !—"

सकीनाचा अदमास खोटा ठरला नाहीं. दोनतीन मिनिटें झालीं नसतील तोंच दारावरचें बटन दाबलें जाऊन आंतली घंटा खणखणून वाजली.

उठून जाऊन दार उघडणें सकीनाला शक्य नव्हतें, म्हणून ती तशीच खुर्चीवर पडून राहिली. मोलकरणीनें लगबगीनें येऊन दाराचा बोलट काढल्याचें तिला ऐकूं आलें, व आंत येतां येतां सुधीरनें प्रश्न केलेलाहि तिनें ऐकला कीं

" शेट आहेत ना ?—"

मोलकरणीनें म्हटलें,

" न्हाईत. वाह्यळ भाइर गेल्याती."

त्यावर सुधीरनें विचारलें,

" बाई ?—"

तेव्हां ती म्हणाली,

" हां—बाई हये. इकड गलेरीमंदी बसलीया."

" होय का ? "

असें म्हणून सुधीर गॅलरींत आला.

तो येतांच सकीना हास्य करून " आईये " असें म्हणाली व आदबी दाखविण्यासाठीं खुर्चीतल्या खुर्चीत उठून बसली. तेवढ्यांत तिनें मोलकरणीला खुणविलें व तिच्याकडून एक खुर्ची आणून मांडविली. तिच्यावर बसतां बसतां सुधीर जरासा चपापून म्हणाला,

" म्हणजे ?—तुम्ही आजारी आहांत कीं काय ? "

किंचित् लडिवाळ रागाची चर्या करून मान वेळावीत सकीना हिंदुस्थानींत म्हणाली,

" गरिबाची खबर कशाला असेल ? आम्ही बीमार असलों काय किंवा अच्छे असलों काय, बड्या लोकांना कशाला दाद असणार त्याची ?—हंसून घालवायचं नाहीं अं ! मी पक्की रागावणार आहें आपल्यावर. धेनुकुंजाहून परत आल्यापासून आज दृष्टीस पडतो आहे वदनचंद्र आपला ! "

हें म्हणतां म्हणतां तिनें आणखी मानेचा आविर्भाव केला आणि तिरपा कटाक्ष टाकून आपला राग व्यक्त केला.

तिच्या बोलण्यांतील हिंदुस्थानी काव्य ऐकून सुधीरला मौज वाटली व नेहमींप्रमाणें त्यानें हंसून कांहीं तरी उलट कोटीहि केली असती. परंतु त्याचें लक्ष तिच्या बोलण्यापेक्षांहि तिच्या नैसर्गिक सौंदर्यावर रुग्णतेमुळें आलेल्या छायेकडेच होतें, आणि ती आजारी असतांना आपण आलों नाहीं हें बरें झालें नाहीं असें त्याला मनापासून वाटत होतें. त्यामुळें तो म्हणाला,

" माझ्या हातून कसूर झालीच आहे तेव्हां तुमचा राग चुकीचा आहे असं मला म्हणतांच येत नाहीं. पण खरंच सांगतों, इकडे यायला अगदीं फुरसत झालीच नाहीं. अन् त्यांतून तुमची तब्येत बिघडली आहे अशी थोडी कल्पना असती तरी वेळांत वेळ काढून खचित आलों असतों. काय, ताप आला होता ? मलेरिआचाच ना ? "

तापाचा आपल्याला किती त्रास झाला तें दर्शविण्यासाठीं कपाळाला आंठ्या घालून सकीना म्हणाली,

" कुणास ठाऊक मेला कसला होता ! पण आला तो एखाद्या दुस्मनासारखा आला ! आमच्या मुलखांत पहाडांत एखाद वेळेस डोंगरी वावटळ सुटतं अन् मग त्याच्या झपाट्यापुढं गरीब शेतकऱ्यांच्या झोंपड्या हालून हालून खिळखिळया होतात. तसल्या त्या झोंपडीसारखी झाली माझी अवस्था ताप भरायच्या आधीं. "

" होय ना. छे ! हा मलेरिआचा ताप भारी वाईट. एका झपाट्यांत माणसाची दामटी करून टाकतो."

" अन् चंद्र, तुम्हांला सांगूं ?—तुमचे काका साऱ्या मुलखाचे हळवे आहेत." असें म्हणून ती खुर्चीतल्या खुर्चीत पुढें वांकून बसली व सांगूं लागली,

" मला हींव विलक्षण जोराचं आलं हें खरं. पण माणसाला हींव भरत असलं म्हणजे तें एकदां येऊनच द्यायला हवं. त्या वेळेस का कोणी डॉक्टर बोलावतं ?—पण यांना काडीचा धीर नाहीं. डॉक्टरला टेलिफोनवर टेलिफोन ! डॉक्टरनीं टेलिफोनमधून सांगितलं कीं घाबरायचं कारण नाहीं, ताप भरूं द्या; घाम येऊन तो निघूं द्या, मग दवा देऊं. पण नाहीं, यांचं आपलं टेलिफोनमधून पुन्हां पुन्हां 'हे ला व ! हे ला व ! डॉक्टर, तें कांहीं असलं तरी तुम्ही एकदां येऊन जा !' आतां काय करायचं ? "

इतकें बोलून ती मनापासून हंसली, व 'हॅलो' या इंग्रजी शब्दाचा 'हे ला व' हा तिचा अपभ्रंश ऐकून व केशवकाकांची तिनें उठविलेली हुबेहुब नक्कल पाहून सुधीरलाहि मोठ्यानें हंसूं आलें.

मग सकीनानें आपल्या दुखण्यांतल्या नाना तऱ्हेच्या हकीगती सांगितल्या व त्यांत काकांच्या नकला केल्या. पंजाबी मुसलमानी स्त्रिया बोलण्यांत किती चतुर असतात, व अगदीं लहान सहान गोष्टी मोठ्या अवसानानें व ऐकणाराचें चित्त वेधेल अशा अभिनयानें खुलवून सांगण्याची कला त्यांच्या अंगीं कशी असते याचा सुधीरला त्या वेळीं पुरा प्रत्यय आला. शेवटीं त्याला राहवलें नाहीं व तो म्हणाला,

" बाई, तुमच्या अभिनयाकडे पाहिलं कीं वाटतं एक अलौकिक नटी जगापुढं यायची राहिली ! "

" त्यालाहि कारण तुमचे काकाच." हंसत सकीना म्हणाली.

" ते कसे ? "

" त्यांनीं मला पदरीं घेतलं नसतं म्हणजे माझा मामा मला कलकत्त्यास नेऊन तमाशांतच (हिंदुस्थानींत 'तमाशा' हा नाटक या अर्थाचा सामान्य शब्द आहे.) घालणार होता, माहीत आहे ना ? "

" नाहीं, काकांजवळ मी तुमच्याबद्दल असला प्रश्न कधीं काढला नाहीं. ते काश्मीरकडे चित्रं काढायसाठीं गेले होते अन् येतांना तुम्ही त्यांच्याबरोबर आलांत येवढंच मला माहीत आहे—"

" मग तुमच्या काकांचं एक अत्यंत थोर कृत्य तुम्हांला माहीत नाहीं म्हणायचं. चंद्र, माझे मावाप लहानपणींच वारले अन् माझ्या मामाच्या जाचांत मी लहानाची मोठी झालें. माझा मामा म्हणजे मामा नव्हे सैतान होता येवढंच तुम्हांला सांगतें. माझं नशीब म्हणून माझी शीलसंपत्ति सुरक्षित ठेवून त्याच्या हातीं मी जन्म काढला. आमच्या देशांतल्या शेकडों पोरी या मुंबईचा बाजार भरायसाठीं रवाना होत असतात, त्यांतच माझी रवानगी करायचा त्यानं कांहीं थोडा प्रयत्न केला नाहीं. पण मी वाघिणीसारखी दक्ष राहिलें होतें. तरी शेवटीं माझी औरतमाणसाची दक्षता किती टिकणार ? त्यानं एक दिवस मला सांगितलं कीं उद्यां माझ्याबरोबर कलकत्त्यास तरी आलं पाहिजे, नाहीं तर घर सोडून भणंगभिकारी होऊन रस्त्यावर तरी पाऊल टाकलं पाहिजे. ती अखेर आलेली पाहून मी घाबरलें, रात्रभर रडलें, जीव द्यायचेहि बेत केले, अन् शेवटीं पहांटे घराबाहेर पडून जी पळत सुटलें ती सूर्य उगवायच्या घटकेला गांवापासून सातआठ मैलांवरच्या पहाडांत पोचलें. ज्या झोंपडींत जाऊन मीं आसरा मागितला त्याच झोंपडींत तुमच्या काकांचा मुक्काम होता. माझी हकीगत ऐकतांच माझा सांभाळ करायचं त्यांनीं मला वचन दिलं. माझा मामा पुढं मागं त्रास देईल म्हणून ते मुद्दाम त्याच्याकडे गेले अन् त्याला पांचसातशें रुपये देऊन आले. मग महिना दीडमहिना तिथं पहाडांतच आम्ही राहिलों, अन् यांचं चित्रं काढायचं काम पुरं झाल्यावर इकडे मुंबईस आलों. त्या वेळीं हे भेटले नसते तर मी खचित जीव दिला असता. "

" होय ना ! म्हणूनच आपल्या हातांनीं एखाद्या माणसाला पुनर्जन्म दिला

म्हणजे त्याच्याविषयीं मन जसं हळवं होतं तसं काकांचं तुमच्याविषयीं झालेलं आहे. "

" पण हळवं म्हणजे त्याला कांहीं सीमा ? मला नुसता ताप आला तर इतकं घाबरायचं ? दोनतीन दिवस जेवलेखाल्लेहि नाहींत धड, सारं काम सोडून सारखे माझ्याजवळ बसून होते, अन् ते श्यामपूरचे बडे नबाब इथं आले आहेत, अन् त्यांना यांचीं कांहीं चित्रं घ्यायचीं आहेत वाटतं, त्यांचे दहा निरोप आले तरी गेले नाहींत. मीं जायचा आग्रह केला कीं म्हणत तूं आजारी आहेस, हमारा दिल ठीक नाहीं, हम नहीं जायेंगे."

शेवटचें हिंदुस्थानी वाक्य काकांचा आवाज काढून व त्यांच्या हावभावाची नक्कल करून तिनें उच्चारलें व तें उच्चारल्यावर ती आपणच हंसली.

तिची नक्कल हुबेहुब होती त्यामुळें सुधीरलाहि हंसूं आलें, पण तें त्याचें हंसणें झटकन् मावळलें. कारण सकीनानें काकांच्या वर्तनाचें केलेलें वर्णन ऐकून त्याचें मन गंभीर विचारांनीं व्याप्त झालें होतें. आपली आई आजारी असतांना आपले दादा कसे वागले होते तें त्याला आठवलें व दादांच्या व काकांच्या वर्तनाची तो तुलना करूं लागला. आईचें दुखणें तर फार मोठें होतें, आणि आई अत्यंत पवित्र धर्मबंधनानें दादांची सहचारिणी झाली होती. उलट, जगाच्या दृष्टीनें सकीना केवळ काकांची रखेली होती. धार्मिक विधीनें कसलेंहि बंधन त्या दोघांच्यामध्यें उत्पन्न झालेलें नव्हतें. आणि सकीनाचें दुखणें तें काय, साध्या तापाचें दुखणें; पण धर्मबंधनांच्या अभावीं केवळ प्रेमाच्या प्रेरणेनें काकांच्या मनांत जो जिव्हाळा होता तो धर्माच्या प्रभावानें दादांच्या मनांत उत्पन्न तर झाला नव्हताच, पण जो काय स्वभावतः असेल तो नाहींसा करण्यांतच खरी धर्मप्रवणता आहे अशा समजुतीनें दादा वागत होते. खोट्या धर्मकल्पनांची प्रतिष्ठा न ठेवतां काकांनीं आपल्या हृदयाचा जिवंतपणा आणि जिव्हाळा वाढविला होता; उलट त्या जिव्हाळ्याचे सारे नैसर्गिक झरे कोरडे करून टाकून दादांनीं धर्माचा व संस्कृतीचा बडेजाव राखला होता. मग ज्या जिव्हाळ्याच्या अमृतानेंच संसार सुसह्य व गोड होतो त्याची महति अधिक, कीं जीर्ण झालेला धर्मकल्पनांचा पाचोळा उराशीं बाळगण्याची महति अधिक ? काकांचें प्रेम श्रेष्ठ कीं दादांचा धर्माभिमान श्रेष्ठ ?

असे विचार त्याच्या मनांत उभे राहिले आणि सकीनाकडे जरी त्याचे डोळे

होते तरी त्याची अंतर्दृष्टि मनांतल्या विचारावरच खिळल्यामुळें त्याची चर्या बरीचशी गंभीर झाली.

सकीनाचें चित्त त्याच्या चर्येंतील फरक टिपण्याइतकें त्याच्याकडे नव्हतें. काकांच्या प्रेमळपणाचें व मुग्धपणाचें वर्णन करण्यांतच ती रंगली होती. त्यामुळें जरा थांबल्यावर तीच पुढें म्हणाली,

" आज तरी गेले म्हणजे काय, मी जेव्हां अगदीं त्रागा केला—"

" अस्सं ?—काका त्या नबाबाकडे गेले आहेत एकूण ?—मग आमचा हेलपाटा फुकटच गेला म्हणायचा ! "

" म्हणजे माझी भेट झाली हें कांहींच नाहीं वाटतं ? आम्ही कोणीच नव्हे एकूण !—"

सकीनानें अशा कांहीं उपरोधानें हे शब्द उच्चारले आणि त्या वेळीं आपल्या डोळ्यांचा असा कांहीं भाव केला कीं सुधीरला चटकन् उत्तर सुचेना. तो जें कांहीं बोलला तें वास्तविक अगदीं सहज बोलला, पण सकीनाचे ते उद्गार ऐकतांच आपल्या बोलण्यांतून ती म्हणते तसा ध्वनि निघतो खराच असें त्याच्या ताबडतोब लक्षांत आलें व त्याला वाईट वाटलें. एखाद्याच्या डोळ्याला आपल्या कोपराचा चुकून धक्का लागला म्हणजे ज्या तत्परतेनें दिलगिरी दाखवायसाठीं आपण डोळ्यांवर हात फिरवितों व फुंकर घालतों त्याच तत्परतेनें तो म्हणाला,

" छे छे, बाई ! केवढा अनर्थ काढलात माझ्या साध्या बोलण्यांतून ! फुकट झाला हेलपाटा असं मीं म्हटलं तें इतक्याच अर्थानं, कीं काका भेटले असते म्हणजे बरं झालं असतं—"

यावर " समजलं, समजलं जनाब ! " असें मान हालवीत उद्गारून सकीनानें असें कांहीं मनमोकळें हास्य केलें कीं संभाषणाचा बिघडलेला रंग पुन्हां परत आल्यासारखें झालें.

मग ती म्हणाली,

" काय मी विचित्र बाई ! किती दिवसांनीं तुमचं दर्शन झालं अन् माझीच कर्मकथा मी तुम्हांला सांगत बसलें. तुमची हालहवाल विचारलीहि नाहीं. सांगा आतां, तुमची हालत सांगा. तुमचं कचेरींतलं काम ठीक चाललं आहे ? मासाहेबांची तब्येत अच्छी आहे ? तुमच्या—पण, इथनं उठून आंत जाऊं

आपण; येतां ? मी चहा बनवतें—नको काय ?—छे ! इतकी कमताकद झालें आहें कीं काय मी ?—या ना. ”

असें म्हणत ती खुर्चीवरून उठलीच, व सुधीरहि उठला.

पण उठण्याच्या वेळीं त्यानें गॅलरींतून वांकून पहावयास आणि इमारतीच्या दारापुढें एक मोटार थांबून तींतून केशवकाका बाहेर पडावयास एकच गांठ पडली आणि सुधीर गॅलरींतून मागें होऊन सकीनाला आनंदभरानें म्हणाला,

“ ओऽहो ! बाई ! काका आले कीं ! ते पहा—”

“ मेरा बाप ! मला जर इथं गॅलरींत येऊन बसलेली पाहिली तर जूते खायचीच पाळी येईल ! चंद्र, मी इथं होतें हें बोलायचं नाहीं हं ! मेरी कसम ! ”

असें म्हणत सकीना धांवतच आंतल्या दालनाकडे गेली.

सुधीरला तिचें तें बोलणें व धांवणें मोठें गमतीचें वाटलें, व आजारीपणामुळें सैलशी गांठ देऊन पाठीवर सोडलेले तिचे केंस तिच्या धांवण्यामुळें नितंबावर ह्यालले त्याकडेच तो इतका पहात राहिला कीं काकांनीं दारावरचें बटण दाबल्यामुळें घंटा खणखणली तेव्हां तो अमळ दचकलाच.

त्यानें पुढें होऊन दाराचें बोलट ओढलें.

दार ढकलून आंत येतांना त्याला पाहतांच काका उद्गारले,

“ कोण सुधीर ! शाब्बास !—किती दिवसांनीं आलास रे ! ये, ये.”

सुधीरला पाहतांच केशवकाकांना अत्यंत आनंद झालासें दिसलें, काकांच्या भेटीनें सुधीरचाहि चेहरा एकदम प्रफुल्लित झाला, व चुलतेपुतणे कोचावर गप्पा मारीत बसले ते इतके रमले कीं सकीनानें आंतल्या दारांतून त्यांना चहा झाल्याची वर्दी दोनदां दिली तरी त्यांना दादहि लागली नाहीं.

शेवटीं सकीना पुढें झाली व म्हणाली,

“ जरा थांबूं देत म्हटलं गप्पा ! तिकडे चहा निवून चालला आहे !—चंद्र भेटले कीं जसं कांहीं भान नाहींसं होतं, नाहीं ? ”

सकीनाकडे पाहून केशवकाका एकदां हंसले, व मग उठतां उठतां सुधीरला म्हणाले,

“ चल बाबा, तुझ्यावर मी इतकं प्रेम केलेलं हिला पाहवत नाहीं. हिला नेहमीं मत्सर वाटत असतो तुझ्याबद्दल ! ”

तें ऐकून सुधीरनें हंसत सकीनाकडे पाहिलें. ती डोळे मिचकावीत म्हणाली,

“ऐका, ऐका एकदां बोलणं!––”

त्यानंतर हंसतखेळत चहा झाला, व काकांच्या भेटीला आलें कीं मनाची असेल नसेल ती खिन्नता नाहींशी व्हावयाची हा नेहमींचा अनुभव सुधीरला पुन्हां आला. तो घरून निघाला तेव्हां आपल्या लग्नाबाबत घरांत नवीन उद्भवलेल्या भानगडी काकांना सांगाव्या असें त्यानें मनाशीं योजलें होतें. पण चहा आटपल्यानंतर श्यामपूरच्या बव्या नबाबांच्या एकेक हकीगती सांगून काकांनीं सुधीरला व सकीनाला इतकें कांहीं हंसविलें कीं सुधीरला आपल्या दुःखाचा पूर्ण विसर पडला.

पोटावर हात दाबीत सकीना म्हणाली,

“पुरे बाई, आतां हंसवेना.”

सुधीर म्हणाला,

“पण काका, तुमच्या या गोष्टी ऐकून नबाबसाहेब कसे आहेत ते पाह्यची आपल्याला अनावर इच्छा झाली आहे बुवा!––”

“मग त्यांत काय?––उद्यां संध्याकाळीं साडेसहाला मला पुन्हां जायचंच आहे त्यांच्या भेटीला. तुला घेऊन जाईन मी. येशील?––”

“हं. येईन कीं.”

मग इतर गप्पागोष्टी झाल्यावर सुधीरनें काकांचा निरोप घेतला, व “उद्यां संध्याकाळीं साडेसहा अं! उशीर करूं नकोस!” असें त्याला काकांनीं पुन्हां बजाविलें.

पण श्यामपूरचे नबाब सुधीरला पाह्यला मिळावेत असा योगायोग नव्हता. दुसरे दिवशीं सहा बाजावयाच्या आधींच ब्राउनिंगसाहेबांची रजा घेऊन तो मॉर्निंग न्यूजच्या ऑफिसमधून बाहेर पडला खरा, पण काकांकडे जावयाचा त्याचा हेतू सफल झाला नाहीं. ट्रॅम गांठावयासाठीं तो ट्रॅमच्या नाक्याकडे जात होता इतक्यांत उजव्या हातच्या दुकानांतून बाहेर पडणाऱ्या एका व्यक्तीनें त्याला पाहतांच म्हटलें,

“हल्लो!—”

सुधीरनें वळून पाहिलें, व आश्चर्य आणि आनंद दर्शवीत म्हटलें,

“हल्लो!—मिस् मेरी! What a pleasant surprise! (किती अकस्मात् मजेदार भेट ही!)”

" खरंच !—बरं तुम्ही कुठं निघालां आहांत ?—कुठं विशेष नसेल तर वलानात आर्फनेजमध्यें ?—अं ? बसूं गप्पा मारीत. येतां ?—"

सुधीरनें क्षणभर मनाशीं कांहींसा विचार केला व म्हटलें,

" हं, चला कीं.—बरं पण—तुमच्या हातांत हे किती पुडके तुम्ही घेणार ? दोनचार द्या इकडे—"

" नको. आपण गाडीच करूं. ए गाडी ! ठेरो."

गाडी उभी राहिली, दोघें आंत बसलीं व गाडी चालू झाली.

आपण काकांना कबूल केलें असून जात नाहीं हें बरें करीत नाहीं असें एकदोनदां सुधीरच्या मनांत आलें. परंतु काकांना दिलेला शब्द मोडून मेरीबरोबर जाण्यांत त्याचा जो खोल हेतू होता त्याची आठवण होतांच आपण करीत आहोंत तेंच बरोबर आहे असें त्याला वाटलें.

धेनुकुंजहून परत आल्यापासून या तीन आठवड्यांत त्यानें मेरीशीं पुष्कळच स्नेह वाढविला होता, व आतां केव्हां तरी योग्य संधि मिळतांच तिच्याजवळून जें रहस्य आपल्याला काढून घ्यावयाचें आहे तें घेतां येईल अशी दृढ आशा त्याला वाटूं लागली होती. ही योग्य संधि केव्हां येईल त्याचा नेम नव्हता, व त्यामुळेंच मेरीनें " येतां का माझ्याबरोबर ऑर्फनेजमध्यें ? " असें विचारल्यावर नाहीं म्हणणें चुकीचें होईल असें सुधीरला वाटलें. काका आपली वाट पाहतील, व आपण आपला शब्द राखला नाहीं याबद्दल कदाचित् त्यांचा थोडासा रागहि आपल्यावर होईल असें त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. पण, मेरीबरोबर दोन घटका बोलत बसून आपल्याला हवी ती हकीगत तिच्याकडून काढून घ्यावयाची ही अकल्पित आलेली संधि व्यर्थ जाऊं द्यायला तो तयार नव्हता.

त्यानें मोठ्या कौशल्यानें तिचा स्नेह संपादला होता. तो धेनुकुंजाहून परत आल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं ऑर्फनेजमध्यें गेला होता व मेरी फिरतीचें काम संपवून परत आलेली पाहून त्याला आनंद झाला होता. त्या भेटींत त्यानें मेरीस कुशल प्रश्नाखेरीज कसलाहि प्रश्न केला नाहीं, व नंतरहि तो जरी एक दिवसाआड नेमानें तिच्या भेटीला जाई, आणि एकदोनदां दोघांनीं मिळून हॉटेलांत चहा घेण्यापर्यंत व एकदां सिनेमाला जाण्यापर्यंत दोघांचा परिचय पोंचला होता तरी, सुधीरनें आपल्या मनांतला खरा हेतू कधीं प्रगट केला नव्हता. किंबहुना

मदीना हॉटेलमधील आगीच्या रहस्यावर प्रकाश पाडण्यासारखी कांहीं तरी हकीगत मेरीला माहीत आहे अशी जरी सुधीरची खात्री होती व ती तिच्याकडून काढून घ्यावयास मिळावी हाच जरी तिचा परिचय वाढविण्यांत त्याचा मूळ उद्देश होता, तरी जसजसा परिचय दाट होत गेला तसतसा तिच्या परिचयांत त्याला स्वतंत्रच आनंद वाटत गेला व मूळ उद्देशाची त्याची जाणीव फारशी प्रखर राहिली नाहीं.

सुधीरचंद्र प्रथम आपल्याकडे कां आला होता हें मेरीलाहि माहीत होतें. पण तिलाहि हळुहळू त्याचा परिचय हवासा वाटूं लागला होता, आणि या वीस-पंचवीस दिवसांत तिच्या मुलखाबद्दल किंवा मदीना हॉटेलमधील आगींत मेलेल्या हसनबद्दल त्यानें तिला कधींच प्रश्न केला नव्हता, त्यामुळें त्याच्या परिचयाचा कृत्रिम प्रारंभ तीहि विसरून गेली होती.

गाडींत बसल्यावर बांकावर रचलेल्या पुडक्यांकडे बोट दाखवीत सुधीरनें विचारलें,

" आज काय बाजारावर मोहीम केलीत कीं काय तरी ! "

मेरी हंसली व म्हणाली,

" हो, असंच. पण ही इतकी खरेदी माझी स्वतःची नाहीं कांहीं. मिस पॅटिसनचं आहे सारं सामान, तिला वेळ नव्हता म्हणून तिनं मला धाडली. या साऱ्या भाऱ्यांत मीं माझ्या पैशानं खरेदी केलेला असा एकच पुडा आहे.--हा."

" काय आहे त्यांत ? "

" येवढंहि ओळखत नाहीं ना ?--"

" समजलों. चॉकोलेट.--मग फोडीत कां नाहीं तो पुडा ? नाटकगृहांत विडी ओढायची नाहीं तसं गाडींत चॉकोलेट खायचं नाहीं असा कांहीं पोलिस कमिशनरनं अजून हुकूम काढला नाहीं ! "

मेरीला त्या बोलण्याचें हंसूं आलें.

ती म्हणाली,

" चॉकोलेट खाण्यांत आपली स्वारी पटाईत आहे मला माहीत आहे. पण हा पुडा एका मुलीला द्यायसाठीं मीं घेतलला आहे."

" असं होय ?--मग राहूं दे--"

ऑर्फनेजमध्यें मेरीच्या खोलींत पोंचल्यावर तिनें आधीं चहाची व्यवस्था केली, मिस् पॅटिसनचें सामान तिच्याकडे धाडून दिलें, व एका चपराशाला बोलवून म्हटलें,

" अरे, अकरा नंबरच्या खोलींत परवां ती नवीन मुलगी आली आहे ना ? "

" ती रूथ नव्ह का ? "

" हं. ती खोलींत असली तर तिला घेऊन ये. "

" जी. "

असें म्हणून चपराशी गेला, आणि मेरी व सुधीर चहा आटपून पेले दूर ठेवीत होतीं तोंच एका सुमारें आठ वर्षांच्या मुलीला घेऊन आला.

ती मुलगी आंत येतांच मेरीनें प्रेमभरानें तिला जवळ ओढून घेतलें व तिचें चुंबन घेऊन ती म्हणाली,

" जुलिया !—"

किंचित् घोंटाळल्यासारखा चेहरा करून ती मुलगी हिंदुस्थानींत म्हणाली,

" पॅटिसनबाई म्हणतात माझं नांव जुलिया नाहीं, रूथ आहे—"

मेरीनें तिचें झटकन् चुंबन घेतलें व म्हटलें,

" होय, तेंहि खरंच. पण तूं अन् मी एकटी असलों कीं मी तुला जुलियाच म्हणेन अन् तूंहि मला मरियमच म्हणत जा. "

कांहीं तरी विशेष आनंद झाल्यासारखी चर्या करून ती छोकरी म्हणाली,

" अच्छा बेहेन."

आणि तिनें आपला हात मेरीच्या मानेभोंवतीं टाकला.

मेरी म्हणाली,

" मी तुला मिठाई आणली आहे. ही घे."

असें म्हणून तिनें चॉकोलेटचा पुडा जुलियाच्या हातीं दिला, तिचें पुन्हां एकदां चुंबन घेतलें व तिची चपराशाबरोबर रवानगी केली.

खोलीचें दार ढकलून ती परत आपल्या कॉटवर येऊन बसली तेव्हां सुधीरनें विचारलें,

" तुमच्या नात्यांतली आहे ही मुलगी ? "

" छे !—पण ती माझ्या मुलखाकडची आहे म्हणून तिच्यासाठीं माझा जीव तळमळतो."

" कोणता मुलुख ?--"

" घेनुकुंज."

" काय ?--घेनुकुंज ?--"

" हो. कां ? दचकलांत ?--"

" छे ! कुठं ?--सहज--"

" ती घेनुकुंजकडच्या एका खेड्यांतली आहे. जुलिया होती. विचारी रूथ झाली. अशा कितीक जुलिया रूथ होत आहेत. अन् याला कारण आमचेच लोक आहेत. आमच्या मुलखांत आम्ही भुकेनं मरतों अन् म्हणून या ख्रिस्ती लोकांच्या कोंडवाड्याचीं दारं उघडीं दिसतांच त्यांत शिरतों. किंवा--"

" किंवा काय ? "

" किंवा, आमच्यांतलेच सैतान आमच्या अब्रूवर उठतात अन् मग अब्रू राखायसाठीं या तुरुंगांत आम्ही धांव घेतों--"

हें बोलतां बोलतां मेरीचा चेहरा विलक्षण गंभीर झाला होता, व जणूं पूर्वीच्या कांहीं क्षोभकारक आठवणी होऊन तिचा खालचा ओंठ दांताखालीं दाबला जात होता.

सुधीर म्हणाला,

" म्हणजे ?--तुमची हकीगत अशांतली आहे ?--"

ओंठ अधिकच चावून मेरीनें एक निःश्वास टाकला व खिडकीकडे शून्यपणें लावलेली दृष्टि हलकेच सुधीरकडे वळवून म्हटलें,

" सुधीर, घेनुकुंजला कधीं गेलांत तर एक साधु अन् एक सैतान तुम्हांला भेटतील. एकाचं नांव उमरखान अन् दुसऱ्याचं नांव सय्यद अमीर. या सय्यद अमीरनं--"

असा प्रारंभ करून मेरीनें आपली इत्थंभूत हकीगत सुधीरला सांगितली.

ती ऐकून सुधीरचें मन विव्हल झालें, व त्यानें तिचा निरोप घेतला तेव्हां शेंकडों विचारांची त्याच्या मनांत गर्दी झाली होती.

* * *

दुसऱ्या दिवशीं ब्राउनिंगसाहेबाचें व सुधीरचें बराच वेळ कांहीं तरी खलबत चाललें होतें. तें कशाबद्दल होतें याची ऑफिसमधील मंडळींना कांहींच कल्पना नव्हती. त्यांनीं येवढेंच पाहिलें कीं सुधीर ब्राउनिंगसाहेबाच्या खोलींतून बाहेर

पडला तो कॅशरकडे गेला व तेथें ब्राउनिंगसाहेबाच्या हातची एक चिठी दाखवून त्यानें कॅशरकडून बऱ्याचशा नोटा घेऊन त्या आंतल्या खिशांत घातल्या. सुधीर गेल्यावर साहेबानें डेव्हिडला बोलावून घेतलें व सांगितलें,

"देखो डेव्हिड, सुधीरला मी कांहीं कामाला परगांवीं धाडीत आहें. तो येईपर्यंत रिपोर्टिंग खात्यावरची देखरेख तुझ्याकडे राहील. समजलं ?"

"Yes, Sir; सुधीर केव्हां परत येईल ?"

"त्याचा नेम नाहीं."

"Yes, Sir."

असें म्हणून डेव्हिड गेला, त्याच्यामागें दाराची चौकट मागेंपुढें हेलकावत राहिली, आणि ब्राउनिंगसाहेबानें चिरोटाच्या धुराचा भपकारा सोडून आपल्या प्रशस्त पोटावर चेपून बसलेली सोन्याची सांखळी चाचपीत जाकिटाच्या खिशांतलें घड्याळ काढून पाहिलें.

अत्यंत समाधानाच्या वेळीं अशी सांखळी चाचपून घड्याळ उगीचच्या उगीच पाहण्याची ब्राउनिंगसाहेबाची ठरीव लकब होती.

# प्रकरण १३ वें

## एकदां बहरलेली, आज उन्मळलेली !



रवाडकडून दुपारीं बाराच्या सुमाराला जी गाडी सिंध हैदराबादच्या जंक्शनवर आली तींतून जयंत बापट उतरला. आमच्या वाचकांचा व जयंताचा विशेष परिचय नाहीं. त्यानें सुधीरला लिहिलेलें एक पत्रच काय तें त्यांच्या वाचनांत आलेलें आहे. पण माणसाच्या पत्रावरूनसुद्धां माणूस कशा प्रकारचा असावा व त्याची बोलण्याचालण्याची व पोषाखाची लकब कशा तऱ्हेची असावी याचा थोडासा तर्क बांधतां येतो म्हणतात. जयंतानें सुधीरला पाठविलेल्या पत्रावरून चतुर वाचकांनीं जर अशी कल्पना केली असेल कीं तो पोषाखाचा मोठा षोकी, दिसायला मोठा उमद्या अंतःकरणाचा व उघड स्वभावाचा, आणि चालतांना जलद जलद पाव टाकणारा असावा तर ती कल्पना सर्वस्वीं खरीच ठरेल. तो पहा गाडींतून उतरून व आपलें सामान एका हमालाच्या स्वाधीन करून तो स्टेशनच्या तारऑफिसकडे निघाला आहे तो कसा झराझरा चालला आहे, आणि तेवढ्यांतसुद्धां केसांचा नीटनेटकेपणा बिघडूं नये म्हणून डाव्या तळहातानें ते वरचेवर दाबीत आहे.

वाटेंत त्याला स्टेशनवरील जेवणाच्या खोलीचा व्यवस्थापक भेटला व त्यानें हिंदुस्थानींत विचारलें,

"साब, आपणच दोन जेवणं मागितलीं आहेत काय ?"

आपली घाईची चाल क्षणभर रोखून, पण झटकन त्या नोकराला काय तें सांगून टाकायच्या स्वरानें जयंत म्हणाला,

"होय. जेवण तयार ठेव. मी येवढा तारऑफिसांत जाऊन जेवणाच्या

खोलींत येतोंच. अन् तिकडे फर्स्ट क्लासमधून आमच्या बँकेचा साहेब उतरत असेल त्याला जाऊन वर्दी दे कीं खाना तयार आहे. समजलास ?——"

" जी साब. सलाम."

" अच्छा. " असें म्हणून जयंतानें मनगटावरील घड्याळाकडे पाहिलें व तो पुढें चालूं लागला.

तारऑफिसांत जातांच त्यानें तारेचे दोन फॉर्म मागून घेतले व एक झटकन् भरून तारकारकुनाच्या हातीं दिला. ती तार त्यानें त्याच्या बँकेची जी शाखा कराचीस होती तिच्या मॅनेजरला साहेबाच्या नांवें केली होती. बँकेच्या सर्व शाखांची वार्षिक तपासणी करावयास मुंबईचा मुख्य साहेब निघाला होता, व त्यानें जयंतास मुद्दाम मागून आपल्याबरोबर घेतलें होतें. हैदराबादच्या स्टेशन-वर पोंचतांच आम्ही कराचीस अमुक गाडीनें दाखल होत आहोंत अशी तार करावयास साहेबानें सांगितलें होतें, म्हणून जयंतानें त्याप्रमाणें मजकूर लिहून झट्दिशीं तारेचा फॉर्म कारकुनाच्या हातीं दिला.

दुसरा फॉर्म भरण्यापूर्वीं मात्र तो विचारांत पडला. डाव्या तळहाताखालीं तो छापील फॉर्म धरून उजव्या हातांतील फाउंटनपेनचें मागचें टोंक हनुवटीवर चाळवीत तो एकदोन मिनिटें तसाच उभा राहिला.

तार कोणाला करावी याविषयीं त्याचा निश्चय होत नव्हतासें दिसलें.

त्यानें पत्त्याच्या जागीं

" डॉक्टर थत्ते "

येवढे शब्द भरले व तो पुन्हां थांबला. हाच पत्ता पूर्ण लिहून तार करावी कीं नाहीं याविषयीं त्याचा निश्चय होईना.

तो कराचीला निघाला होता तो मुख्यतः बँकेच्या कामाला हें तर खरेंच. पण तो कराचीस जातच होता तेव्हां दुसरेंहि एक काम त्यानें करावें असें ठरलें होतें. कराचीस रामबागेंत राहणारे डॉक्टर थत्ते म्हणून एक गृहस्थ होते त्यांनीं आपली भाची सुभद्रा हिच्यासाठीं जयंताचें स्थळ पाहिलें होतें व त्या संबंधांत तात्यासाहेबांना—म्हणजे जयंताच्या वडिलांना—दोन-तीन पत्रेंहि लिहिलीं होतीं. पण तात्यासाहेब पूर्ण सुधारकी मताचे असल्या-कारणानें त्यांनीं उलट उत्तरांत डॉक्टरांस स्पष्ट कळविलें होतें, कीं " मुलाच्या लग्नाच्या बाबतींत मी यत्किंचितहि ढवळाढवळ करणार नाहीं. मुलगी पसंत

१०

करण्याचें काम मीं सर्वस्वीं त्याच्यांवर ठेवलेलें आहे. थोडाफार परस्पर परिचय झाल्याखेरीज मुलांमुलींनीं एकमेकांस पसंत करणें शक्य नाहीं. तेव्हां तुम्ही तरी आपल्या भाचीला घेऊन इथें बडोद्यास या. किंवा आमचा जयंत कधीं कांहीं कारणानें कराचीस आला तर जमेल."

असा पत्रव्यवहार झाला असल्यामुळें जयंत जेव्हां कराचीस निघाला तेव्हां तात्यासाहेबांनीं डॉ. थत्ते यांस पत्र लिहिलें व थत्त्यांच्याच घरीं उतरण्याबद्दल जयंतास सांगितलें.

परंतु थत्त्यांच्या घरीं उतरावें हें जयंतास फारसें प्रशस्त वाटेना. आपली ही शंका अस्पष्टपणें त्यानें तात्यासाहेबांच्याजवळ बोलून दाखविली होती. पण तात्यासाहेबांचे सुधारकी विचार इतके पुढारलेले व एकमार्गी होते कीं ते त्याला हंसून म्हणाले होते,

" हात् वेड्या, यांत रे कसला संकोच वाटतो तुला ? मुलीचा स्वभाव अन् तिच्या घरच्या माणसांची चालचलणूक त्यांच्या घरीं चार दिवस राहिल्यानं कळेल तशी दोनदां नाहीं दहादां चहाला गेलास त्यांच्या घरीं तरी कळेल का तुला ? त्यांच्याच घरीं उतर. अप्रशस्त दिसणार नाहीं अशा वेतानं एकदां तरी वडील माणसांची परवानगी काढून त्या मुलीला एकटीला फिराबिरायला घेऊन जा. संकोच कसला वाटतो यांत तुला ? आपल्याला कांहीं माल घ्यायचा असला कीं आपण दुकानांत जाऊन घडिभर उभे राहतोंच कीं नाहीं ? वेडा ! "

हें बोलणें ऐकून आपल्या बापाच्या सरळ विचारसरणीबद्दल जयंताला धन्यता वाटली होती, व समाजांतल्या सर्वच बापांनीं ही विचारसरणी पत-करल्यास विवाहसंस्थेचें स्वरूप किती सुंदर होईल असेंहि त्याच्या मनांत आलें होतें. पण—

हैदराबादच्या स्टेशनवरून प्रत्यक्ष तार लिहावयाची वेळ येतांच त्याचें मन पुन्हां घोटाळलें.

तो अगदीं तरुण होता. आणि तारुण्य प्रेमाच्या बाबतींत पुष्कळ वेळां अविचार आणि लज्जाहीनत्व दाखवितें हें जसें खरें, तसेंच तारुण्यांत कांहीं कारणानें एकदां लज्जा मनांत उद्भवली कीं ती दूर करणें कठीण असतें हेंहि खरें.

म्हणून " डॉ. थत्ते " यापुढील पत्त्याचे शब्द लिहिण्यापूर्वीं तो थबकला.

कराचीस आपल्याला उतरण्यासारखें दुसरेंहि एक ठिकाण आहे ही कल्पना आज

दोन दिवस त्याच्या मनांत मधून मधून येत होती तीच या वेळीं पुन्हां आली. सुधीरची बहीण माई कराचीस होती हें त्याला माहीत होतें, व "तूं कधीं कराचीस गेलास तर आमच्या माईकडेच उतर बरं का" असें सुधीरनें मागें तो मुंबईस गेला होता तेव्हां एकदोनदां सहजगत्या म्हटलेंहि होतें. पण माई-च्या नवऱ्याचें नांव तेवढें त्याला ऐकून माहीत होतें. त्याची ओळख मुळींच नव्हती व त्याच्या घराचा पत्ताहि त्याला माहीत नव्हता.

मग ? माईकडे उतरायचें कसें ?

त्यांत काय ?—पत्ता शोधून काढतां येईल.

मग नको डॉ. थत्त्यांना तार ?—

पण—पण माईकडे उतरणेंहि बरें नाहीं असें त्याच्या मनांत आलें. अप्रगट रीतीनें कां होईना त्यानें माईवर एकदां प्रेम केलें होतें. तिचें दुसऱ्याच माणसाशीं लग्न झालें असतांना त्याच्या घरीं पाहुणा या नात्यानें जाणें बरें नव्हे अशी कल्पना त्याच्या मनांत आली.

ती येतांच त्यानें डॉ. थत्त्यांना धाडावयाची तार पुरी लिहिली व तार-कारकुनाजवळ दिली.

तारकारकून त्याला रिसीट लिहून देत होता त्या वेळीं त्याच्या टेबलावरचें यंत्र "कट्ट कट्ट, कड कड कट्ट" असें करीतच होतें. तो शब्द ऐकत जयंत उभा होता व मनाशीं म्हणत होता,

"अर्थात् माईच्या घरीं जाऊन तिची भेट घ्यायचीच."

तारकारकुनानें दोन्ही तारांच्या रसीदा देतांच जयंत तेथून खाड खाड बूट वाजवीत निघाला—तो जेवणाच्या खोलींत गेला.

जेवण आटोपतांच तो व त्याचा साहेब प्लॅटफॉर्मवर आले. कराचीची गाडी तयार होती. साहेब फर्स्ट क्लासमध्यें जाऊन बसला, व जयंताच्या हमालानें त्याचें सामान एका सेकंड क्लासच्या डब्यांत ठेवलें होतें तेथें जयंत चढला. आपलें सामान नीट ठेवलें गेलें आहे कीं नाहीं तें त्यानें पाहिलें व हमालाचे पैसे चुकते करून तो प्लॅटफॉर्मकडे पहात खिडकीजवळ बांकावर प्रशस्तपणें बसला.

गाडी सुटायला दहाबारा मिनिटें अवकाश होता. थर्ड क्लासमधले बहुतेक उतारू आधींच खुराड्यांत गर्दी करून बसले होते, पण अजूनहि त्यांपैकीं कांहीं

धांवत, पळत येऊन नजीक जो डबा दिसेल त्यांत शिरतच होते. त्यांतील मुसलमान होते त्यांच्या जांभळ्या विजारी, अंगावर सोडलेलीं उपरण्यासारखीं मळकट वस्त्रें व मस्तकावरचीं अर्धवट रजपुती तऱ्हेचीं गबाळीं मुंडाशीं पाहून मुंबईकडून प्रथमच येणाऱ्या कोणाहि माणसाला गंमत वाटण्यासारखी होती; आणि हिंदू लोकांचीं अरुंद कंगोऱ्याचीं, वाटीसारखीं बसकट पागोटीं, त्यांच्या कानांतलीं सोन्याचीं कर्णवलयें, चेहऱ्यावरचा एक विचित्र तुळतुळीतपणा, आणि पायांतले मखमलीचे स्लीपर पाहून व त्यांचे विचित्र घोगरट आवाज व अंत्याक्षरावरचे हेल ऐकूनहि कांहीं कमी मनोरंजन होण्यासारखें नव्हतें. त्या गर्दींत बायका होत्या त्यांच्या नाकांत मधोमध सुंकल्यासारखा एक एक टपोरा मोती होता, त्यांनीं घुंगट ओढून घेतलें होतें, त्यांतून त्यांचे चेहरे मधूनच दिसत होते ते बहुशः गौरवर्ण व आकर्षक होते, त्यांपैकीं बहुतेकजणी स्थूलदेही होत्या, आणि साऱ्याचजणी पायांतल्या सपाता प्लॅटफॉर्मच्या विटावरून फर्रफर्र अशा फरपटत वांकड्यातिकड्या झुलत चालल्या होत्या. तेवढ्यांत एक तरुण जोडपें आलें. त्यांतील पुरुषाचा इंग्रजी पोषाख आणि स्त्रीचा गुजराथी व इराणी पद्धतींच्या मिश्रणाचा ऐटबाज व परीटघडी पोषाख भोंवतालच्या इतर स्त्रीपुरुषांच्या पोषाखाहून एकदम भिन्न वाटून डोळ्याला आल्हाददायक वाटत होता. चारपांच मिठाईवाले व फळवाले पुन्हां पुन्हां येरझारा घालीत होते त्यांचेहि शब्द व हेल, इतकेंच नव्हे तर पायांतील चढाव खरडत चालण्याची लकबसुद्धां कांहीं वेगळीच आहे असें जयंतला वाटलें; व तें सारें पहात असतां सरहद्दीनजीकच्या प्रान्तांत हिंदी व परकी यांच्या संस्कृतींची हरप्रकारची झालेली सरमिसळ दर्शविणारा हा मोठा नमुनेदार देखावा आहे असें त्याच्या पुनः पुन्हां मनांत आलें. त्याचीं दहा मिनिटें केव्हांच निघून गेलीं.

गाडी सुटायला आतां एकदोन मिनिटांचाच अवकाश होता. गाडीला सिग्नल मिळाला होता व पहिली घंटाहि झाली होती. गार्ड तोंडांत शिटी धरून खिशांतलें लठ्ठ घड्याळ तळहातावर सांवरून जणू घटकाच मोजीत होता. शिटी देऊन धांवण्यासाठीं एखाद्या घोड्यासारखें अधीर झालेलें एंजिन ऐन तयारीनें थांबलें होतें; व त्याच्या बंबांतून सारखा " सोंऽऽ " असा आगीचा श्वास निघत होता.

इतक्यांत तीन गृहस्थ धांवत दादर ओलांडून व प्लॅटफॉर्मवरून पळत येऊन जयंताच्या डब्यांत शिरले. त्यांचें सामान डोक्यावरून आणणाऱ्या हमा-

लानें कसाबसा डबा गांठला व सामान उतरलें. तेवढ्यांत गार्डाची शिटी झाली, व गाडीचीहि कर्कश शिटी होऊन गाडी चालू झाली.

खिडकीच्या दांड्याला धरून डब्याच्या पायरीवर उभ्या राहिलेल्या हमालाच्या हातीं त्या तीन गृहस्थांपैकीं एकानें दोन आणे ठेवले. त्यावर हमाल कायसें म्हणाला व तो गृहस्थहि उर्मटपणें कायसें बोलला. जयंतला तें कळलें नाहीं; पण हमालानें अधिक पैसे मागितले असावेत व या गृहस्थानें त्याला शिव्या हांसडल्या असाव्यात हें उघड होतें. त्या शिव्या ऐकतांच ते तिघेजण आपापसांत हंसले, व घामानें डवडवून गेलेल्या त्या हमालाच्या चर्येवर दैन्य व राग यांचें एक विचित्र संमिश्रण व्यक्त झालें.

त्यानें पुनः एकदां अधिक पैसे देण्याबद्दल विनवणी केली, पण त्या शिव्या देणाऱ्या गृहस्थानें पुन्हां शिव्या दिल्या व "खुशाल असा उभा राहून चल कराचीला" अशा अर्थीं कांहींसें म्हणून तो पलीकडच्या बांकावर आपल्या दोन स्नेह्यांच्या मधोमध जाऊन बसला. ते दोघे स्नेही पुन्हां एकदां मनःपूर्वक हंसले, व निराश होऊन हमाल कायसें पुटपुटत खालीं उतरला.

जयंतला तो प्रकार मोठा चमत्कारिक वाटला. सिंधमधील सुशिक्षित लोक साहेबाची नक्कल करून पोषाखाचा दिमाख दाखविण्यांत आणि गरीबगुरीबांवर अरेरावी चालविण्यांत बरेच पटाईत असतात हें त्यानें ऐकलें होतें. त्याची त्याला आठवण झाली. शिव्या देण्याचा पराक्रम करणाऱ्या गृहस्थाकडे तो निरखून पाहूं लागला.

तो गृहस्थ सिंधी नसून महाराष्ट्रीय असावा अशी जयंतला शंका आली. त्याच्या पायांतली सैल 'सुत्थाण्', मुंडेछाट मलमलीचा सद्रा, अगदीं लांडा कोट हा सारा पोषाख सिंधी थाटाचा होता, व तो त्या इतर दोघांशीं बोलत होता तेंहि अगदीं अस्खलित सिंधींत व अस्सल सिंधी हेलांत बोलत होता. पण त्याची मुद्रा महाराष्ट्रीय होती, आणि शिवाय सिंधी लोक जें एक उग्र वासाचें तेल आपल्या केंसांना चोपडतात तें त्या इतर दोघांच्या केशकलापावर तकाकत होतें पण या गृहस्थानें लावलें नव्हतें हेंहि जयंतच्या लक्षांत आलें. आणि नंतर एकदां त्या गृहस्थानें मोठी जांभई देऊन जेव्हां "अग आई ग !" हा साहजिक मराठी उद्गार काढला तेव्हां तर जयंतला शंकाच उरली नाहीं.

तो महाराष्ट्रीय आहे तेव्हां त्याच्याशीं कांहीं बोलावें व त्याचा परिचय करून घ्यावा असें जयंतच्या मनांत आलें. पण त्या तिघांचें पैशाच्या व्यवहारासंबंधीं कांहीं तरी बोलणें जोरजोरांत चाललें होतें तें कांहीं केल्या संपेना, व सुधीरला बोलणें काढायला अवसरच मिळेना. मग कंटाळून जयंतनें तो नाद सोडला, व आपल्या बॅगमधील एक कादंबरी काढून ती वाचावयास प्रारंभ केला.

त्या तिघांचीं तारस्वरांतील बोलणीं चालूच होतीं.

दोन स्टेशनें तशींच गेलीं. तिसऱ्या स्टेशनवर थांबून गाडी चालू होत असतां तिकिटें तपासणारा तिकिटकलेक्टर जयंताच्या डब्यांत शिरला.

जयंतचें तिकिट पाहिल्यावर त्यानें त्या तिघांकडे वळून तिकिटें मागितलीं.

त्यांच्याजवळ तिकिटें नव्हतीं.

तिकिटकलेक्टरनें आपल्या डाव्या खिशांतून एक वही काढली व म्हटलें,

" मग तुम्हांला दुप्पट पैसे आणि दंड भरायला पाहिजे."

यावर त्या तिघांपैकीं जो एक स्थूल देहाचा चष्मेवाला होता त्यानें उठून त्या तिकिटकलेक्टरच्या खांद्यावर हात ठेवून त्याला कांहींशी खूण केली, व त्याला एकीकडे घेऊन त्याच्या कानांत कांहींसें सांगितलें.

त्याचा परिणाम असा झाला कीं तो तिकिटकलेक्टर त्यांच्या बांकावर बसला व हंसत खेळत त्यांच्याशीं गप्पागोष्टी करूं लागला. स्थूलदेही चष्मेवाल्यानें कोठूनशी एक लांबट बाटली व चार ग्लास काढले. जो महाराष्ट्रीय आहे असें जयंतानें ठरविलें होतें त्यानें ते ग्लास भरले व खिशांतील सिगारेटची डबी काढून सर्वांपुढें फिरविली. क्षणार्धांत ग्लासांचा किणकिणाट झाला व सिगारेट्स पेटविल्या जाऊन धूम्रवलयांनीं डबा भरून गेला. मग त्यांच्या गप्पा अधिकाधिक आवेशयुक्त होत गेल्या, व ग्लास पुन्हां पुन्हां भरले गेले.

जयंतानें सूक्ष्मपणें पाहिलें तों त्या महाराष्ट्रीयानें सर्वांत अधिक झोंकली व अखेर अखेर त्याच्या बरळण्याचें त्याच्या स्नेह्यांनाहि हंसूं येऊं लागलें.

* * *

कराची स्टेशन आलें तेव्हां जयंतनें नळाच्या खोलींत जाऊन तोंड स्वच्छ केलें व केंस विंचरले आणि सारे कपडे चढवून तो खिडकींतून तोंड काढून दारांत उभा राहिला.

कदाचित् डॉ. थत्ते स्टेशनवर येतील अशी त्याची कल्पना होती. ते आले तरी त्यांना ओळखायचें कसें ही अडचण होतीच. पण निदान आपण दारांत उभें रहावें म्हणजे आपल्याला पाहून अदमासानें तेच कदाचित् पुढें येतील असा त्यानें विचार केला.



आणि हा त्याचा विचार खरा ठरला. गाडी उभी राहतांच एक मध्यवयाचे ठेंगणे गृहस्थ डब्याजवळ येऊन म्हणाले,

" आपण बडोद्याहून आलांत काय ? "

" हो. आपण—डॉ. थत्ते—नाहीं ? "

इतक्यांत त्या गृहस्थांच्या कोटाच्या आंतल्या खिशांतून स्टेथॉस्कोपची नळी अर्धवट बाहेर दिसत होती तिकडे जयंतचें लक्ष गेलें, व त्यावरून आपण ज्यांच्याकडे उतरणार आहोंत ते डॉ. थत्ते हेच याबद्दल त्याची इतकी खात्री झाली कीं त्यांनीं " होय, मीच थत्ते " असें म्हटलें तिकडे त्याचें लक्षहि नव्हतें.

तो हंसत झटकन खालीं उतरला.

डॉ. थत्ते यांनीं त्याच्यासाठीं एका हमालाला हांक मारली व सामान काढावयास सांगितलें.

जयंत त्यांना म्हणाला,

" आमचा बँकेचा साहेब आहे फर्स्ट क्लासांत त्याला भेटून येतों अन् विचारून येतों उद्यां कुठं अन् किती वाजतां त्याच्याकडे जायचं तें."

" जा, जा. मी आपलं सारं सामान नीट पाहतों, ती सूटकेस अन् तें होल्ड ऑल येवढंच ना ? "

" हो, अन् आणखी ती एक लांबट पेटी आहे. ती जरा बेतानं उचलली पाहिजे अं ! त्यांत दिलरुबा आहे."

" असं का ? " असें म्हणून नीळकंठराव थत्ते हंसले. " अरे वा ! आपल्याला हा नाद आहे काय ? " अशा अर्थानें त्यांनीं हंसून जयंतकडे पाहिलें.

जयंतहि हंसला पण कांहीं न बोलतां लगबगीनें साहेबाकडे गेला.

तो परत आला तों नीळकंठरावांनीं हमालाच्या डोक्यावर सामान दिलें होतें. जयंतच्या डब्यांतील तें त्रिकूट डब्याच्या दाराशीं उभें होतें. त्या महाराष्ट्रीय गृहस्थाचे डोळे लालबुंद झाले होते आणि त्याचे केंस फिसकारून कपाळावर लोंबत होते.

जयंतानें पाहिलें तों त्या गृहस्थाची व नीळकंठरावांची ज्या वेळीं दृष्टादृष्ट

झाली तेव्हां त्या गृहस्थानें खुनशीपणानें कपाळाला आंठ्या घालाव्या तशा घातल्या, आणि एखाद्याकडे तिरस्काराचा क्षणिक कटाक्ष टाकून नजर फिरवावी तशी नीळकंठरावांनीं फिरविली.

स्टेशनच्या बाहेर जाऊन गाडींत बसल्यावर व गाडी चालू झाल्यावर जयंतनें नीळकंठरावांस विचारलें,

" मी ज्या डब्यांत होतों त्यांत तो महाराष्ट्रीय गृहस्थ होता तो कोण? इथलाच राहणारा आहे काय ?—"

" हं. आमच्या शेजारींच राहतो.—नरपशू आहे—"

" काय नांव ?—"

" नांवसुद्धां घेऊं नये इतका अमंगल आहे तो माणूस. त्याचं नांव वसंतराव आपटे—"

" अं !—काय म्हणतां !—"

असा तारस्वरांतील उद्गार जयंतच्या तोंडून बाहेर पडला, व विस्मयानें त्याला पुढें बोलवेना. वसंतरावांचें गाडींतलें एकंदर वर्णन पाहून त्याच्याविषयीं इतका तिटकारा त्याच्या मनांत उत्पन्न झाला होता कीं, ' नरपशू ' हें नीळकंठ-रावांनीं वापरलेलें विशेषण त्याला सौम्यच वाटलें; आणि सुधीरची बहीण माई, आपलें सुदैव असतें तर जिला अर्धांगी म्हणून वागविण्याचें परमसौख्य आपल्याला लाभलें असतें ती माई या तिरस्करणीय पुरुषाशीं पत्नीधर्मानं वागत पिचत पडली आहे ही कल्पना मनांत उभी राहतांच त्याच्या अंगावर शहारे आले. तो अर्धवट आपल्याशींच म्हणाला,

" अरेरे !—"

नीळकंठरावांनीं आश्चर्यानें विचारलें,

" कां हो ?—आपल्याला कांहीं माहिती आहे कीं काय त्यांची ?—"

" हं—मग सांगेन आपल्याला."

येवढेंच जयंत तुटकपणें बोलला व मग नीळकंठरावांच्या घराशीं गाडी थांबे-पर्यंत तो विचारांनीं सुंद होऊन स्तब्ध बसला होता.

* * *

चारपांच दिवसांच्या मुक्कामांत जयंतानें सुभद्रेच्या स्वभावाचें, सुशिक्षित-पणाचें व वागण्याचें आणि तिच्या घरांतल्या माणसांचेंहि सूक्ष्म अवलोकन

केलें, व त्याला सुभद्रा मनापासून पसंत पडली. ती मोठी स्वरूपवान नव्हती, परंतु तिची मुद्रा प्रथमदृष्टीपासूनच त्याला आकर्षक वाटली, व तिच्या सुसंस्कृत अभिरुचीचें आणि मुग्ध, सरळ स्वभावाचें त्याला रोज अधिकाधिक प्रत्यंतर येत गेलें. त्याचें मन तिच्यावर जडलें व त्याला एक अवर्णनीय आनंद झाला.

मात्र हा आनंद त्याला पूर्णांशानें घेतां आला नाहीं. कारण वसंतरावाच्या वागणुकीच्या आणि माईच्या छळाच्या इतक्या हकीगती त्याला नीळकंठरावां-कडून आणि एकदां तो व सुभद्रा एकटींच बोलत बसलीं असतां तिच्याकडून कळल्या कीं त्या ऐकून त्याचें चित्त अत्यंत अस्वस्थ झालें. दिवसाकांठीं हजार वेळां माईची गोष्ट त्याच्या मनांत येई, माईच्या दुःखाबद्दलच्या विचारांचें काहूर उठून रात्रीं त्याला धड झोंपहि येत नसे, आणि सुभद्रा व नीळकंठराव यांच्याशीं गप्पाविनोद करण्याचा आनंद उपभोगतांना त्याला कितीकदां वाटे " माई दुःखसागरांत बुडालेली आहे, आणि मी सुखाच्या ऐन उपवनांत स्वच्छंद विहार करतों आहें !---किती अधम मी ! "

माईच्या संसाराची इत्थंभूत हकीगत ऐकून तिच्या भेटीविषयीं पूर्वीं त्याच्या मनांत असलेली उत्सुकता पार नाहींशी झाली. तिच्या भेटीचा विचार मनांत आला कीं त्याच्या छातींत धस्स होई. दुःखाच्या तपश्चर्येनें दिव्य झालेल्या त्या सतीपुढें उभें तरी कसें राह्यचें ? तिला कुशल काय विचारायचें ? आपलें कुशल तिला कसें सांगायचें ? असें त्याच्या मनांत येई, आणि माईकडे जायचा प्रसंग तो रोजच्या रोज दुसऱ्या दिवसावर ढकली.

पण शेवटीं त्याचें जाणेंच दुसऱ्या दिवसावर आलें तेव्हां माईकडे जाण्या-वांचून गत्यंतरच उरलें नाहीं. योगायोगानें सुधीरचें एक पत्र बडोद्याच्या पत्त्या-वरून त्याच्या वडिलांनीं पत्ता बदलून पाठविलें होतें तें त्याच दिवशीं त्याच्या हातीं आलें. सुधीरला किंवा सुधीरच्या आईबापांना माईची ही स्थिति कशी माहीत नाहीं याचें त्याला प्रथम मनस्वी आश्चर्य वाटलें होतें. पण नीळकंठरावांच्या व सुभद्रेच्या सांगण्यावरून जेव्हां त्याला कळलें कीं माई नेहमीं आपल्या पत्रांत घरीं कुशलच लिहीत असते, तेव्हां त्याचें तें आश्चर्य नाहींसें झालें. त्यानें मग मनाशीं ठरविलें कीं आपणच आतां सुधीरला सविस्तर पत्र लिहून माईची खरी स्थिति कळविली पाहिजे. सुधीरचें पत्र हातीं येतांच आतां या पत्राला उत्तर लिहितांनाच माईबद्दलचें सारें त्यांत लिहावयाचें असें त्यानें मनाशीं योजिलें,

पण पत्र वाचतांच हा त्याचा विचार त्याला बदलावा लागला. कारण सुधीरच्या पत्रावरून तो एकाएकीं धेनुकुंजला गेला होता व तिकडून तो केव्हां परत येईल त्याचा नेम नव्हता असें त्याला समजलें. मग तो मनाशीं म्हणाला,

"हरकत नाहीं, सुधीर परत मुंबईला आला कीं, पत्र कशाला, आपणच मुंबईस मुद्दाम जाऊं अन् त्याच्या कानावर माईची सारी हकीगत घालूं. आज माईची भेट घेतली कीं—"

तो विचार मनांत येतांच त्याला पुन्हां कसेंसेंच झालें व त्यानें सुधीरचें पत्र पाकिटांत घालून किती वेळ तरी हातांत तसेंच धरलें.

*  *  *

त्या दिवशीं संध्याकाळीं जयंत माईला भेटावयास गेला. सुभद्रा बरोबर गेली. बंगल्यांत शिरल्यावर जयंत बाहेरच्या खोलींत बसला, व सुभद्रा आंत माईस सांगावयास गेली.

थोड्याच वेळांत सुभद्रेबरोबर माई बाहेर आली. ती दाराच्या उंबरठ्याशींच अर्धवट भिंतीआड उभी राहिली, व तिनें डोकावून आंत पाहिलें.

जयंतनेंहि त्याच वेळीं नजर तिच्याकडे टाकली, व दृष्टादृष्ट होतांच त्याच्या हृदयाचें पाणी पाणी झालें.

अरेरे ! काय ही माईची दशा झाली होती ! अल्पकाळापूर्वीं जिचा वासंतिक बहर पाहून चित्त रमलें अशी एखादी सौगंधिक पुष्पवेली वादळानें उन्मळून सुकून गेलेली दिसावी तशी माई दिसत होती !

मोठ्या प्रयत्नानें त्यानें विचारलें,

"काय ?—बरं आहे ना ?—"

"बरं आहे." असें उत्तर देतांना माईनें किंचित् हास्य केलें.

परंतु त्याच क्षणीं कृत्रिम प्रयत्नानें आवरून धरलेल्या साध्या भावना तिच्या हृदयांत उचंबळल्या आणि तें हास्य पार नष्ट होऊन तिला एक अनावर हुंदका आला. तिनें झटकन् मान फिरविली, आणि डोळ्याला पदर लावून शेजारीं उभ्या असलेल्या सुभाताईच्या खांद्यावर डोकें टेकलें.

जयंत पुरुषासारखा पुरुष, परंतु त्याचेंहि हृदय थरकलें आणि अश्रुधारा टिपतां टिपतां त्याचा हातरुमाल भिजून गेला.

---

# प्रकरण १४ वें





## घाटांतला अपघात

पणजीस पोंचल्यानंतर तेथून पुढें घेनुकुंजाला जाणाऱ्या मोटारगाडींत सुधीर बसूं लागला, तेव्हां त्या गाडीच्या ड्रायव्हरनें त्याला ओळखलें व म्हटलें,

" सलाम साहेब, पछान हय क्यं ? "

सुधीर हंसत म्हणाला,

" वा! ओळख आहे तर! अशी कोणी विसरतो काय?"

तेवढ्यानें उत्तेजन येऊन ड्रायव्हरनें आपल्या तोंडांतल्या विडीचा झुरका मारला, आणि साहेबी कंगोऱ्याची टोपी त्यानें डोक्याला उलटी घातली होती ती आणखी मागें ढकलून विचारलें,

" अन् तुमच्याबरोबरचे ते चित्रं काढणारे साहेब कुठं आहेत ?--अन् त्या बाई--कां तुम्ही एकटेच आलां ?—"

" हं. एकटाच आलों."

ड्रायव्हरशीं तें वाक्य उच्चारतांच सुधीरच्या मनांतील कांहीं विचारांना अधिकच गति मिळाली. मुंबई सोडल्यापासून त्याच्या मनांत पुनः पुन्हां येत होतें कीं, मागच्या वेळीं घेनुकुंजाला काका व सकीना यांचा सहवास आपल्याला होता, आणि या खेपेस आपल्याला एकटेंच रहावें लागणार. ज्या म्हाताऱ्या बागवानाचें खोपटें काकांनीं भाड्यानें घेतलें होतें तेंच भाड्यानें ठरवून तेथेंच राहण्याबद्दल काकांनीं त्याला बजावलें होतें व त्याप्रमाणेंच सुधीर करणार होता. पण त्याला पुनः पुन्हां वाटे, या वेळींहि काका असते तर फार मजा झाली असती.

घेनुकुंजला यावयास निघण्यापूर्वीं त्यानें काकांची गांठ घेतली तेव्हां आपल्याबरोबर चलण्याविषयीं त्यानें काकांना पुष्कळ आग्रह केला. पण श्यामपूरच्या नवाबाकडे पांचसात चित्रें खपवून सातआठ हजार रुपये काढण्याची काकांची

खात्री होती, व असें गिऱ्हाईक सोडून मजेखातर धेनुकुंजला यावयाची त्यांची तयारी नव्हती.

सुधीर जरा हिरमुसला झाल्यासारखें पाहून काका म्हणाले,

" तूं म्हणशील कीं माझ्यापेक्षां तुम्हांला पैसा अधिक वाटतो. पण तूंच सांग, अशीं चार गिऱ्हाइकं गांठल्याशिवाय माझी सारी मिजास चालायची कशी ? अं ?—तूंच मुळीं धेनुकुंजहून लवकर परत ये, म्हणजे आपण सगळीं मिळून काढूं कुठली तरी मजेदार सफर. काश्मीरला जाऊं वाटलं तर. हिला ( सकीना शेजारीं उभी होती तिच्याकडे बोट दाखवून ) आपल्या देशाला जाऊन यायची लहर आली आहे आत्तांशी—"

काकांच्या चेष्टेला दुजोरा देण्यासाठीं सुधीरनें सकीनाकडे पाहून हास्य केलें व म्हटलें,

" होय बाई ?—"

मान हिसडून सकीना म्हणाली,

" त्यांचं काय ऐकतां तुम्ही !—पण काश्मीरला जायला कांहीं तरी निमित्त हवं म्हणूनच माझी लहर हवी असली तर माझी ना नाहीं. चंद्र, तुम्ही मात्र लवकर परत या म्हणजे झालं—"

" माझं काम केव्हां संपेल अन् मला केव्हां परत यायला मिळेल तें कांहींच सांगवत नाहीं." सुधीर म्हणाला.

" शाबास ! असलं कसलं काम आहे तें ?—"

" आहे असंच कांहीं, कचेरींत—"

मध्येंच काका म्हणाले,

" कचेरीचं कसलं आलं आहे ?—तुला तो खरं सांगत नाहीं. तिकडे जाऊन तो एक नवरी पसंत करून आणणार आहे !—"

" अफसोस !—"

सकीनाच्या या उद्गारांमुळें सगळींच हंसलीं, व सुधीर काकांना म्हणाला,

" चांगलं ! "

तितक्यांत मोलकरणीनें हांक मारल्यामुळें सकीना आंत गेली, व तें पाहून सुधीर म्हणाला,

" काका, माझं काम कोणत्या स्वरूपाचं आहे हें मी तुम्हांला सांगितलंच आहे--"

" म्हणूनच मघांशीं तसं चेष्टेवर बोलणं नेलं मीं, नाहीं तर सकीनानं तुला एक नाहीं दहा प्रश्न केले असते, अन् मग तुला उत्तर देतां देतां पुरे वाट झाली असती.

" तें खरंच. पण मी आतां निराळाच एक प्रश्न विचारणार होतों तुम्हांला. "

" तो काय ? "

" माझ्या मनांत अशी एक काल कल्पना आली, कीं तुम्ही घेनुकुंजला जीं 'लँड्स्केप्स' ( सृष्टीचे देखावे ) काढलींत त्यांतलीं चारपांच अन् तुमच्या हातचीं इतर एकदोन चित्रं जर मी बरोबर घेऊन गेलों तर माझ्या खऱ्या कामाची शंकासुद्धां कोणाला न येतां मला करायचा तो तलास करतां येईल. मी घेनुकुंजला कशासाठीं येऊन राहिलों असं कोणी मला विचारलं तर मी उत्तर काय देणार ?--तेंच माझ्याजवळ तुमचीं चित्रं असलीं म्हणजे मी चित्रं विकणारा फेरीवाला आहें असं उजळ माथ्यानं सांगायला हरकत नाहीं. अन् ज्या लोकांत मला वावरायला हवं आहे त्यांच्या घरींही शिरकाव करून घ्यायला तुमच्या या चित्रांमुळं मला मोठं चांगलं साधन मिळेल."

सुधीरची ही कल्पना काकांना पटली, व त्यांनीं सातआठ निवडक चित्रें नीट बांधून त्याच्याबरोबर दिलीं.

आत्तां मोटारड्रायव्हरनें जेव्हां " तुमचे ते चित्रं काढणारे साहेब नाहींत का तुमच्याबरोबर ? " असा प्रश्न केला तेव्हां सुधीरला काकांच्या घरचा वर दिलेला संभाषणप्रसंग आठवला, आणि त्याबरोबरच चित्रांचीही आठवण होऊन मोटारींतल्या मधल्या कप्प्यांत ठेवलेल्या त्या पॅकबंद चौकटीकडे त्यानें एकदां दृष्टि टाकली व ड्रायव्हरला म्हटलें,

" दुसऱ्या उतारूंचं सामानबिमान या कप्प्यांत घालूं नका अं. आमचा हा सारा नाजूक माल आहे. दुखवतां कामा नये."

" वा ! साहेब, हें काय सांगायला हवं. तुम्ही अगदीं काळजी करूं नका." ड्रायव्हरनें आश्वासन दिलें.

सुधीर जसा आपल्याबरोबरच्या सामानाला जपत होता तसाच आपल्या सामानाला सारखा जपणारा मोटारींत दुसरा एक उतारू होता. त्याच्या सामानाच्या ट्रंका गाडीच्या मागच्या जागेंत होत्या व तो स्वतः मधल्या कप्प्यांत सुधीरजवळच बसला होता. मोटारची आठदहा मैलांची धांव झाली कीं एखादें बारकें गांव लागे व तेथें कोणी तरी चढायचें किंवा उतरायचें असे त्यामुळें गाडी थांबे. अशी गाडी थांबली कीं हा माणूस उतरून एकदां मागच्या बाजूकडे जाई व आपल्या ट्रंका जागच्या जागीं आहेत कीं नाहीं तें एकदां पाही.

त्याचें तें करणें सुधीरला अमळ चमत्कारिक वाटलें, आणि एका मुक्कामाला गाडी उभी राहूं लागली, व आपल्या ठराविक क्रमाप्रमाणें उतरण्यासाठीं त्या गृहस्थाची चुळबुळ सुरू झाली तेव्हां तो शेवटीं त्याला म्हणाला,

"बसा हो, कशाला उतरतां?—कुठं गेल्या नाहींत ट्रंका तुमच्या!—"

तरी त्या गृहस्थाला कांहीं राहवलें नाहीं. मोटार थांबतांच उतरायचें त्याप्रमाणें तो उतरलाच.

तो परत येऊन जागेवर बसला व गाडी चालू झाली तेव्हां सुधीर त्याला हंसत म्हणाला,

"काय, तुमच्या ट्रंकांची तब्येत ठीक आहे? —"

सुधीरच्या या खोंचदार प्रश्नाचा राग न मानतां तो गृहस्थ म्हणाला,

"हां हां, बहोत अच्छी हय तबियत!"

व असें म्हणून तो मनःपूर्वक हंसला.

तें हंसणें मोठें विलक्षण होतें. त्या उतारूसारखा एखादा गंमती स्वभावाचा वृद्ध मुसलमान मुशाफर वाचकांना कधीं भेटला असेल तरच त्या हंसण्याची त्यांना आपल्या मनाशीं कल्पना करतां येईल.

त्या म्हाताऱ्या मुसलमानाच्या हंसण्यानें आणखी विनोद करावा असें वाटून सुधीर म्हणाला,

"पण एकंदरींत तुमच्या ट्रंकांची तब्येत जरा नरमच दिसते आहे! एरव्ही तुम्ही दरघडी उतरून त्यांची नाडी तपासली नसती!—"

आपली लांब, शुभ्र दाढी डाव्या हातानें झटकीत तो म्हातारा म्हणाला, "देखना पडता हय! वो बीमार हो जायेंगे तो हमारी तब्येत कैसी ठीक होगी?—"

सुधीरच्या कोटीच्या तोडीची आपण ही उलट कोटी केली असें म्हाताऱ्याला वाटलें व तो मोठ्यानें हंसला. सुधीरहि हंसला; व मग त्या दोघांचें फारच मेतकूट जमलें. इतकें, कीं पुढच्या टप्प्यावर गाडी थांबली तेव्हां एका चहाच्या खोपट्यापुढच्या लंगड्या बाकावर बसून दोघांनीं मिळून चहा घेतला, व तो वाईट असल्याबद्दल दोघांनीं मिळून मालकाला हलक्या आवाजांत शिव्याशाप द्यावयाचा समारंभ उरकून घेतला.

तो वृद्ध मुसलमान गालिच्यांचा व रेशमी कापडाचा व्यापारी होता असें सुधीरला त्याच्या बोलण्यावरून समजलें, व दर वर्षीं या दिवसांत तो घेनुकुंजची सफर करीत असे असेंहि त्याच्या सांगण्यांत आलें. सुधीरच्या जवळहि कांहीं तरी विक्रीचाच माल आहे व सुधीरहि कोणी तरी एक व्यापारी फिरस्ताच आहे अशी म्हाताऱ्याची समजूत झालेली दिसली व ती समजूत नाहींशी करण्याचा सुधीरनेंहि प्रयत्न केला नाहीं.

कारण एक तर आपल्या वास्तविक धंद्याहून भिन्न व्यवसायांतले आपण आहोंत असें लोकांकडून मानलें गेल्यास प्रवासांतल्या मजेंत एक और भर पडते हें सुधीरच्या चटकन लक्षांत आलें होतें; व शिवाय आपण व्यापारी आहोंत अशा समजुतीनें म्हाताऱ्याची चाललेली गमतीदार बडबड ती समजूत नाहींशी होतांच बंद पडेल अशी सुधीरला भीति वाटत होती.

त्यानें बोलतां बोलतां म्हटलें,

" पण बुढेमिया, तुमचा हा व्यापार किफायतीचा कसा काय होतो देव जाणे! हे गालिचे अन् रेशमी कापड इकडे आणतांना मूळ किंमतीच्या दुप्पट जकात भरल्यानंतर घेनुकुंजांत त्याच्यावर काय किफायत करणार तुम्ही ?—"

हें ऐकून म्हातारा खोल गद्गद आवाजांत हंसला व म्हणाला,

" आपको मालूम नही यार! देखो, (येथें त्यानें आवाज अगदीं हळू केला.) या इतक्या मालावर मी कधीं एक कवडीची जकात दिली असेल तर शपथ!—हं: हं:! अरे जकातहपीसराला बायको, पोरी असतातच कीं नाहीं!—त्यांच्यासाठीं मुंबईहून ऐन इंग्लिश फॅशनचीं ब्लाउझ शिवून आणलीं कीं—! बाबा, ये इलम अलग हय! हा: हा: हा:! "

फिरस्त्या व्यापाऱ्याचा पेशा करावा तर मुसलमानांनींच असें सुधीरचा

स्नेही हैदर नेहमीं म्हणत असे त्याची सुधीरला या वेळीं आठवण झाली, व तो कांहीं वेळ त्या वृद्ध स्वारीकडे कौतुकाच्या दृष्टीनें पहात राहिला.

मग तो त्याला म्हणाला,

" पण मियाजी, धेनुकुंजसारख्या छोट्याशा गांवीं तुम्ही अगदीं मुंबईहून मुद्दाम यावं इतकी विक्री होते ?——"

" नाहीं; वाटेंत पणजी, मार्मुगोवा अशीं ठिकाणं घेतोंच ना !——पण खास धेनुकुंजांतही माझी किफायत कांहीं थोडी नाहीं ठरलेली ! निदान इतके कमावून जातों मी एकट्या धेनुकुंजांतून ! " असें म्हणून म्हाताऱ्यानें आपल्या पांच बोटांची जुडी दाखविली.

भरपूर पांच बोटांनीं म्हाताऱ्यानें किफायतीचा आंकडा दर्शविलेला पाहून सुधीरला बरेंच नवल वाटलें, व अघळपघळ बाता मारणाऱ्या मुसलमानी स्वभावविशेषाचा हा एक दाखला असेल असेंही त्याच्या मनांत आलें. तो उघड म्हणालाही,

" आपल्याला खरं नाहीं वाटत बुवा तुमचं सांगणं. येवढं कुठलं गिऱ्हाइक आलं आहे धेनुकुंजांत ?——"

" गिऱ्हाइक ! " म्हातारा जरा ईर्ष्येनें बोलल्यासारखें म्हणाला, " छप्पन सटर फटर गिऱ्हाइकं मी कुठल्याही गांवीं पहातच नाहीं. सो सोनारकी एक, लुहारकी, ये हमारा कायदा हय ! धेनुकुंजांत दोन गिऱ्हाइकं अशीं आहेत कीं खास त्यांच्यासाठीं मुंबईहूनच काय खुद्द पर्शियाहून गालिचे पाठीवर घेऊन जावं."

" होय ?——"

" तर ! एक सय्यद अमीर. स्वारीला ऐन खुषीच्या वख्तावर गांठलं कीं वाटेल तेवढा सौदा पटवावा. तो तर बोलून चालून अमीराच्या अवलादीचा आहे म्हणा. पण दुसरं धेनुकुंजांतलं माझं गिऱ्हाइक आहे तें तर असं कीं अस्सल अवलादीचा अमीरही त्याच्यापुढं फिका पडावा ! "

" हं हं ?—कोण बुवा ? "

" उमरखान—बडा उमदा राजा आहे. अन् त्याची लडकी मीनाक्षी, तिला गालिच्यांचा अन् रेशमी कपड्याचा असा षोक आहे कीं कांहीं पुसूं नका ! तिच्या त्या षोकावर आजपर्यंत हजारोंची किफायत मीं केली असेल. अल्ला

उस्का भला करे ! अशी खुपसुरत अन् प्यार लडकी आहे !—माहीत आहे का तुम्हांला ?—"

त्याच्या बोलण्यांत झालेला तो मीनाक्षीचा उल्लेख ऐकतांच प्रयत्नानें शक्य तितके खालीं दडपलेले अनेक विचार एकदम पृष्ठभागावर येऊन सुधीरच्या मनाची अवस्था जरा विलक्षणच झाली. फुलझाडांच्या ताटव्यांत एखाद्या उधळलेल्या बैलाचें पाऊल पडतांच, तोंपर्यंत त्या ताटव्यांत असूनहि रंगसादृश्या-मुळें नजरेस न आलेलीं कितीक फुलपांखरें पंखांची मनोहर उघडझांक करीत उठलेलीं दिसावींत तसें त्यांच्या मनाचें झालें. मीनाक्षीविषयींचे जे जे विचार मनावेगळे करायचा त्यानें प्रयत्न केला होता ते सारे म्हाताऱ्याच्या एका वाक्यानें एकदम घोळका करून उठले.

वास्तविक, मेरीनें आपल्या आयुष्यांतील एक रहस्य सांगितल्यामुळें मदीना हॉटेलांतील आगीच्या प्रकाराचा व धेनुकुंजांतील कांहीं व्यक्तींचा संबंध असावा असा तर्क बांधल्यापासून, व धेनुकुंजला पुन्हां जावयाचें ठरविल्यापासून जर कोणते विचार सुधीरच्या मनांत अतिशय आवेगानें येऊं लागले असतील तर ते मीनाक्षीबद्दलचे. धेनुकुंजला आपलें पुन्हां जाणें घडेल व मीनाक्षी पुन्हां आपल्या दृष्टीस पडेल अशी खरें पाहतां सुधीरला कल्पनाहि नव्हती. धेनुकुंजहून मुंबईस परत आल्यानंतर असा एकहि दिवस गेला नसेल, कीं ज्या दिवशीं सुधीरला मीनाक्षीची दहापांच वेळां आठवण झाली नाहीं. समुद्रतीरावर त्यानें तिला पाठमोरी पाहिली होती तशी ती त्याच्या स्मृतिचक्षूंना वारंवार दिसे, चाप परत देण्यासाठीं तो उमरखानांच्या बंगल्यावर गेला होता त्या वेळीं त्याची व तिची अगदीं समोरासमोर दृष्टिभेट झाली तशीहि ती त्याच्या मनःचक्षूंना पुनः पुनः दिसे; व प्रत्येक वेळीं प्रत्यक्ष भेटीच्या वेळीं जितक्या स्पष्टपणें ती त्याला दिसली तितक्याच स्पष्टपणें आपणांस ती दिसत आहे असें त्याला वाटे. एखाद्या कृपणानें एकेक पैसा संचित करून ठेवावा व हजार वेळां त्या संचयांतील पैसा न् पैसा मोजीत बसावें, त्याप्रमाणें मीनाक्षीचें दोनदांच झालेलें दर्शन सुधीरनें आपल्या हृदयसंपुटांत सांठवून ठेवलें होतें, आणि स्मृतिनेत्रांपुढें मीनाक्षीची मूर्ति आली कीं तिच्या एकेका अंगोपांगाचें आणि एकेका हावभावाचें सौंदर्य आठवीत तो किती तरी वेळ घालवी. तिनें 'जेवर' अशी कुत्र्याला मारलेली हांक आत्तांच ऐकली असें त्याला दर वेळीं वाटे, तिच्या बोलण्याचा मधुर स्वर

आपल्या कानांत सारखा घुमतच आहे असा त्याला भास होई, आणि किती तरी वेळां तिचें तें सुरेल तानेसारखें भासणारें हंसणें प्रत्यक्ष ऐकल्यासारखें वाटून तो बावरून इकडे तिकडे पाही.

परंतु याप्रमाणें त्याला कितीहि आठवणी झाल्या तरी जें सौंदर्य आपल्याला एकदां योगायोगानेंच दिसलें व जें पुन्हां दृष्टीस पडण्याचा कांहींएक संभव नाहीं अशा सौंदर्याच्या त्या आठवणी होत हें सुधीर जाणून होता. किंबहुना त्या आठवणींच्या योगानें त्याला जें एक अवर्णनीय सुख होई त्यांत त्या आठवणी केवळ आठवणीच राहणार या कडू कल्पनेची थोडीशी सरमिसळ झालेली असे. उमरखानांच्या मुलीची व आपली पुन्हां भेट होईल असा यत्किंचितहि संभव त्याला दिसत नव्हता. तिचें नांवहि वास्तविक त्याला माहीत नव्हतें. मेरीनें जेव्हां आपला पूर्ववृत्तान्त सांगितला तेव्हां तिच्याकडून त्याला तें कळलें. सारांश, मीनाक्षीच्या आठवणी त्याला हजार वेळां होत हें जितकें खरें तितकेंच ती पुन्हां दृष्टीस पडण्याची आशा त्याच्या मनांत मुळींच नव्हती हेंहि खरें.

त्यामुळें धेनुकुंजला जावयाचा त्याचा बेत ठरला तेव्हां त्या योगायोगाचें त्याला मोठें नवल वाटलें. तो धेनुकुंजला निघाला होता तो इतरांच्या दृष्टीनें केवळ वर्तमानपत्राच्या कांहीं कामाकरतां. ब्राउनिंगसाहेबानें त्याची रवानगी केली होती ती मदीना हॉटेलमधील आगीचा कार्यकारणसंबंध धेनुकुंजांतील व्यक्तींशीं पोंचतो अशी त्याची खात्री पटली होती म्हणून. आणि केशवकाकांचीहि समजूत अशीच होती, कीं एका रहस्याचा उलगडा करतां यावा म्हणून सुधीर जात आहे.

परंतु धेनुकुंजला निघतांना स्वतः सुधीरच्या मनांत कामापेक्षां मीनाक्षी-बद्दलच्याच विचारांनीं अधिक गर्दी केली. त्याचें काम अशा स्वरूपाचें होतें, कीं सय्यद अमीरशीं ओळख करून घेणें त्याला भाग होतें. त्याविषयीं विचार करूं लागतांच त्याचें मन पुनः पुन्हां किंचित् बाजूला वळे आणि मीनाक्षीसंबंधींच कित्येक विचारतरंग त्याचें मन उठवीत. आपल्या मुक्कामांत उमरखानांशीं परिचय करून घ्यावयाची संधि आपल्याला सहजासहजीं मिळेल काय? मीनाक्षी पुन्हां आपल्या दृष्टीस पडेल काय? तिचा आपला थोडाफार परिचय होईल काय? आपल्याला ती ओळखील काय? तिला आपली आठवण राहिली असेल काय? तिचा आपला अधिक परिचय व्हावा यासाठीं आपल्याला कांहीं युक्ति करतां येईल काय?—समजा, तिला चित्रकलेचा नाद—

परंतु बहकणाऱ्या मनाच्या या कल्पना फारच पसरत चालल्या म्हणजे सुधीर त्यांना लगाम घाली व दुसऱ्या कशांत तरी मन गुंतवी. त्याच्या मनानें नानाविध कल्पनांचा पसारा मांडावा, आणि " छे ! काय हा वेडेपणा ! मीनाक्षी कोण अन् मी कोण ! " अशा कांहीं जाणिवेनें तो सबंध पसारा त्यानें उधळून द्यावा असें प्रवासांत किती वेळां झालें होतें त्याला गणतिच नाहीं.

पण लगामानें खेंचलेल्या या साऱ्या कल्पना त्या म्हाताऱ्या मुसलमानाच्या तोंडून मीनाक्षीचें नांव निघतांच पुन्हां एकदां भडकल्या, व मीनाक्षी आपल्या या मुक्कामांत प्रथम केव्हां दृष्टीस पडेल ? कशी दृष्टीस पडेल ? त्या वेळीं आपण काय बोललों तर आपल्याविषयीं तिचें मत चांगलें होईल ? मागच्या भेटींत आपण काय बरें तिच्याशीं बोललों ? त्या आपल्या बोलण्याची तिच्या मनावर अनुकूल छाप पडली असेल काय ? इत्यादि अनेक प्रश्नांचा तो मोठ्या औत्सुक्यानें मनांतल्या मनांत खल करीत राहिला. म्हाताऱ्याला कांहीं प्रत्युत्तर द्यावयाचें त्याला भानहि राहिलें नाहीं, व एकदोनदां विचारलें तरीहि सुधीर कांहीं बोलला नाहीं तेव्हां त्या वृद्ध मुसलमानानें त्याच्या त्या आकस्मिक स्तब्धतेचें मनाशीं आश्चर्य केलें आणि तोंड फिरवून व मान अर्धवट मोटारच्या बाहेर काढून विडीचे दोनचार जबर झुरके मारले.

सुधीर आपल्याच विचारांच्या तंद्रींत होता तों मोटारच्या चाकांतून गोळीबार व्हावा त्याप्रमाणें आवाज निघाला. ड्रायव्हरनें घाईनें ब्रेक दाबले त्यांचा कर्कश करकराट झाला आणि गाडी एकाएकीं थांबली.

सगळेच उतारू चमकले व " काय झालं ? " " काय हो ? " " काय रे बाबा ? " असे संमिश्र प्रश्न सगळ्यांनीं एकदम विचारले.

तेवढ्यांत ड्रायव्हर खालीं उतरला होता त्यानें म्हटलें,

" पंक्चर."

" हं ?—शाबास !—आतां ? " अशा अर्थाचे उद्गार सगळ्याच उतारूंनीं काढले; आणि पंक्चर दुरुस्त करायच्या उद्योगाची तयारी म्हणून ड्रायव्हरनें आपल्या अंगांतला मळकट खाकी कोट काढून स्टिअरिंगच्या चाकावर टाकला, व उतारूंपैकीं एकेकजण गाडीखालीं उतरून आळोखेपिळोखे देत गाडी धेनुकुंजला पोंचायला आतां फार रात्र होणार अशी आपापसांत तक्रार करूं लागले.

सुधीरहि हळू हळू उतरला, व दोनतीन फर्लांग चालत जाऊन रस्त्याच्या कडेला सुंदर हिरवळ होती तेथें प्रशस्तपणें बसला. तेथून हिंदोली नांवाचें गांव जवळच होतें, व गांवच्या या बाजूच्या सीमेकडची वस्ती तो जेथें बसला होता तेथपर्यंत भिडली होती. रस्ता उंचवट्यावरून गेला होता व जराशा खोलगटांत दोनतीन घरें सुधीरला दिसत होतीं. सूर्यास्त झाल्यासारखाच असल्यामुळें रस्त्यावर जरी अजून प्रकाश आहेसें वाटत होतें तरी खोलगटांतलीं तीं घरें अस्पष्टच दिसत होतीं, व त्यांच्या सभोंवारचीं उंच उंच झाडें तेवढीं, दुसऱ्याचे दोष माणसाला झटकन दिसतात त्याप्रमाणें नजरेंत भरत होतीं. पलीकडे रस्त्याच्या कडेला उगवलेलीं सदाफुलीचीं फुलें काढण्यांत दोन मुली गुंतलेल्या सुधीरला दिसल्या. त्या जुनीं, लांडीं चिटें नेसल्या होत्या, आणि त्यांच्या अंगांतल्या काचोळ्याहि मळकट दिसत होत्या. त्यांचे केशभार मात्र विपुल होते, आणि गोवा, कारवार या बाजूस दिसून येणारें स्त्रियांच्या अंगचें केश-विरचनेचें कौशल्य या मुलींनींहि संपादलें असल्याचें उघड दिसत होतें. त्या तोंडानें कांहींसें गाणें गुणगुणत होत्या आणि सदाफुलीवरचीं फुलें काढून लगेच त्यांचीं डेखांत डेखें अडकवून वेण्या तयार करण्यांत गुंतल्या होत्या. वेण्या तयार होतांच दोघींनीं त्या केशकलापावर चढविल्या, आणि आवाराबाहेर येऊन त्या गांवच्या देवीच्या देवळाकडे जाऊं लागल्या. त्या मुलींच्या काळ्या-भोर केशकलापावर सदाफुलीचीं पोंवळ्या रंगाचीं नाजुक फुलें मोठीं खुलून दिसत आहेतसें सुधीरला वाटलें, व या प्रान्तांत अगदीं गरीबगुरिबांच्या स्त्रियाहि केशचरनेंत मोठ्या निपुण असाव्या आणि केशभूषणें म्हणून फुलांचा उपयोग करण्याची त्यांना अमर्याद हौस असावी याबद्दल मनाशीं आश्चर्य करीत तो त्या मुलींच्या पाठमोऱ्या आकृतींकडे पहात राहिला. लवकरच त्या मुली कोंपऱ्यावर वळल्या व दिसेनाशा झाल्या. त्याच वेळीं देवळांत सूर्यास्ताच्या प्रहराचा नगारा वाजूं लागला, व खेडवळ अडाणी वाजंत्र्यानें फुंकलेल्या सनईचे बेसूर स्वर सुधीरच्या कानीं आले.

ड्रायव्हरनें तेवढ्यांत पंक्चरची दुरुस्ती केली होती व खालीं उतरलेल्या उतारूंना इशारा म्हणून त्यानें मोटारचें शिंग वाजविलें. तें ऐकून सारे उतारू गाडींत बसावयास गेले, सुधीरहि उठून गेला, आणि सगळी मंडळी नीट बसली अशी खात्री करून घेतांच ड्रायव्हरनें गाडी सुरू केली.

परंतु गाडी सुरू करतांच एक मोठी अडचण दृष्टोत्पत्तीस आली. अंधार पडूं लागला होता म्हणून ड्रायव्हरनें गाडीचे दिवे लावण्यासाठीं चावी फिरवली. पण दिवे कांहीं लागले नाहींत ! उजव्या हातानें गाडी चालती ठेवून ड्रायव्हरनें डाव्या हातानें त्या चावीशीं बरीच खटपट केली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

शेवटीं गाडीला एक ठेवणींतली शिवी हांसडून त्यानें गाडी थांबविली, व तो उतरला.

एंजिनवरचें झांकण काढून त्यानें कुठल्याशा बोलटांची घाईघाईनें उलट सुलट फिरवाफिरव केली, कुठेंशी ठोकाठोक केली, एक पान्हा टाकून दुसरा वापरून पाहिला, पण कांहीं केल्या जुळेना.

शेवटीं दिवे लागणें शक्य नाहीं असें ठरवून त्यानें तो नाद सोडून दिला, आणि हत्यारें जागच्या जागीं ठेवून हात झटकून आपल्या जागीं चढून गाडी सुरू केली.

उतारूंपैकीं एकानें विचारलें,

"आतां अशीच नेणार का गाडी ?"

"तर काय--" असें म्हणत ड्रायव्हरनें गाडीचा वेग आणखी वाढविला आणि शिंग जोरानें दावून वाजविलें.

"इथं ठीक आहे. पण मिऱ्या घाट चढून उतरायचा आहे अजून ! त्याचं कसं ?—"

"तुम्ही गप बसा उगच. मिऱ्या घाट खातो कीं काय ? हें थोडंसं चांदणं आहे तें पुरे झालं आपल्या गाडीला."

ड्रायव्हरच्या या आश्वासनानें उतारूंचें कांहीं फारसें समाधान झालें नाहीं. दिव्यावांचून मिऱ्या घाटांतून गाडी जावयाची या कल्पनेनें सगळ्यांच्याच छातींत धडधडत होतें. सुधीरचा नवा दोस्त, म्हातारा मुसलमान तर फारच अस्वस्थ झाला. तो ड्रायव्हरला सारखा "भाई आस्ते ! आस्तेसे भाई !" असें अगदीं गयावया करून म्हणत होता, आणि खिशांतली माळ काढून तिचे मणी जोराजोरानें ओढीत अल्लाचें नांव जपण्याचा त्यानें सपाटा लावला होता.

सुधीरला त्याच्या भयभीतपणाची गंमत वाटली. त्यानें तसें उघड बोलून म्हाताऱ्याला दुखविलें नाहीं. पण मनांतल्या मनांत त्याचा भित्रेपणा त्याला

वेडेपणाचा वाटत होता. कारण ड्रायव्हर आपल्या कामांत अतिशय वाकबगार होता यांत शंका नव्हती, आणि रस्ताही त्याच्या रोजच्या पाठान्तरांतला होता.

अर्ध्या तासानें गाडी भिऱ्या घाटांत शिरून एकेक वळणें घेत चढण चढूं लागली तेव्हां उतारूंचे भीतीचे उद्गार वाढूं लागले. सारखीं वळणें असल्यामुळें चांदण्याचा प्रकाश रस्त्यावर पडलेला नव्हता, व केवळ रोजच्या अदमासाच्या जोरावर ड्रायव्हर बेदरकार गाडी मारीत असलेला पाहून त्याचें तें करणें उतारूंना अधिकच भयप्रद वाटत होतें. पण चढण संपून घाटमाथ्यापर्यंत गाडी सुरक्षित आली तेव्हां ड्रायव्हरचा आत्मविश्वास वाजवी आहे अशी सुधीरची पुरती खात्री पटली. घाटमाथ्यानजीक ज्या जागेवर त्यानें, काकांनीं व सकीनानें मिळून एक दिवस अतिशय मजेंत घालविला होता ती जागा पहावयासाठीं म्हणून त्यानें खिडकीबाहेर डोकावून मान वांकविली. ज्या वृक्षाखालीं त्यांनीं त्या दिवशीं वनभोजन केलें होतें तो वृक्ष तेवढा सुधीरला दिसला, व गाडी पहिलें वळण घेऊन उतरेपर्यंत तो मोठ्या कौतुकानें त्या वृक्षाकडे पहात राहिला. वृक्ष दिसेनासा झाल्यावर तो मान आंत घेत होता इतक्यांत—

चारपांच उतारू एकदम ओरडले,

" ओहो, वाघरू! वाघरू!—"

त्याच क्षणीं गाडी एकाएकीं दरीच्या बाजूला खूपशी वळल्यासारखें सुधीरला वाटलें, दुसऱ्याच क्षणीं तितक्याच वेगानें गर्रदिशीं गाडी उलट दिशेला, डोंगराच्या कडप्याकडे, वळल्यासारखें त्याला स्पष्ट दिसलें, आणि लगेच " धडाड् धाड् " असा गाडी कशावर तरी आपटल्याचा आवाज त्यानें ऐकला, उतारूंच्या किंकाळ्याही त्याच्या कानांत शिरल्या व हें आहे तरी काय असें तो स्वतःला विचारीत आहे इतक्यांत त्याची टाळू वरच्या टपावर खाड्दिशीं आपटून डोळ्यांपुढें हजारों ठिणग्या फुलल्यासारखें त्याला वाटलें, व " अयाई!—" असा आर्तस्वर त्याच्या तोंडून बाहेर पडून तो बेशुद्ध झाला.

# प्रकरण १५ वें

## पाहुणचार



मीनाक्षीचे गायनशिक्षक रोजच्या क्रमाप्रमाणें सकाळीं नवाच्या सुमारास उमरखानांच्या बंगल्यांत येऊन पोंचले, व व्हरांड्या-च्या पायऱ्या चढून दिवाणखान्याच्या बाजूला वळले.

पण रोजच्याप्रमाणें दिवाणखान्याचा दरवाजा उघडा नव्हता.

दरवाजा बंद असलेला पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें, व ते तेथेंच थबकले.

इतक्यांत एक नोकर पलीकडे होता तो जवळ आला व खांसाहेबांना अद-बीनें बंदगी करून म्हणाला,

" मालकांनीं आपल्याला सांगायला सांगितलं आहे, कीं आज गाण्याची तालीम तिकडे पलीकडच्या कमऱ्यांत ( खोलींत ) घ्यावी."

" असं ?—कां रे ? "

" काल रात्रीं कोणी मैमान ( पाहुणे ) आले, अन् ते आले तेच फार बीमार आले. दिवाणखान्यांतच त्यांची निजण्याची व्यवस्था केली काल घाई-घाईत. "

" मैमान आये हुवे हय ?—और वो बहोत बीमार हय ?—कौन मैमान ? और मालिक कब आये ? कल रात ?—" याप्रमाणें खांसाहेबांनीं आश्चर्यानें प्रश्नामागून प्रश्न विचारले.

नोकर म्हणाला,

" मालिक काल रात्रीं हिंदोलीहून आले तेच या मैमानाला घेऊन आले. काल म्हणे भिऱ्या घाटांत मोटारचा बडा मोठा अपघात झाला अन् त्यांत याला फार लागलं. त्या मोटारच्या मागून मालकांची गाडी आली अन् या इस-माची अवस्था पाहून त्यांनीं त्याला आपल्या गाडींत घालून बंगल्यावरच आणलं. "

" अस्सं " असें मनाशीं पुटपुटत खांसाहेब तेथून खोलीकडे जाऊं लागले.

पण खांसाहेब श्रोत्याखातर मिळाल्यावर तो नोकर आपलें वक्तृत्व तेवढ्यावरच थांबवील हें शक्यच नव्हतें. तो पुढें म्हणाला,

"काल रात्रींची ती धांदल कांहीं विचारूं नका. मालिक आले ते नुसते घाबरलेले. तो इसम शुद्धीवर नव्हता त्याची त्यांना फार चिंता वाटत होती. त्यांनीं आल्याक्षणीं भराभर हजार हुकूम सोडले. साऱ्या नोकरांची तारांबळ उडून गेली. मीनासाहेबान अन् जुबी झोंपेंत होत्या त्यांना तेवढं कुणी उठवलं नाहीं. बाकी सबंद बंगला खडा झाला होता. डिसूझा डागदराकडे मोटार पाठवली, पण तो दारूनं बेहोष होऊन नायकिणीकडे पडला होता. तें समजतांच मालिक संतापानं काय काय बोलले. त्याची सरकारी इस्पितळावरची नोकरी आतां जाते बघा. मग नुक्ता मुंबईहून डागदरी शिकून आलेला डिक्रूझशेटचा तरणा पोरगा नाहीं का? त्याच्याकडे गेली मोटार अन् तो आला. पहांटे चार साडेचारपर्यंत तो सारखा बसूनच होता. मालिकहि सारखे बसून होते पाहुण्याच्या अंथरुणाशीं. पांचाच्या सुमाराला डागदर गेला इथून अन् मालिक झोंपायला गेले; अन् जाण्यापूर्वीं त्यांनीं मुनशीला बजावून सांगितलं, कीं सकाळीं पहिली गोष्ट डॉ. अस्लमना तार करून बोलवा. मला वाटतं बांदेषहून डॉ. अस्लम संध्याकाळपर्यंत खास येतील."

"हं?—मैमान तरी कोण आहे हा?—"

"खुदा जाने!—मुंबईकडला आहे म्हणून मोटारड्रायव्हरनं सांगितलं म्हणे. तरणा बांड दिसतो आहे, अन् मोठा खुपसूरत आहे!—"

"होय?—" असें म्हणून विस्मय दर्शविण्यासाठीं आपल्या दाढीचें झुपकेदार टोंक खांसाहेबांनीं डाव्या मुठीनें चोळवटलें, व फरशीवर हातांतली शिशवीची काठी चाळविली.

मग खांसाहेब खोलीकडे गेले, आणि बातमी सांगण्याची हौस फिटल्यामुळें समाधान पावलेला नोकरहि आनंदभरानें आपल्या कामाला गेला.

ज्या पाहुण्याला घेऊन उमरखान काल रात्रीं आले होते त्याचें नांवगांव त्या नोकराला माहीत नसलें तरी वाचकांनीं तो पाहुणा कोण तें ओळखलेंच असेल. तो सुधीर होता.

या वेळीं दिवाणखान्यांत उत्तरेच्या बाजूला मांडलेल्या एका पलंगावर त्याला स्वस्थ झोंप लागली होती.

मोटारच्या अपघातांत त्याला कोठें खोल जखम झाली होती असें नव्हे. त्याचे दोन्ही खांदे बरेच खरचटले गेले होते तेथें काय थोडा रक्तस्राव झाला असेल तेवढाच. परंतु त्याची टाळू मोटारच्या टपाला आपटली होती तो मार जबर बसला होता, व तेथें जरी खोंचबीच पडली नव्हती—ती पडली नव्हती याचें सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटत होतें—तरी त्या माराचा मेंदूवर बराच परिणाम झाला होता. अपघाताच्या वेळीं मुळीं तो तत्क्षणीं बेशुद्धच पडला होता. कोणाला किती लागलें किंवा मोटारचें पुढें काय झालें याची त्याला कांहींच शुद्धि नव्हती. हिंदोलीला उमरखान त्या दिवशीं कांहीं कामानिमित्त गेले होते त्यांची मोटार सुमारें अर्ध्या तासानें आली, त्यांनीं अपघाताच्या जागीं थांबून सर्वांची नीट चवकशी केली, व बाकीच्या उतारूंना अगदींच किरकोळ जखमा झाल्या असून या एका माणसालाच तेवढें फार लागलें आहे व तो बेशुद्धींत आहे असें दिसतांच त्यांनीं त्याचें सामान वगैरे घेऊन त्याला आपल्या गाडींत घालून धेनुकुंजला आणलें; परंतु स्वतः सुधीरला यांपैकीं एकहि गोष्ट समजली नाहीं. डिक्रूझ डॉक्टरनें त्याच्यावर एकसारखे उपचार केल्यावर सुमारें दीडदोन वाजतां तो किंचित् शुद्धीवर आला होता, व त्यानें दोनतीन मिनिटें डोळे उघडले होते. तें पाहून डॉ. डिक्रूझ म्हणाला होता,

"छान !—आतां निदान भलती काळजी टळली !"

त्या आश्वासनानें उमरखानांना जीव खालीं पडल्यासारखें झालें. केवळ त्याच्या सामानावर लिहिलेल्या 'मुंबई' या पत्त्याखेरीज जरी त्यांना सुधीरची कांहींच माहिती नव्हती तरी तो कोणी तरी चांगला कुलीन व सुशिक्षित तरुण असला पाहिजे येवढा अदमास त्यांनीं सहज केला होता, व असा एक तरुण अपघातांत सांपडावा व त्याची शुद्धि नाहींशी व्हावी ही त्यांना मोठी दुःखाची गोष्ट वाटत होती. डॉक्टरी इलाज ताबडतोब व्हावेत म्हणून त्यांनीं आटापीट केली होती, व आपल्या धडपडीला यश येऊन सुधीर शुद्धीवर आला व त्यानें दृष्टि उघडली हें पाहतांच त्यांना मोठा आनंद झाला.

सुधीरनें डोळे उघडले, पण त्यानें त्या वेळीं भोंवतालच्या व्यक्तींकडे किंवा वस्तूंकडे पाहिलें असें म्हणतां येणार नाहीं. शुद्धीवर आलेल्या माणसाच्या ओंठांची चाळवाचाळव होते, किंवा नाकपुड्यांची हालचाल होते त्यांपैकींच त्याच्या डोळ्यांचें तें उघडणें होतें. त्या दृष्टींत त्याच्या चित्‌शक्तीचें तेज मुळींच नव्हतें.

आणि शिवाय त्याचे डोळे दोनतीन मिनिटें उघडे राहिले असतील नसतील तोंच त्याच्या मस्तकांतून एक असह्य शिणीक आली, व त्यानें "हाऽऽय!" असें कण्हून जे पुन्हां डोळे मिटले ते पंधरावीस मिनिटें उघडलेच नाहींत.

त्यानंतर दोनदां असाच प्रकार झाला. पण सुधीरला जरी अशी जबरदस्त ग्लानि पुन्हां पुन्हां येत होती तरी त्याची बेशुद्धीची अवस्था नाहींशी झाल्या-मुळें डॉक्टरला औषधाचे दोन डोझ त्याच्या पोटांत घालतां आले, व त्यांमुळें पुष्कळच फायदा होईल असा डॉक्टराचा अदमास होता.

म्हणूनच पांच वाजतां डिक्रूझनें सुधीरला तिसरा डोझ दिला व उमरखानांस म्हटलें,

"आतां याला पांचसहा तास झोंप लागेल. आतां मी जातों. आपणहि आतां निजायला मुळींच हरकत नाहीं."

डॉक्टरचा तो अदमास खरा ठरला व तेव्हांपासून सुधीरला जी झोंप लागली ती अगदीं गाढ होती.

बाहेर व्हरांड्यांत खांसाहेबांचें व नोकराचें जें बोलणें झालें त्यानंतर सुमारें पाऊण तासानें सुधीर त्या गाढ झोंपेंतून जागा झाला. त्यानें डोळे उघडले, पण ते उघडतांना त्याला असें वाटलें कीं जणूं आपल्या पापण्या कोणी तरी सीलबंद करून झांकल्या आहेत. तो आतां पूर्ण शुद्धीवर होता त्यामुळें ज्या श्रीमंती शय्येवर तो निजला तिचा सुखकारक स्पर्श त्याला डोळे उघडण्याच्याहि पूर्वी समजला. एखाद्या पक्ष्याचें ऊबदार घरटें असावें तशी ही शय्या मऊ मऊ आहेसें त्याला वाटलें. त्याच्या शारीरिक वेदना आतां पहिल्याइतक्या तीव्र नव्हत्या. पण शिवाय त्या वेदनांची जाणीव या शय्येच्या सुखदायक स्पर्शानें कमी होत आहे असें सुधीरला स्पष्ट वाटलें. मंचकावरच्या उंची गाद्यांनीं आपलें शरीर जणूं अलगद झेलून धरलें आहे, आणि ज्या पांचसहा मऊ उशांच्या ढिगांत त्याचें मस्तक टेंकलें होतें त्या तर जणूं आपणांस थोपटून शान्त करीत आहेत असा सुधीरला भास झाला; व त्या अनुभवाचें त्याच्या मनाला मोठें आश्चर्य वाटलें.

मोटार वांकडीतिकडी धांवली व डोंगराच्या कडप्यावर आपटली आणि आपल्या मस्तकाला जबर मार बसला येवढें त्याला आठवलें. परंतु——

परंतु या सुखशय्येवर आपण कसे आलों?——आणि हें ठिकाण तरी कोणचें?——

या तीव्र विस्मयामुळें त्यानें डोळे अतिशय जडावले होते तरी प्रयत्नानें उघडले व इकडे तिकडे नजर टाकली.

त्याला ती जागा एखाद्या दिवाणखान्यासारखी प्रशस्त व शृंगारलेली दिसली. बहुतेक खिडक्यांचे पडदे ओढून घेतल्यामुळें तेथें प्रकाश फारसा नव्हता. पण त्या अंधुक प्रकाशांतहि दिवाणखान्याच्या शृंगाराची श्रीमंती स्पष्ट दिसत होती. एकदोन खिडक्यांचे पडदे वाऱ्याच्या झोताबरोबर पुनः पुन्हां फुगत आहेत व चपटे होत आहेत असें त्याला दिसलें, व तितक्यांत त्या खिडक्यांच्या दिशेनें समुद्राच्या लाटांचा आवाज ऐकूं आला त्यावरून हा बंगला समुद्राच्या नजीक असला पाहिजे असें त्याला वाटलें. दिवाणखान्याचें मुख्य दार बंद दिसत होतें, पण आंतल्या अंगाला दाराच्या दोन्ही बाजूंना दोन छोटे संगमरवरी सुंदर पुतळे—

ते पुतळे दिसतांच सुधीरला एक आठवण झाली, व चपापून आपली ही आठवण बरोबर आहे कीं नाहीं याचा त्यानें जोरानें विचार केला.

आपली आठवण बरोबर आहे असें त्याला वाटलें. मीनाक्षीचा चाप परत द्यावयासाठीं जेव्हां तो आला होता तेव्हां दाराच्या आंतल्या बाजूचे हे दोन पुतळे त्याला ओझरते दिसले होते—

म्हणजे ?—आपण मीनाक्षीच्या बंगल्यांत आहोंत ?—हें घडलें कसें ?—मिऱ्या घाटांतल्या अपघातानंतर आपण येथें कसे आलों ?

छे ! इतका विलक्षण योगायोग शक्य नाहीं !—

हें कदाचित् स्वप्न तर नसेल ?

किंवा भ्रम ? तापाच्या जोरांत माणसाला विचित्र दृश्यें दिसतात त्यांपैकीं तर हें नसेल ?

सुधीरनें आपलाच हात चाचपून पाहिला, पण त्याला ताप लागला नाहीं.

मग हा भ्रम नव्हे तर !—आणि स्वप्नहि नव्हे !

आश्चर्यानें अतिशय थक्क होऊन तो तसाच वरच्या रंगीबेरंगी छताकडे पहात पडला. अपघातानंतर काय काय घडलें तें आठवण्याचा त्यानें शिकस्तीचा प्रयत्न केला, पण त्याला कांहींसुद्धां आठवेना. मग त्यानें तो नाद सोडून दिला, व हें कसें घडलें तें कळेल आपल्याला लवकरच असें म्हणून स्वतःचें समाधान मानून घेतलें. मात्र या प्रकाराचा उलगडा करण्यापासून जरी त्यानें आपलें मन परावृत्त केलें तरी त्याच्या अद्भुतपणाविषयीं विचार करण्यांत त्याचें मन गुंतलेंच. ज्या

मीनाक्षीची व आपली भेट तरी होईल कीं नाहीं अशा शंकेंत आपण होतों तिच्या घरांतच असें आपण अकल्पित येऊन पडावें याचें त्याला राहून राहून विलक्षण आश्चर्य वाटलें, व एखाद्या आश्चर्यकारक घटनेचें आश्चर्य करीत बसण्यांतच माणसाला कधीं कधीं एक अवर्णनीय आनंद होतो तो अनुभवीत सुधीर शय्येवर पडून राहिला.

तसा तो कांहीं वेळ पडला असेल तोंच कोठून तरी जवळच्याच खोलींतून अतिशय कर्णमधुर गायनाचे आलाप ऐकूं येत आहेत असा त्याला भास झाला. त्यानें एकाग्र चित्तानें कानोसा घेतला तेव्हां ते आलाप त्याला अधिक स्पष्ट ऐकूं आले, व त्या आलापांच्या अवर्णनीय माधुर्यानें त्याच्या सर्वांगावर एकदम रोमांच उभे राहिले. निदाघकालीं आकाशांतून कारंज्याच्या फवाऱ्यासारखे शीतल तुषार अंगावर पडतांच उठाव्या तशा सुखलहरी त्याच्या अंतःकरणांत उठल्या.

मीनाक्षीच गात असली पाहिजे याविषयीं त्याला यत्किंचितहि शंका वाटली नाहीं. त्यानें तिचें बोलणें फार वेळां ऐकलें होतें असें नव्हे. पण दोनच वेळां ऐकलेला तिचा शब्द त्यानें आपल्या स्मृतिसंपुटांत अगदीं प्रेमानें जतन केला होता. समुद्रकांठीं ती त्याला प्रथम दिसली तेव्हां तिचें हास्य त्याला गाण्याच्या मधुर लकेरीसारखें वाटलें होतें; आत्तां तिचें गाणें त्याला एखाद्या वनदेवतेच्या मुग्ध, मोहक हास्याप्रमाणें वाटलें. ज्या कंठांतून त्या हास्यलहरी निघाल्या त्याच कंठांतून या नादलहरी निघत होत्या याबद्दल सुधीरला यत्किंचितहि संदेह वाटला नाहीं ! मीनाक्षी समोर दिसली असती तर ज्या आतुरतेनें तिच्या मोहक सौंदर्यावर त्याचे डोळे लुब्ध होऊन खिळले असते त्याच आतुरतेनें तिच्या कंठांतून निघणारें व हवेंतून तरंगत अस्पष्ट स्वरूपांत ऐकूं येणारें गायन ऐकत तो स्तब्ध पडला. त्या स्वरमाला ऐकत असतां त्याचें अंतःकरण इतकें उल्लसित झालें, कीं जणूं आपल्या सर्वांगावर सहस्र अमृतधारांचें अखंड सिंचन होत आहे असें त्याला कांहीं काळ वाटलें !—

परंतु तें सिंचन फार वेळ टिकलें नाहीं.

कारण तिचें गाणें बंद झालें, व तिच्या गाण्याच्या वेळीं मधून मधून ऐकूं येणारें कोणा तरी पोक्त शिक्षकाचें मंद्र स्वरांतील गाणेंहि थांबलें. मीनाक्षीचे शिक्षक कांहींसे बोलले व त्यावर मीनाक्षी मोठ्यांदा हंसली तें सुधीरला ऐकूं आलें, मग किंचित्काल त्याच्या कानीं कसलाच शब्द आला नाहीं, व नंतर

व्हरांड्यांत पावलांची चाहूल झाल्यासारखें त्याला वाटलें तेव्हां मीनाक्षीच्या पायांतील सपातांचा फरशीवर झालेला विवक्षित आवाज त्यानें ताबडतोब ओळखला. ती आतां कदाचित् दिवाणखान्याचें दार उघडून आंत येईल कीं काय अशी कल्पना सुधीरच्या मनांत आली त्याबरोबर तिनें यावें व तिनें येऊं नये अशी एक विचित्र दुहेरी इच्छा त्याच्या अंतःकरणाला झटकन शिवून गेली, व कांहीं एका विचित्र, अस्पष्ट सुखाचा त्याला क्षणभर अनुभव आला. ती आंत आलीच तर आपण डोळे उघडे ठेवून शय्येवर पडलों आहोंत असें तिला न दिसावें असें वाटून त्यानें आपले डोळे मिटून घेतले.

पण ती आंत आली नाहीं. उलट, तिला पाहतांच पलीकडे कोठें तरी सांखळीला बांधलेला जेवर मोठमोठ्यानें भुंकूं लागला होता त्याला उद्देशून,

"हां हां! जेवर! बस्! किती भुंकायचं रे! आलेंच! सोडेतें अं तुला—"

असें म्हणून ती लगबगीनें तिकडे गेल्याची चाहूल सुधीरला ऐकूं आली, व त्यानंतर तिचा शब्द ऐकूं येईनासा झाला.

तिचें बोलणें किंवा तिची चाहूल कानांवर येईल अशा आशेनें एकाग्र चित्त करून सुधीर किती तरी वेळ पडून राहिला. पण त्याची निराशा झाली.

ही त्याची निराशा नंतरच्या तीन दिवसांत वाढतच गेली.

त्याचें मन सारखें मीनाक्षीच्या दर्शनासाठीं भुकेलेलें होतें, परंतु तीन दिवसांत तिचें त्याला दर्शन घडलें नाहीं. मीनाक्षी पडदा पाळीत नाहीं व परकी पुरुषाशीं बोलण्याइतकें तिला वागणुकीचें स्वातंत्र्य आहे हें त्याला अनुभवानें माहीत झालें होतें. त्यामुळें तिनें एकटीनें मुद्दाम दिवाणखान्यांत यावें हें जरी शक्य नसलें तरी खानसाहेब व खानसाहेबांची तार पोंचल्यावर तांतडीनें आलेले डॉ. अस्लम आपल्याशीं बोलत बसले असतांना ती येण्याचा संभव आहे असें सुधीरला फार वाटत होतें. ही तीव्र आशा मनांत सतत असल्यामुळें खानसाहेब व डॉ. अस्लम यांच्याशीं बोलतांना कित्येक वेळां त्याचें चित्त त्यांच्या बोलण्याकडे राहण्याऐवजीं दूर खोलींत चाललेल्या मीनाक्षीच्या वावरण्याकडे किंवा ती कोणाशीं तरी बोलत असली कीं त्या वेळचा तिचा शब्द ऐकण्याकडे लागलेलें असे; आणि अनवधानानें तो खानसाहेबांच्या किंवा डॉ. अस्लमच्या प्रश्नास उत्तर देण्याऐवजीं शून्य दृष्टीनें समोरच्या भिंतीकडे पहात स्तब्ध राही.

डॉ. अस्लमना आणि खानसाहेबांना तें त्याचें अनवधान पाहून वाटे कीं त्याच्या तब्येतीला पडावा तेवढा आराम अजून पडलेला नाहीं. त्याला विशेष कोठें जखम झालेली नव्हतीच, आणि डिक्रूझ डॉक्टरनें दिलेल्या औषधाचा बराच चांगला परिणाम झाला होता. त्यामुळें डॉ. अस्लमनीं जेव्हां येतांच त्याची तपासणी केली व त्याच्या मेंदूवर झालेल्या आघाताच्या दुष्परिणामा-वरच मुख्यतः औषधयोजना केली पाहिजे हें ओळखून उपचार सुरू केले तेव्हां सुधीरला भराभर आरामच पडत गेला. तथापि त्याची तब्येत अजून पुरी बरी झाली नव्हती हें उघडच होतें, व त्यामुळें सुधीरकडून वारंवार होणारा अनव-धानाचा प्रमाद डॉ. अस्लमना किंवा खानसाहेबांना साहजिकच वाटे.

त्याच्या अनवधानाच्या खऱ्या कारणाची शंका येण्याऐवजीं तें पाहून खान-साहेबांस उलट मनांतल्या मनांत अधिकच चिंता वाटे व ते डॉ. अस्लमकडे वळून म्हणत,

" डॉक्टर, यांच्या आरामाला विलंब लागूं नये म्हणून माझ्या हातून आणखी कांहीं होण्यासारखं असेल तर मला अवश्य सांगा. आमच्या घरीं यांना हवी तितकी शान्तता मिळत नाहीं; मधेंच मोटार वाजते, किंवा कितीहि ताकीद दिली तरी एखादा नोकर जवळपास मोठ्यांदा बोलतो, किंवा जेवर भुंकतो. हें मला कळतं, पण—"

तें ऐकतांच सुधीर म्हणे,

" वा, वा ! खानसाहेब, काय हें भलतंच आपलं बोलणं ! इथल्या व्यवस्थेंत कसूर आहे असं कोण म्हणेल ? माझ्या आईबापांनीं घेतली असती त्याहून आपण जी माझी काळजी घेतलीत ती रतिभरहि कमी नाहीं. मला पुनर्जन्म मिळाला तो आपल्या—"

" नही नही ! वो खुदाकी रहेम ! " असें म्हणून खानसाहेब मोठा भक्ति-भाव दर्शविणारी मुद्रा करीत व वर आकाशाकडे दाखविल्यासारखा हात उचलीत.

खानसाहेबांचा तो प्रेमळ आणि श्रद्धाळू स्वभाव पाहून सुधीरला त्यांच्या-विषयीं वाटूं लागलेली कृतज्ञता व आदर वाढत असे; आणि डॉ. अस्लम यांच्याहि स्वभावांतील माधुर्य त्याला दोनअडीच दिवसांच्या थोड्याशा सह-वासांतहि पूर्ण पटलें होतें यांत संशय नाहीं. त्यांचा दोघांचा सहवास त्याला आनंददायक वाटे, व त्यांचें संभाषणहि त्याला प्रिय वाटे. परंतु काय

असेल तें असो, त्यांच्याशीं बोलतांनाहि त्याचें मन स्वस्थ नसे येवढें खरें. मीनाक्षीचा गोड शब्द कोठून ऐकावयास येईल काय तें शोधण्याचा चाळा त्याचें मन करीत राही.

चवथ्या दिवशीं डॉ. अस्लमनीं सुधीरला सांगितलें कीं दिवाणखान्यांतल्या दिवाणखान्यांत हिंडायला, इतकेंच नव्हे तर ताकद वाटली तर व्हरांड्यांत-देखील हवा खात येरझारा घालायला हरकत नाहीं. पण स्वतः सुधीरला कांहीं फारसें उठावें फिरावें असें वाटत नव्हतें. त्यामुळें रोजच्या क्रमाप्रमाणें चार वाजतां डॉ. अस्लम व खानसाहेब आपल्याजवळ येऊन गप्पा मारीत व नंतर बुद्धिबळाचा डाव टाकून बसतील अशा अपेक्षेनें तो अंथरुणावर पडूनच राहिला होता. पण चार वाजले, साडेचार वाजून गेले, पांच वाजायला आले तरी त्या दिवशीं खानसाहेब व डॉ. अस्लम आले नाहींत तेव्हां सुधीर कंटाळला; व नंतर ते दोघे दुपारीं तीन वाजतांच सय्यद अमीरकडून निरोप आल्यामुळें कामाला गेले आहेत असें जेव्हां एका नोकरानें सांगितलें तेव्हां त्याला वाटलें, असें अंथरुणावर पडून राहण्यापेक्षां जरा उठावें. त्यानें बाहेर व्हरांड्याकडे दृष्टि टाकली तों सूर्यप्रकाशाचा लाल, तिरपा झोतच्या झोत सगळीकडे पसरला होता, व बंगल्याच्या आवारांतल्या नारळी "ये, बाहेर ये! बघ तरी शोभा!" असें म्हणून पल्लवकरांनीं बोलावीत होत्या.

तें पाहतांच तो उठला व हलके हलके चालत जाऊन व्हरांड्यांतील एका खुर्चीत बसला.

त्यानें समोर पाहिलें तों बंगल्याच्या आवारांतील शेकडों नारळींच्या फांद्यांच्या असंख्य फटींतून पश्चिमेला उसळलेला तप्तसुवर्णरंगाचा कल्लोळ धडाडलेला दिसत होता, आणि साऱ्या सृष्टीवर त्या कल्लोळाच्या ठिणग्या उडाल्यासारखें भासत होतें. नारळीच्या काळसर, हिरवट फांद्यांच्या झुपक्यांना प्रकाशाच्या लाल, सोनेरी मुलाम्यानें कांहीं एक अवर्णनीयच शोभा आली होती, आणि झाडांच्या मंद हेलकाव्यांमुळें त्यांच्यांतील फटी मागेंपुढें अशा बदलत त्यामुळें जणूं क्षितिजावरच्या दीप्तिसागरावर लाटा उसळल्यासें वाटत होतें.

आज तीन दिवस जवळ जवळ बंदींतच घालविल्यामुळें सुधीरच्या दृष्टीला क्षीण प्रकाशाची संवय झाली होती, व तें तेजोमय दृश्य पाहतांच त्याचे डोळे

एकदम दिपून गेल्यासारखे झाले. मात्र त्या दिपून जाण्यांतहि त्याच्या दृष्टीला विलक्षण सौख्य वाटलें व तो त्या देखाव्याकडे किती वेळ तरी पहात राहिला.

तो तसाच स्वस्थ बसला असतां कांहीं वेळानें त्याचें लक्ष एकाएकीं चाळवलें गेलें.

त्याच्या डावीकडच्या व्हरांड्यांतून जेवर उड्या मारीत, धांपा टाकीत व गळ्यांतल्या पट्ट्याला लागलेली सांखळी तशीच फरपटत ओढीत आला. एकदां त्यानें थबकून कान उभारून मागें वळून पाहिलें व त्याच क्षणीं मीनाक्षीनें तिकडून

" जेवर ! "

असें दरडावून बोलावतांच त्यानें गुरगुरल्यासारखें केलें, आणि " येत नाहीं जा ! " अशा अर्थाचा मानेला हिसडा देऊन तो पुन्हां पळूं लागला.

सुधीर दृष्टीस पडतांच जेवर पुढें पळत जाण्याऐवजीं त्याच्याजवळ आला, व त्यांचीं पावलें चाटीत शेपटीचें टोंक हालवीत सुटला.

आपला यत्किंचितहि परिचय नसतांना जेवरनें आपल्याशीं अशी सलगी दाखवावी याचें सुधीरला अतिशय आश्चर्य वाटलें. पण त्या आश्चर्यापेक्षां जेवरच्या सुबकपणाचें कौतुक करण्याचीच त्याला प्रबळ इच्छा झाली, व उजव्या हातानें पुनः पुन्हां चुटक्या वाजवीत आणि तोंडानें कुत्र्यांना प्रिय वाटणारा शब्द करीत त्यानें जेवरला मोठ्या प्रेमानें थोपटलें.

पण तितक्यांत

" जेवर !—उल्लूके बच्चे—देख—" असें कांहीं रागारागानें म्हणत जुबेदा लगबगीनें आली व तिचा शब्द ऐकतांच जेवर उसळी मारून निघाला.

मात्र सुधीरनें त्याला पट्ट्यांत बोट घालून घट्ट धरून ठेवलें.

व्हरांड्यांत कोणी परकें माणूस असेल अशी कल्पनाहि नसल्यामुळें जुबेदा आली ती धांवतच आली होती.

सुधीर दृष्टीस पडतांच ती चपापली व ओढणी सांवरीत ती झटकन् परत जायच्या बेतांत होती—

इतक्यांत सुधीरची तिला ओळख पटली व ती थबकली.

किंचित् हंसून ती म्हणाली,

" म्हणजे आज तीन दिवस आपणच का आमच्या बंगल्यांत—"

सुधीर म्हणाला,

" होय—आपण माझी ओळख ठेवलीत हें केवढं माझं भाग्य—-"

" नही !—उस्में क्या ?—-" असें कांहींसें जुबेदानें म्हटलें.

मग कांहीं वेळ दोघेंहि स्तब्ध राहिलीं आणि नंतर जेवरला पुढें करीत सुधीर म्हणाला,

" धरा याला, न्या."

जुबेदानें जेवरची सांखळी हातीं घेतली, व ती परत वळली. तसें वळतांना सुधीरला उद्देशून " अच्छा " असा शब्दहि तिनें हंसत अर्धवट उच्चारला. पण लगेच तिनें तो अपुराच सोडला, तिनें जणू कांहीं मनाशीं कांहीं तरी योजल्याप्रमाणें तिची भुवई हालली व खालचा ओठहि हालला, आणि परत जाण्याऐवजीं मोठ्यानें ओरडून ती म्हणाली,

" मीना ! मीनाऽऽ ! तूं इकडे ये बाई ! हा मेला जेवर मला नाहीं दाद देत ! ये ना ! लवकर ये ! मीना—"

तिचें हें करणें सुधीरला मोठें चमत्कारिक वाटलें. जेवर सांपडत नाहीं असा बहाणा ही कां करीत आहे याविषयीं त्याच्या मनाचा क्षणभर गोंधळ उडाला.

पण लगेच जुबेदाचा हेतू त्याच्या लक्षांत आला व तो येतांच त्याच्या सर्वांगाला कांहीं एका अवर्णनीय संवेदनेचा स्पर्श झाला.

तितक्यांत

" हां हां !—बताव मुझे वो मस्तवाल कुत्ता—"

असें कांहींसें म्हणत मीनाक्षी तेथें आली.

ती येतांच सुधीर खुर्चीवरून उठला आणि सहास्य मुद्रेनें त्यानें तिच्याकडे नजर टाकली.

मीनाक्षी चपापली, थबकली, गोंधळली. आपला संभ्रम आवरून व धांवतांना अस्ताव्यस्त झालेला पदर नीट करून तिनें हंसत सुधीरकडे कसें पाहिलें तें तिचें तिला माहीत.

जुबेदाचें करणें आपल्याला आवडलें नाहीं असें दर्शविण्यासाठीं तिनें " जुबी ! काय हें ? " अशा अर्थानें कपाळाला आठी घालून तिच्याकडे पाहिलें; पण लगेच मान वळवून तिनें सुधीरकडे पाहिलें तों तिच्या मोहक चेहऱ्यावर हर्षाचा लाडका भाव ओतप्रोत भरला होता.

मग खालीं दृष्टी करून ती म्हणाली,

"आपण असाल हें स्वप्नांतहि नव्हतं !—तब्येत बरी आहे ?—"

"या आनंदाचीच काय ती कमतरता होती—"

ते शब्द ऐकतांच मीनाक्षी गोंधळली; व आपण बोलण्यांत किंचित् अतिक्रम केला असें वाटून सुधीरहि थोडा गोंधळला.

तितक्यांत बाहेर रस्त्यावर मोटारचें शिंग वाजलें, व तें ऐकतांच

"अगबाई ! बाप्पा आले !—"

असें उद्गारून मीनाक्षी तेथून बंगल्याच्या मागच्या बाजूकडे धांवली, व जुबेदाहि जेवरला ओढीत तिच्या मागोमाग गेली.

मीनाक्षीच्या पाठमोऱ्या आकृतीकडे सुधीर पहात राहिला, व ती दिसेनाशी झाल्यावर मोठ्या कष्टानें त्यानें तिकडून नजर परतविली. आपलें सारें शारीरिक दुःख पार लयाला गेल्याची सुखकारक जाणीव त्याला होत होती, पण त्याच क्षणीं कांहीं एक नवीनच दुःख आपल्या अंतःकरणाला जडत आहेसें त्याला वाटत होतें. किंचित् गोंधळून त्यानें आपला डावा हात छातीशीं चाळविला व बावरलेल्या माणसासारखें इकडे तिकडे पाहिलें.

समोर पश्चिम दिशेला लाल सोनेरी रंगाची शोभा बिघडविणारे काळे निळे ढगांचे तुकडे जमले होते, मघांशीं नारळींच्या फांद्यांच्या कडा रसरशीत तेजानें चमकत होत्या त्यांच्या त्या तळपत्या किनारी नाहींशा होऊन त्यांच्यावर औदासीन्याचा कृष्णवर्ण चढला होता, आणि उल्हासानें डोलण्याऐवजीं ते फांद्यांचे झुपके अगदीं निश्चल झाल्यामुळें अशुभाच्या भीतीनें थबकलेल्या घोड्यांच्या टवकारलेल्या कानांसारखे भासत होते.

तो क्षण मंगल कीं अमंगल तें सुधीरच्या मनाला समजेना.

मोटार आगाशींत येऊन खानसाहेब व डॉक्टर अस्लम उतरले तरी तो आपल्याच तंद्रींत होता.

# प्रकरण १६ वें

## जुनें पिस्तुल व नवी शंका



या गोष्टीला पांचसहा दिवस झाले. तिसरा प्रहर नुकताच उलटला होता व संध्याकाळ व्हावयास अवकाश होता. बंगल्यांत चहूंकडे शान्त होतें. व्हरांड्याच्या पूर्व-टोकाला असलेल्या ज्या एका लहानशा खोलीचा कचेरीसारखा उपयोग करीत असत तेथें खानसाहेब बसले होते, व देवशरणनें तयार केलेल्या कांहीं हिशोबांची तपासणी करीत होते. डॉ. अस्लम आंत दिवाणखान्यांत होते. लोड जवळ असून त्याला टेंकण्याऐवजीं फक्त उजव्या हाताच्या कोपरानें ते त्यावर रेलले होते. त्यांच्यापुढें हातानें लिहिलेल्या पर्शिअन लिखाणाचें एक छोटेंसें बाड होतें, व हातांत इंग्रजी लिखाणाचे कागद होते. ते पुनः पुन्हां त्या पर्शिअन बाडांत पहात, मग हातांतला कागद वाचीत, विचारमग्न होत, आणि कधीं जवळच पडलेला इंग्रजी कोश उघडून पहात किंवा कधीं पेन्सिलीनें त्या कागदावर कांहीं खूण करीत.

मीनाक्षी बाहेर व्हरांड्यांत होती. कठड्याच्या खालच्या पायंड्यावर दोन गजांमध्यें तिनें आपलें उजवें पाऊल ठेवलें होतें, व कठड्यावर रेलून उजवा हात साफ टेकला होता आणि डावा हात उभा करून त्याच्या दुमडलेल्या तर्जनीवर आपली सुंदर हनुवटी नाजूकपणें ठेवली होती. कठड्यावर रेलल्यामुळें गुजराथी तऱ्हेनें नेसलेल्या तिच्या साडीचा उजव्या खांद्यावरून जाणारा पदर सैल होऊन रुळत होता, आणि तिची सबंध डावी कूस पदरावांचून राहिल्यामुळें कटिभागापर्यंत टेकलेल्या तिच्या आभाळी रंगाच्या ब्लाऊझचें उंची रेशमी कापड उन्हांत चमकत होतें. मध्येंच येणारी वाऱ्याची एखादी जोराची झुळूक पाठीवर रुळणारा तिचा पदर जोरानें उडवी. पण तो आवरण्याकडे तिचें लक्ष

नव्हतेंसें दिसलें, आणि तिच्या अगदीं समोरच्याच बाजूला रोजचा सूर्यास्त-समयाचा चित्तवेधक देखावा जरी हलके हलके तयार होत होता तरी त्याकडेहि तिचें चित्त नव्हतें. तिच्या चर्येवर अपेक्षा आणि अधीरता यांचें रम्य संमिश्रण झालें होतें, व तिची नजर बंगल्यापुढच्या रस्त्याकडे सारखी होती.

ती सुधीरची वाट पहात होती.

आज तीन दिवस ती या वेळीं अशी व्हरांड्यांत उभी राही. आपण सुधीरची वाट पहात आहोंत असें कोणाला वाटूं नये म्हणून ती तेथें उभी राहून माळ्याला बागेंतल्या फुलझाडांसंबंधीं कांहीं सांगण्याचा बहाणा करी, मोठ्या रस्त्यानें बंगल्याकडे येणारा सुधीर दिसेल म्हणून ती सारखी तिकडे दृष्टि ठेवी, आणि बंगल्याच्या फाटकांत शिरतांना सुधीर दिसल्याबरोबर मात्र क्षणमात्रच त्याच्याकडे पाहून ती झटकन् व्हरांड्यांतून आंत निघून जाई.

अशा प्रकारें त्याची वाट पाहण्यांतहि कांहीं एका आनंदाचा तिला अनुभव येई हें खरें; तथापि सुधीर बंगला सोडून गांवांत रहायला गेला नसता तर तिला अधिक बरें वाटलें असतें. त्याची व तिची व्हरांड्यांत अकल्पित गांठ पडली त्यानंतर दोनच दिवस तो तेथें राहिला, व नंतर त्यानें गांवांत जाऊन स्वतंत्रपणें राहण्याचा हट्ट घेतला. खानसाहेबांनीं व डॉ. अस्लम यांनीं त्याला परोपरीनें बंगल्यावरच राहण्याचा आग्रह केला; पण त्यानें ऐकलें नाहीं. स्वतः सुधीरचें मन मीनाक्षीमुळें बंगल्यांत राहण्यासाठीं कांहीं थोडें ओढ घेत होतें असें नव्हे. पण आपण कांहीं एका विवक्षित कामासाठीं धेनुकुंजास आलों आहोंत, आणि त्या कामाच्या दृष्टीनें गांवांत कोठें तरी स्वतंत्रपणें राहणेंच आपल्याला अधिक इष्ट आहे असा त्यानें विचार केला. तें बोलणें चाललें असतांना मीनाक्षी तेथेंच बसली होती व त्या संभाषणांत भाग घेण्याइतका तिचा व सुधीरचा परिचय झाला होता. कारण ज्या दिवशीं सुधीरची व तिची जुबेदाच्या युक्तीमुळें गांठ पडली होती त्याच्या दुसऱ्याच दिवशीं खानसाहेबांनीं तिला मुद्दाम दिवाणखान्यांत बोलावून आणलें होतें व त्या दोघांचा परस्पर परिचय करून दिला होता. सुधीरच्या दुखण्यांत त्याच्याशीं मीनाक्षीची ओळख करून देण्यांत त्यांना विशेष अर्थ वाटला नव्हता; पण तो हिंडूंफिरूं लागल्यावर त्यांनीं त्या बाबतींत विलंब केला नाहीं.

अर्थात् खानसाहेब ओळख करून देत होते त्या वेळीं जणूं आपण एकमेकांस पूर्वी कधीं पाहिलेलेंसुद्धां नाहीं अशा अर्थाच्या मुद्रेनेंच सुधीर व मीनाक्षी यांनीं एकमेकांकडे पाहिलें; व त्या नाट्याचा दोघांसहि कांहीं एक विशेषच आनंद वाटला. दोन व्यक्ती बाकीच्या जगापासून एखादी गोष्ट गुप्त ठेवीत असल्या कीं त्या प्रयत्नाला प्रीतीचा रंग साहजिकपणेंच थोडा तरी चढतो. तोच सुधीर व मीनाक्षी यांना एकमेकांच्या मुद्रेंत दिसला व त्यामुळें दोघांच्याहि अंतःकरणांत सुखसंवेदनेचे तरंग उठले.

त्या वेळीं मीनाक्षीकडे पहात खानसाहेब सुधीरला म्हणाले होते,

"मुलींत गुण नसले तरी बापाला तिचा अभिमान असतो म्हणतात. मग हिचा पुरेसा अभिमान बाळगतां बाळगतां माझी कशी त्रेधा होत असेल तुम्हीच कल्पना करा."

यावर सुधीरनें हंसत म्हटलें होतें,

"पण आपलं हृदय इतकं विशाल आहे कीं हा अभिमान कितीहि मोठा असला तरी त्यांत मावेनासा होणं शक्यच नाहीं."

त्या चतुर उत्तरानें खानसाहेब व शेजारच्या खुर्चीवर बसलेले डॉ. अस्लमहि हंसले होते, व मीनाक्षीला त्या उत्तराचें इतकें कौतुक वाटलें होतें कीं तें व्यक्त करणारा एक मधुर कटाक्ष सुधीरकडे टाकल्याखेरीज तिच्यानें राहवलें नाहीं.

त्यानंतर खानसाहेब, डॉ. अस्लम व सुधीर जेथें बोलत असतील तेथें मीनाक्षी मोकळेपणानें जाऊन बसत असे, व त्यांच्या संभाषणांत भाग घ्यायलाहि लाजत नसे. ती आली नसली तर अस्लमकाका मुद्दाम तिला बोलावीत व जें कांहीं बोलणें चाललें असेल त्यांत तिला युक्तीनें ओढीत. सुधीर अत्यंत सुशिक्षित आणि सुविद्य आहे हें लक्षांत येतांच खानसाहेब व डॉ. अस्लम हरतऱ्हेचे विषय काढून त्याच्याजवळ बोलत, व तीं त्यांचीं बोलणीं ऐकण्यांत—विशेषतः सुधीरचें बोलणें ऐकण्यांत आणि बोलतांना त्याच्या तेजस्वी चेहऱ्यावर उमटणारे विविध भाव पाहण्यांत मीनाक्षीचें चित्त रमून जाई.

एकदां डॉ. अस्लम सुधीरला म्हणाले,

"जगांत सर्वस्वी वाईट असं कांहीं घडतच नाहीं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं."

" तें कसं ? "

" तर ! आतां हेंच पहा ना, तुम्ही अपघातांत सांपडलांत हें तुमच्या दृष्टीनं फार वाईट झालं. पण माझ्या दृष्टीनं हें किती चांगलं झालं तुम्हांला कल्पना नाहीं ! "

" म्हणजे ? मी अपघातांत सांपडलों याबद्दल तुम्हांला आनंद होत आहे डॉक्टरसाहेब ? "

सुधीरच्या या प्रश्नानें खानसाहेब व मीनाक्षी मोठ्यानें हंसलीं, व डॉ. अस्लमहि किंचित् हंसले व म्हणाले,

" कां होऊं नये ? तुमचा अपघात झाला नसता तर खानसाहेबांनीं मला तार करून बांदेषहून बोलावलं असतं का ? अन् तुमचा माझा परिचय झाला असता का ?—"

" असं म्हणतां होय ?—"

" हो, अन् या परिचयाचा फायदा घेऊन तुम्हांला मी एक विनंति करणार आहें ती करायची संधि मला मिळाली असती का ?—"

" अस्सं, " सुधीर डोळे मिचकावून हंसत म्हणाला, " मला कांहीं काम सांगायची ही प्रस्तावना होती एकूण ! "

सुधीरच्या या उत्तरानें सगळींच हंसलीं, व हंसणें विरल्यावर डॉ. अस्लम म्हणाले,

" तुमच्यासारख्या मोठ्या माणसाला एकदम कसं अमुक करा म्हणून सांगायचं ? पण एकीकडे संकोच वाटतो तर दुसरीकडे तुमच्या विद्वत्तेचा फायदा करून घेण्याचा मोहहि अनावर होतो."

" छान ! मी विद्वान ना ! कांचेच्या मण्याला गौरवून हिरा म्हणण्यापैकींच हें होतं आहे !—"

" हा तुमचा विनय झाला. बरं, हा वाद नको. मज गरीबावर एक मेहेरबानी तुम्ही करणार का, सांगा."

" काय हुकूम आहे ? " सुधीरनें हंसत विचारलें.

" मला एक पर्शिअनमध्यें लिहिलेला जुना हकीमी ग्रंथ सांपडला आहे व आज कित्येक दिवस अतिशय परिश्रम करून मीं त्याचा कच्चा इंग्रजी तरजुमा तयार केला आहे. हें इंग्रजी भाषान्तर प्रसिद्ध करण्याची माझी कित्येक दिवसांची

इच्छा आहे. खानसाहेबांना विचारा; त्यांना माहीत आहे. पण इंग्रजी भाषान्तर प्रसिद्ध करायचं म्हणजे उत्तम इंग्रजी जाणणाराचं साहाय्य घ्यायला पाहिजे, व तें कसं मिळवावं या फिकिरींत मी आज बरेच दिवस आहें. योगायोगानं तुमची मदत मला आतां मिळण्यासारखी आहे. तेव्हां विनंति अशी कीं--"

"वा, डॉक्टर, त्यांत विनंति कसली ? जरूर करीन मी आपण म्हणतां तें काम !--" सुधीर म्हणाला.

यावर खानसाहेब सुधीरला म्हणाले,

"मग हें अस्लमकाकांचं काम जर तुम्ही करणार आहांत तर आमच्या इथून जाऊन दुसरीकडे रहायचा हट्ट द्या सोडून. इथंच सारखे तुम्ही अन् अस्लम एकत्र असलांत म्हणजे--"

"नाहीं, नाहीं, खानसाहेब" सुधीर आर्जवी चेहरा करून म्हणाला, "एवढा आग्रह आपण करूं नये. मी रोज संध्याकाळीं नियमानं येऊन डॉक्टरसाहेबांचं काम दोन तास करायचं वचन देतों. पण--अं--इथं रहायचा आग्रह—आपण करूं नये."

त्यावर खानसाहेब व डॉ. अस्लम यांनीं परोपरीनें सांगून पाहिलें, पण सुधीरनें मोठ्या युक्तीनें त्यांना न दुखवितां आपलें म्हणणें खरें केलें व काकांच्याबरोबर आल्यावेळीं ज्या बागवानाच्या झोंपडींत त्यांचा मुक्काम होता त्याच्याच झोंपडींत तो दुसऱ्या दिवसापासून रहावयास गेला.

तेथें गेल्यावर दुपारीं तो पत्रें लिहीत बसला होता अशा वेळीं एका बैल-गाडींत बरेंचसें सामान घेऊन एक कोळी आला व त्याच्या मागोमाग मोटारींतून खानसाहेबांचा नोकर देवशरण आला.

सुधीरनें त्याला विचारलें,

"कां आलांत ?--"

"इथं आपल्या व्यवस्थेंत कसूर राहूं नाहीं म्हणून ही चौपाई, हे गालिचे, हे लोड, टेबलखुर्च्या, आरसे—हें सारं सामान—"

अगदीं ओशाळलेल्या स्वरानें सुधीर म्हणाला,

"च् ! काय म्हणावं खानसाहेबांना !"

"मालकांनीं नाहीं हें पाठवलं—"

"मग ?"

" मीनासाहेबानचा आहे हा हुकूम. दोन तास खपून त्यांनीं या साऱ्या वस्तूंची निवड केली अन् मला बजावलं कीं खाना झाल्याबरोबर जाऊन पाहुण्यांची खोली अगदीं बेअयब थाटून या."

तें ऐकून सुधीर विस्मित झाला, व त्याला जो हर्ष झाला तो तर अमर्याद होता.

खोली सजवून देवशरण निघून गेल्यावर त्यानें त्या सर्व वस्तूंकडे पाहिलें व कांहीं एका विलक्षण आनंदाचा निःश्वास त्यानें सोडला.

मीनाक्षीपासून दूर असूनहि त्या वस्तूंमुळें तिच्या सान्निध्यांत असल्यासारखेंच सुधीरला वाटूं लागलें !

त्या दिवशीं संध्याकाळीं तो बंगल्यावर गेला. तो फाटकांत शिरतांना त्यानें पाहिलें तों मीनाक्षी व्हरांड्यांत कठड्यावर रेलून उभी असलेली त्याला दिसली. त्यानें हास्य केलें व तीहि हंसलीसें त्याला वाटलें. त्यानें दुसरीकडे पाहिलें व पुन्हां मान वर करून त्यानें व्हरांड्याकडे पाहिलें तों मीनाक्षी तेथें नव्हती. ती आंत जात होती, तिच्या नेसण्याचा कांहीं भाग त्याला ओझरता दिसला.

डॉ. अस्लम व तो दिवाणखान्यांत काम करीत बसल्यावर कांहीं वेळानें मीनाक्षी तेथें आली व म्हणाली,

" काका, कॉफी येते आहे. जरा काम थांबवतां ? "

त्या वेळीं तिनें सुधीरकडेहि पाहिलें व मंद हास्य केलें.

मीनाक्षीचे आपण केव्हां आभार मानूं अशी अधीरता सुधीरच्या मनांत सारखी होती ती त्याच्या चेहऱ्यावर पूर्ण उमटली, व तिच्याकडे एकदां हंसत पाहून तो डॉ. अस्लमना म्हणाला,

" डॉक्टरसाहेब, मी बंगला सोडून झोंपडींत गेलों, पण माझ्या मागोमाग बंगलाच वस्तीसाठीं झोंपडींत आला आहे, ठाऊक आहे तुम्हांला ?—"

अस्लमना त्याचें बोलणें नीट समजलें नाहीं, पण मीनाक्षीला समजलें व ती मुरका मारून जी झटकन् निघून गेली ती नोकरानें कॉफीचे पेले आणले त्या वेळीं खानसाहेबांना घेऊन येईपर्यंत आलीच नाहीं.

सुधीरचें बोलणें जसें अस्लमना कळलें नाहीं तसें मीनाक्षीचें तें जाणेंहि त्यांना कळलें नाहीं. मीनाक्षीनें सामान पाठवून दिल्याचा प्रकार जेव्हां सुधीरनें त्यांना सांगितला तेव्हां त्यांच्या सारें लक्षांत आलें, व ते म्हणाले,

“ बडा मीठा हय दिल लडकीका ! ”

त्यानंतर सुधीरनें नियमानें यावें, अस्लमच्या कामांत त्यानें एकदोन तास घालवावे व मग सगळ्यांनीं मिळून बोलत बसून किंवा समुद्रतीरावर फिरून मर्जेत वेळ घालवावा असा क्रम आज तीन दिवस चालला होता.

म्हणूनच आजहि सुधीर येणार याविषयीं मीनाक्षीची खात्री होती व त्यामुळे ती रोजच्याप्रमाणें त्याची वाट पहात व्हरांड्यांत उभी राहिली होती.

पण नेहमींची वेळ टळून गेली तरी सुधीर आला नाहीं, व जसजसा आधिकाधिक वेळ जाऊं लागला तसतशी मीनाक्षीची चर्या कोमेजूं लागली. फारच वेळ झाल्यावर तिला वाटूं लागलें आतां वाट पहात उभें राहण्यांत अर्थ नाहीं. आपल्या खोलींत जावें किंवा जुबेदाला घेऊन वाळवंटावर फिरायला जावें. या विचारानें तिनें एकदोनदां कठड्यावर रेलून ठेवलेला आपला उजवा हात अर्धवट उचललाहि. पण तिनें तो पुन्हां पूर्ववत् टेंकला. तिच्या मनांत आलें, त्याचा काय नियम, आपण येथून जाऊं आणि त्याच वेळीं सुधीर येईल व त्याला दुरून पाहण्याची मनांतली लालसा पुरी करण्यासाठीं इतका वेळ आपण केलेली तपश्चर्या व्यर्थ जाईल.

म्हणून ती तशीच उभी राहिली.

शेवटीं सूर्यबिंब जवळ जवळ पश्चिम क्षितिजावर टेंकलें, आणि नारळीच्या झाडांच्या लांबलचक छायांनीं बंगल्यापुढचें सारें प्रांगण इतकें चिताडून टाकलें कीं रेषांच्या जाळ्यांनीं गिचमिड झालेल्या एखाद्या दुर्दैवी माणसाच्या तळहातासारखें तें प्रांगण दिसूं लागलें.

मग मात्र सुधीर आज येत नाहीं असें मीनाक्षीला वाटलें.

तो कां बरें आज आला नसावा ?

त्याच्या झोंपडीकडे मोटार पाठवून शोध घेऊन यावयास नोकराला सांगावें असें तिच्या मनांत आलें. पण लगेच तिला शंका आली कीं, आपण सुधीरच्या येण्यासाठीं इतपत उत्सुक आहोंत हें बाहेर दिसणें बरें नव्हे.

मग, आज ही अशी निराशाच मुकाट्यानें सहन केली पाहिजे असें आपल्या मनाला शिकवीत ती कठड्यापासून दूर झाली, व खोलीकडे जाऊं लागली, तितक्यांत डॉ. अस्लम दिवाणखान्यांतून बाहेर आले, व मिनाक्षीला पाहतांच म्हणाले,

" अं ?—तूं इथं ?—"

" नाहीं—सहज, मी आतां जातें फिरायला—"

हातांतली पेन्‌सिल डाव्या हाताच्या आंगठ्याच्या नखावर वाजवीत डॉक्टर म्हणाले,

" आज मुंबईकर पाहुणे कसे आले नाहींत कोण जाणे !—"

" येणार होते ? " भोळेपणाचें नाट्य करून मीनाक्षीनें विचारलें.

" तर ! रोजच्च यायचं त्यांनीं नाहीं का कबूल केलेलं ?—"

" हो हो—खरंच, " नाट्य पुरें करीत मीनाक्षी म्हणाली, " मग, आज कां बरं—? "

" तेंच कळत नाहीं. आतां किती वाट पहायची ?—पण कां आले नाहींत ! उगीचच्या उगीच त्यांच्याकडून कसूर व्हायची नाहीं. मी म्हणतों आपली गाडी पाठवून शोध तरी आणावा."

ते शब्द ऐकतांच मीनाक्षीचें हृदय केवढ्यांदा तरी धडधडलें. अगदीं आपल्या हृत्कपाटांतल्या विचाराचा प्रतिध्वनि ऐकल्यासारखें तिला वाटलें.

पण मनांतली आनंदाची उसळी मुद्रेवर न दाखवितां ती शान्तपणें म्हणाली,

" हं, आणावा शोध, नाहीं ? "

मग लगेच तिनें ड्रायव्हरला बोलाविलें व हुकूम सोडला. अस्लमकाकांच्या कामाच्या निमित्ताचें छत्र तिच्यावर होतें त्यामुळें आपली उत्सुकता उघड होईल ही भीति तिला नव्हती. तिनें ड्रायव्हरला पुनः पुन्हां बजावलें,

" जलदी परत ये हं.—अन् हें बघ,—अं—पाहुणे असले तर त्यांना घेऊनच ये. त्यांना म्हणावं वाट पाहताहेत. हं. जाव, जलदी ! "

ड्रायव्हर गेला तो येईपर्यंत ती व डॉ. अस्लम तेथें व्हरांड्यांतच उभीं राहिलीं व खानसाहेबहि आपलें काम संपवून त्यांच्यांत येऊन मिळाले.

परत येणाऱ्या मोटारचें बंगल्याच्या फाटकांत शिरण्यापूर्वी शिंग वाजलें त्याबरोबर मीनाक्षीनें वळून पाहिलें.

कदाचित् सुधीर गाडींत दिसेल अशी एक वेडी आशा तिला वाटत होती.

पण मोटारींत मागच्या जागीं कोणीच नव्हतें !

तिची निराशा झाली, व ड्रायव्हरनें निरोप तरी काय आणला आहे तो ऐकण्यासाठीं ती उत्सुक झाली.

ड्रायव्हरनें मोटार आगाशीखालीं थांबविली व जवळ येऊन तो म्हणाला, "साहेब नाहींत झोंपडींत."

"मग ?" डॉक्टर अस्लमनीं विचारलें.

"बुड्ढ्या बागवानानं सांगितलं कीं पाहुणे बाहेर पडत होते इतक्यांत अमीर-साहेब त्यांच्याकडे आले व त्यांना गाडींत बसवून घेऊन गेले. बहुतेक त्यांच्या-कडेच गेले असावेत मुंबईचे साहेब."

"हं. तसंच असेल." खानसाहेब म्हणाले, "अमीरसाहेब एकदां त्यांना आपल्या बंगल्यावर न्यायचं म्हणतच होते."

मग मीनाक्षी तेथें उभी राहिली नाहीं. ती जेवरला घेऊन जुबेदाबरोबर वाळ-वंटावर गेली.

पण तेथें तिचें लक्ष समुद्राच्या लाटांच्या खेळाकडेहि नव्हतें व जुबेदाच्या बडबडीकडेहि नव्हतें.

सुधीरनें सय्यद अमीरच्या बंगल्यावर जावें हें तिला बरें वाटलें नाहीं, व त्याबद्दलच तिच्या मनांत अस्वस्थता उत्पन्न झाली होती. गेल्या सातआठ दिवसांत सय्यद दोनचारदां खानसाहेबांकडे आला होता व त्यामुळें त्याचा व सुधीरचा परस्पर परिचय झाला होता हें तिला माहीत होतें. येवढेंच नव्हे, तर सुधीरनें जीं चित्रें बरोबर आणलीं होतीं त्यांतलीं निसर्गसौंदर्याचीं सारीं कामें जशीं तिच्या बाप्पांनीं ताबडतोब खरेदी केलीं होतीं तशीं कल्पित प्रसंगांचीं सारीं चित्रें सय्यदनें विकत घेतलीं होतीं हेंहि तिला कळलें होतें. परंतु त्याला चित्रकलेचें स्वारस्य मोठेंसें कळत होतें म्हणून नव्हे तर केवळ आपला मोठे-पणा मिरविण्यासाठीं सय्यदनें ही खरेदी केली होती ही तिची खात्री होती. सय्यदचा स्वभाव सुधीरनें ओळखला नसावा असें तिला वाटेना. सुधीरच्या मुद्रेवरचें तीक्ष्ण बुद्धीचें तेज तिच्या स्वतःच्या स्मृतिनेत्रापुढें सारखें खेळत होतें, व अशा बुद्धीला सय्यदच्या स्वभावाचा ठाव लागणें कठीण जावें अशी तिची कल्पना होईना. मग—

मग सुधीर सय्यदच्या बंगल्यावर गेला हें कसें ?—

हें बरें झालें नाहीं असें तिला पुनः पुन्हां वाटे.

मध्येंच एकदां तिच्या मनांत आलें, सुधीरनें अमकीकडे जावें किंवा अमकी-

कडे जाऊं नये असें आपल्याला काय म्हणून वाटावें?—आपण काय म्हणून आपल्या मनाला त्रास करून घ्यावा?—आपला काय संबंध?

या प्रश्नांचें तिला आपल्या मनाशीं उत्तर देतां आलें नाहीं. पण मग त्या उत्तराच्या भानगडींत पडण्याऐवजीं ते प्रश्नच तिनें मनावेगळे केले, आणि पहिल्याप्रमाणें तिचें मन पुन्हां घोकूं लागलें,

सुधीर सय्यदच्या बंगल्यावर कशाला गेला?—हें बरें झालें नाहीं!

* * *

सय्यद अमीर मुद्दाम येऊन सुधीरला गाडींत बसवून घेऊन गेले असें बागवानानें जें खानसाहेबांच्या ड्रायव्हरला सांगितलें तें खरें होतें. सुधीर कपडे करून रोजच्याप्रमाणें खानसाहेबांच्या बंगल्यावर जावयाच्या हेतूनें म्हणून निघाला होता. पण तो झोंपडीच्या दारांत यावयास व झोंपड्याच्या आवारांत सय्यदची गाडी शिंग वाजवीत शिरावयास एकच गांठ पडली.

सय्यद स्वतः गाडी हांकीत होता. त्यानें सुधीर उभा होता तेथें अगदीं त्याच्यानजीक गाडी ओट्याला लावून उभी केली व गाडीचें एंजिन बंद न करतां व स्वतः खालीं न उतरतां सुधीरकडे पाहून हंसत म्हटलें,

“ आपणाला न्यायसाठीं मुद्दाम आलों आहें.”

“ होय?” सुधीरनें हास्य करून म्हटलें, “ थँक्स. पण—अं—मी खान-साहेबांच्या—अं—”

“ उंः! वो जाना देव जी!—” मान हालवून सय्यद हंसत म्हणाला, “त्याचं काय मोठं!”

“ नाहीं. असं कसं? डॉक्टरसाहेब माझी वाट पहात बसतील ना.”

“ बसूं द्या हो. काय येवढं काम अडलं आहे? पर्शिअन् भाषेंत जुन्या काळीं टिपून ठेवलेले झाडपाल्याचे तोडगे इंग्रजींत लिहून काढायचे हेंच ना काम? अस्लमकाकाला म्हातारचळ लागला आहे अन् आपण त्याला साथ करणारे भेटलांत म्हणायचें!—चला.”

सय्यदचें तें बोलणें विनोदाचें होतें हें तर उघडच होतें, पण तरी त्यानें केलेला तो डॉ. अस्लमचा उल्लेख सुधीरला अंमळ चमत्कारिक वाटला. तो म्हणाला,

“ नको; माफ करा, मला जायलाच पाहिजे.”

मग सय्यद खालीं उतरला व सुधीरजवळ येऊन म्हणाला,

"वा वा ! म्हणजे आपण आमची अगदींच निराशा करणार ?—नहीं नहीं ! ऐसा कभी होता हय ?—उद्यां मी अस्लमकाकांजवळ आपल्यासाठीं क्षमेची याचना करीन. मग तर झालं ?—चलिये जनाब !"

असें म्हणत त्यानें आपल्या उजव्या हातानें त्याचा हातच धरला.

त्यानें इतका आग्रह केल्यावर सुधीरला नाहीं म्हणतां येईना. तो ओट्यावरून उतरला. सुधीरनें यायचें कबूल केलें हें दिसतांच "हं ! ये ठीक हय जनाब !" असें आनंदानें म्हणत सय्यद हांकण्याच्या जागीं बसला, व "इधर आईये" असें सुधीरला म्हणत त्यानें आपल्या शेजारच्या गादीवर डावा पंजा आपटला, आणि सुधीर तेथें बसतांच त्यानें गाडी चालू केली.

सय्यदची गाडी हांकण्याची सफाई सुधीरच्या ताबडतोब लक्षांत आली. हांकण्याचें चाक उजव्या पंजानें त्यानें अशा कांहीं नाजूक तऱ्हेनें धरलें होतें, आणि गाडी वळविण्याच्या वेळीं तो इतक्या सहजपणें तें चाक फिरवीत होता कीं तें पाहून दिलरुब्यावर गज टाकणाऱ्या तंतकाराच्या हाताचीच आठवण होण्यासारखी होती. मांडीखालच्या घोडीविषयीं कुशल चाबूकस्वाराची वृत्ति असावी तशी सय्यदची गाडीविषयीं होती.

त्यानें मध्येंच खिशांतून सिगारेट काढली व क्षणभर गाडीचें चाक खुशाल सोडून देऊन काडी ओढून ती झटकन पेटविली.

मग झुरका सोडीत सुधीरच्या मांडीवर सिगारेटचें पॅकेट ठेऊन तो म्हणाला,

"लीजिये !"

सुधीरनें तें उचललें व हंसत म्हटलें,

"मी ओढीत नाहीं".

मुद्रेवर अत्यंत आश्चर्य दर्शवून सय्यदनें म्हटलें,

"क्यं ?—पीते नही ! कोणी पुरुष विडी पीत नाहीं असं ऐकलं कीं मला खरंच वाटत नाहीं. घोडा गवत खात नाहीं किंवा मोटार पेट्रोल घेत नाहीं असं कोणी सांगितलं तर मला एक वेळ खरं वाटेल, पण आदमी बिडी पीता नही—हः हः ! अन् त्यांतून आपण तर मुंबईचे ! लीजिये जनाब !"

त्याच्या कोटीची सुधीरला गंमत वाटली, व तो त्याच्याबरोबरीनें हंसलाहि. पण पॅकेट पुढें करून तो म्हणाला,

" आपलं म्हणणं खोटं नाहीं. पण—माफ करा. ठेवा हें पाकीट."

" अच्छा! आपकी मर्जी!" असें म्हणून सय्यदनें पाकीट घेतलें, व गाडी दुप्पट वेगांत सोडली.

बंगल्याच्या आगाशींत गाडी पोंचतांच दोन नोकर पायऱ्यांवरून धांवत आले; सय्यद उतरला व सुधीरला घेऊन आंत गेला. व्हरांड्यांतून जातां जातां मागोमाग येणाऱ्या नोकराला तो म्हणाला,

" महमद."

" जी."

" देख—बडी अच्छी कॉफी चाहिये. जलदी. हें बघ––मुंबईचे पाहुणे आहेत हं. त्यांनीं पसंत केली पाहिजे तुझी कॉफी—"

" जी."

मग सय्यदनें बंगल्याचीं निरनिराळीं दालनें सुधीरला दाखविलीं. तीं पाहणाराला सय्यदचें वैभव तर सहज पटण्यासारखें होतेंच, पण तीं पाहतांना जिकडे तिकडे एक प्रकारचा अव्यवस्थितपणा दृष्टीस पडल्यासारखें सुधीरला वाटत होतें. लांकडी सामान खूप होतें व उंची होतें, गालिचांची व रुजाम्यांची रेलचेल होती, नाना तऱ्हेचीं लहानमोठीं फुलदानें व इतर चित्रविचित्र पात्रेंहि हवीं तेवढीं होतीं––पण मांडणीचें कौशल्य कोठेंच नव्हतें. श्रीमंतीनें खचलेल्या घरांत मालक अव्यवस्थित व हेकेखोर स्वभावाचा असला कीं नोकरांचा चुकारपणा आणि असंतोष वस्तूवस्तूंत प्रत्ययाला येतो. असलाच प्रत्यय सुधीरला आला.

चारपांच दालनांत जाऊन आल्यानंतर एका दालनांत शिरत सय्यद म्हणाला,

" ही माझी सगळ्यांत प्यार खोली."

त्या खोलींत जिकडे तिकडे वाघांचीं व हरणांचीं कातडीं व तोंडें––कांहीं जमिनीवरच्या रुजाम्यांवर मांडलेलीं व कांहीं भिंतीवर बसविलेलीं होतीं. निरनिराळ्या आकाराच्या किती तरी बंदुका एका स्टँडवर ठेवलेल्या होत्या. कांहीं तरवारी एका बाजूला लटकलेल्या होत्या. ढालींच्या जोड्या चारी भिंतींना मधोमध जडवलेल्या होत्या.

खोलींत प्रवेश केल्यावर सय्यद म्हणाला,

" जगांत मला प्राणाहून प्यार कांहीं चीज असेल तर हत्यार. ही बंदूक

पाहिलीत ! जर्मन आहे ! बडी पल्लेदार आहे ! जर्मन हत्यार केव्हांहि सरस ! लीजिये, देखो !—"

असें म्हणत त्यानें बंदूक झटकन उचलून तिचा दस्त उजव्या खांद्याला टेंकून आडवी धरली, डावा डोळा मिटून निशाण धरल्याचा अभिनय केला, व बंदुकीचा घोडा उघडीत व मिटीत 'फाट फाट' असा आवाज करीत ती सुधीरपुढें धरली.

बंदूक हातीं न घेतां सुधीर म्हणाला,

"यांतलं मला कांहींच गम्य नाहीं ! सिगारेट जशी मीं कधीं ओढलेली नाहीं तसा बंदुकीचा चापहि कधीं ओढलेला नाहीं !"

ती त्याची कोटि आवडल्यामुळें सय्यद मनःपूर्वक हंसला. सुधीरहि हंसला, पण त्याला त्या वेळीं किंचित् कसेंसेंच वाटलें. बंदूक ऐटीनें हातांत पेलून उभा असलेला सय्यद एखाद्या शिल्पकारानें 'पराक्रम' या नांवानें तयार केलेल्या भव्य पुतळ्यासारखा त्याला भासला, व आपण अगदीं क्षुद्र, उपेक्षणीय, आहोंत अशी त्याची भावना झाली.

सय्यदनें एका टेबलाचा मोठा खण उघडला व त्यांतील पिस्तुलें दाखविलीं.

स्वतःच्या क्षुद्रपणाची जाणीव मनावेगळी करीत व हंसण्याचा प्रयत्न करीत सुधीरनें

"ओ हो !—छान !"

असें कांहींसें म्हटलें.

त्यावर सय्यदनें दुसरा एक खण उघडला, व त्यांतून एक पिस्तुल काढून दाखवीत म्हटलें,

"पण या पिस्तुलाचं मोल मला सगळ्यांत अधिक आहे. हें आमच्या घराण्यांतलं फार जुनं—माझ्या आजोबांच्या वेळचं आहे. तुम्हांला कांहीं कळत नसलं तरी हें हातांत घेऊन पहाच. मला बरं वाटेल."

"होय ?—" असें म्हणून सुधीरनें हास्य केलें व पिस्तुल घेतलें.

त्यानें तें आडवें तिडवें चाळविलें, व त्याच्या मुठीवर कायसें कोरीव काम होतें तें पाहतांच तो दचकला.

कांहीं उर्दू अक्षरें, दोन व्यत्यस्त तरवारी व मधोमध चंद्रकोर असें तें कोरीव काम होतें.

मदीना हॉटेलांतील आगीच्या खोलींत सांपडलेल्या कट्यारीच्या म्याना-वरील चिन्हाची एकदम आठवण होऊन तो उद्गारला,

"ओऽ होऽ!"

त्याचा उद्गार ऐकून सय्यदनें विचारलें,

"कां हो?"

"नाहीं, सहज." असें म्हणून सुधीरनें त्याच्या हातीं पिस्तूल परत दिलें, व तें परत ठेवण्यासाठीं सय्यद वांकला तेव्हां त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पहात तो मनाशीं म्हणाला,

"अस्सं!—एकूण मेरीची शंका खरी ठरणार म्हणायची!—"

# प्रकरण १७ वें



## देवळांत आणि समुद्रकांठीं



मीनाक्षीनें एकदम टाळी वाजविली व मोठ्यांदा हंसून डॉ. अस्लमना म्हटलें,

" ओ हो ! झालं ? माझं खरं ठरलं !—पैज मी जिंकली अं काका ?—"

तें तिचें बोलणें सुधीरला उमजलें नाहीं, व त्या वेळीं खानसाहेब व अस्लम हे दोघेहि कां हंसले, आणि अस्लमनीं मीनाक्षीस,

" हो बुवा, तूं पैज जिंकलीस खरी—"

असें कां म्हटलें तेंहि त्याला कळलें नाहीं.

मीनाक्षीशीं आतां त्याची पुष्कळच सलगी झाली होती, त्यामुळें तिच्याकडे पाहून हंसत त्यानें विचारलें,

" हें काय बुवा ? पैज कसली अन् तुम्ही जिंकली कशी—ही काय भानगड आहे ?—"

त्यावर मीनाक्षी हंसली, व बोटें विरळ ठेवून दोन्ही पंजे लुलेपणानें हालवीत व मान किंचित् मागें घेऊन तिरपी ठेवीत म्हणाली,

" तें नाहीं आम्ही सांगणार !—काकांनाच विचारा."

तिचा त्या वेळचा अभिनय इतका मोहक होता कीं सुधीर वेड्यासारखा तिच्याकडेच क्षणभर पहात राहिला. मग त्यानें अस्लमकडे वळून म्हटलें,

" काका, सांगा. कसली पैज होती ? "

अस्लम हंसले व म्हणाले,

" अहो, कांहीं तरी. आमच्या खानसाहेबांना वाटतं कीं आपली लेक शहाणी सुरती मोठी झाली म्हणून. पण ही अजून साऱ्या मुलखाची पोरकट

आहे. सदा लहान लहान मुलासारख्या शपथा घेत असते अन् पैजा लावीत असते. नाहीं मीना ?—”

अस्लमकाका ज्या प्रशस्त, खोल, सुंदर चिटानें मढविलेल्या श्रीमंती खुर्चीवर बसले होते तिच्या रुंद हातावर नितंब टेकून, पाय लोंबते सोडून व उजव्या हाताचा विळखा खुर्चीच्या उंच पाठीवर घालून मीनाक्षी बसली होती. ती लाडिकपणानें म्हणाली,

“ आहेच मुळीं मी लहान—”

आणि असें म्हणून पुढें वांकून तिनें डाव्या हातानें अस्लमच्या खमीसाच्या पहिल्या सोनेरी गुंडीशीं चाळा केला.

सुधीरला तें दृश्य मोठें गोड वाटलें. आपल्या प्रणयी लोभी नजरेलाच नव्हे तर तिच्या पित्याच्या वत्सल दृष्टीलाहि तिचा त्या वेळचा आविर्भाव मधुर वाटला असला पाहिजे अशी त्याच्या मनांत कल्पना आली, व त्यानें चटकन खानसाहेबांकडे पाहिलें. खानसाहेब हंसत म्हणाले,

“ तर तर ! उद्यां तुला दोन मुलं झालीं तरी तूं अशीच काकाच्या खुर्चीवर बसशील अन् पैजा लावशील. म्हणून लोक तुला लहान नाहीं म्हणणार कांहीं.”

तें ऐकून मीनाक्षीनें फक्त मान वेळावली व अस्लमच्या गुंडीशीं आणखी चाळा केला.

सुधीरनें म्हटलें,

“ पण अस्लमकाका, पैज कसली होती तें मला नाहींच कळलं.”

“ तुम्हांला ऐकायचाच आहे मीनाचा पोरकटपणा ?—”

“ हो.”

“ ऐका तर. आज दुपारीं खान्याच्या वेळीं सहज बोलणीं चाललीं असतां, मीनानं असा विषय काढला कीं इतर कोणाहिपेक्षां माझ्यावर तुमचा लोभ अधिक आहे. त्याबद्दल बराच गंमतीचा वाद झाला, अन् वाद निकरावर आला म्हणून शेवटीं पैज लागली.”

-तें ऐकून सुधीरला समाधान व असमाधान यांची एक विचित्र सरमिसळ अनुभवास आली. या मुक्कामांतल्या परिचयामुळें डॉ. अस्लमवर त्याचा अतिशय लोभ जडला होता यांत शंका नाहीं. खुल्या दिल्याचा, उल्हासी, विनोदी आणि चतुर असा अस्लमकाकासारखा वयस्क माणूस आणि त्याच स्वभावाचा विद्वान्,

आनंदी, देखणा असा सुधीरसारखा तरुण एकत्र आल्यावर जो परस्पर गाढ लोभ दोघांमध्यें साहजिकच उत्पन्न व्हावयाचा तो या दोघांत उत्पन्न झाला होता हें कोणीहि सांगितलें असतें, व त्याबद्दलचा लोकांच्या तोंडचा उल्लेख ऐकून सुधीरला वास्तविक बरेंच वाटलें असतें. परंतु तो उल्लेख करतांना "इतर कोणाहिपेक्षां अस्लमकाकांवर सुधीरचा लोभ अधिक आहे" असें मीनाक्षीनें म्हणावें हें त्याला बरें वाटलें नाहीं. त्या 'इतर कोणा'मध्यें मीनाक्षीनें स्वतःची गणना केल्याचें ऐकून त्याला कांहीं तरी बोंचल्यासारखें वाटलें. मीनाक्षीच्या तिरप्या मुखकमलाकडे पहात तो तिला मनांतल्या मनांत रागाच्या आविर्भावानें म्हणाला, मीनाक्षी, माझा अस्लमकाकांवरचा लोभ तुला दिसला, आणि तुझ्या चरणांवर वाहिलेलं प्रेमपुष्प न दिसल्याचा तूं बहाणा करतेस ?—

"काय ?—तुमचं लक्ष आहे का ?—" डॉ. अस्लम हंसून म्हणाले.

एखाद्या माणसानें आपलें गळणारें वस्त्र झटकन सांवरावें तसें आपलें चित्त सांवरीत व प्रगट झालेल्या आपल्या दुर्लक्षावर हास्याचें आवरण घालीत सुधीर म्हणाला,

"हो—हं—तर ! पैज काय लागली ?"

"पैज अशी लागली कीं आज संध्याकाळीं तुम्ही परत घरीं जायला निघालांत कीं खान्याला रहायसाठीं व उद्यां सकाळीं खानसाहेब बांदेषला जाणार आहेत तेव्हां ते येईपर्यंत एकदोन दिवस बंगल्यावरच रहायसाठीं मीं तुम्हाला विनंति करायची. तुम्ही खूप आढेवेढे घेणार हें ठरलेलंच होतं अन् त्याप्रमाणं तुम्ही घेतलेतच. पण पैज अशी होती कीं कांहीं झालं तरी तुम्ही न ऐकतां गांवांत रोजच्यासारखे जाल असं माझं भविष्य होतं, अन् तुम्ही माझं ऐकून रहायचं कबूल कराल असं मीनाचं भविष्य होतं."

"अस्सं." सुधीरला गंमत वाटून तो म्हणाला, "अरेरे, मला आधीं कल्पना असती म्हणजे काका मी तुमचं न ऐकतां पैज जिंकण्याचा आनंद तुम्हांला लाभूं दिला असता कीं !—"

"त्याचा काय उपयोग ?" मान हालवीत अस्लम म्हणाले, "पैजेचा आनंद लाभला असता खरा, पण तुम्ही माझी विनंति मानली नाहीं म्हणून खेद झाला असता ! मीनाचा डावच युक्तीचा होता. एका कोणत्या तरी आनंदाला मी

मुकावं अशीच तिनं पकड टाकली होती. अन् तरी म्हणते मला बुद्धिबळं आवडत नाहींत !—"

या बोलण्यानें सगळींच हंसलीं, व मग त्यांच्या संभाषणाला नाना तऱ्हेचे फाटे फुटले. खाना तयार झाल्याची वर्दी येईपर्यंतचा वेळ केव्हां गेला कोणाला कळलेंहि नाहीं.

खान्यानंतर खानसाहेब व अस्लम गुडगुडी ओढीत लोडाला टेकले आणि सुधीर जवळच्याच आरामखुर्चीवर पसरला.

खानसाहेब मध्येंच सुधीरला म्हणाले,

"पण खान्याला रहा म्हटल्याबरोबर तुम्ही रहात नाहीं यावरून तुम्ही अजून आमच्यापाशीं फार संकोचानं वागतां असं दिसतं."

"छे छे ! खानसाहेब, असं कसलं ?—"

"मग काय ? मग तुम्हांला आमच्या घरचा खाना तरी नापसंत असेल ? —होय ? "

"छी ! तसंहि नाहीं. खरं सांगूं का, तुमच्याकडे मी जेवायचा असलों कीं तुमच्या नोकरांना माझ्यासाठीं निराळं साधं खाणं तयार करायची तसदी पडते त्याचा मला संकोच वाटतो."

"शाबास !—वा !" खानसाहेब म्हणाले, "खूपच काढलंत तुम्ही ! नोकरांच्या तसदीची चिंता ! मग नोकर ठेवायचे कशाला ?—अन् शिवाय, तुम्हांला माहीत नाहीं, आमच्या घरांत रोजच साधा खाना तयार होतो. मीनाक्षी दुसरं तिसरं कांहीं खात नाहीं. तिचं जेवण अगदीं साधं, सपक असतं."

"होय ?" सुधीरनें विस्मयानें म्हटलें.

तथापि त्याचा विस्मय फार वेळ टिकला नाहीं. कारण आदल्याच दिवशीं त्यानें अस्लमकाकांच्या तोंडून मीनाक्षीबद्दल जें ऐकलें होतें त्याच्याशीं या गोष्टीची संगति बरोबर बसत होती.

आदल्या दिवशीं सकाळीं एक गंमतीदार प्रसंग घडला होता.

सुधीर पत्रें टाकावयास म्हणून पोस्टापर्यंत गेला होता व त्यानंतर घरीं परत जाऊन कांहीं काम करण्याची निकड नसल्यामुळें तेथून एकदोन फर्लांग अंतरावर असलेल्या देवीच्या देवालयाकडे जावें अशी कल्पना त्याच्या मनांत आली होती. तें देवालय फार जुनें व प्रख्यात असल्याचें त्यानें ऐकलें होतें व हिंदू

लोकांची त्या देवस्थानाबद्दल अतिशय श्रद्धा असून तेथील वार्षिक जत्रेच्या वेळीं आजूबाजूच्या प्रान्तांतून लाख लोक जमतात असेंहि वर्णन पुष्कळांनीं त्याला सांगितलें होतें. तें देवस्थान एकदां पाहण्याचें त्याच्या मनांत होतें, पण ती गोष्ट राहिली ती अजून राहूनच गेली होती. म्हणून तो आतां देवळांत गेला.

सुधीर कांहीं भाविक नव्हता, पण जुनें देवस्थान या दृष्टीनें तो तेथील शिल्प-कलेची तऱ्हा पाहण्यांत रमला. देवालयाच्या महाद्वाराची कमान, कमानीच्या अंतर्भागांतील घुमटाच्या आकाराचा छत, विस्तीर्ण प्रांगणांतील दीपमाळा, सभामंडप आणि गाभाऱ्यांत गाभारा अशा विचित्र रीतीचे अधिकाधिक अंधारे होत जाणारे गाभारे—या सगळ्यांचीच बांधणी त्याला मोठी गमतीची वाटली. देवळाचा कोणताहि भाग मोठा अवाढव्य होता असें नव्हे. गांवाच्या पूर्व-सीमेला असलेलें जुनें कॅथॉलिक चर्च सुधीरनें पाहिलें होतें. त्याच्या भिंती, कमानी, खांब सर्वच कांहीं प्रचंड व अवाढव्य असल्याचें त्याला आढळून आलें होतें. तसा प्रचंडपणा या देवालयाच्या रचनेंत कोठेंच नव्हता. पण बांधणीचा एक घाट आणि वास्तूचा एक प्रकार या दृष्टीनें देवालयाचे निरनिराळे भाग चित्तवेधक होते.

सुधीर जरा वेळ गाभाऱ्यासमोर उभा राहिला, व मग तो प्रदक्षिणेच्या वाटेकडे गेला. देवळाच्या पाठीमागून वरच्या कळसाची शोभा कांहीं गंमतीची दिसत होती. तो चारपांच पावलें मुद्दाम मागें सरकला, व वर मान करून कळसाकडे पहात राहिला.

इतक्यांत त्याच्या उजव्या बाजूनें एक स्त्री येत असल्यासारखें वाटलें व म्हणून वाटेवेगळें होण्यासाठीं तो सरकला—

तों केवढें आश्चर्य !

ती मीनाक्षी होती !—

क्षणभर तें दृश्य त्याला खरेंच वाटेना.

एक तर मीनाक्षीसारखी मुसलमानाची मुलगी हिंदू देवालयाच्या परिसरांत दिसावी हें अत्यंत असंभवनीय कोटींतलें होतें ! आणि मीनाक्षी हिंदू असती तरी या वेळीं ती या देवळांत भेटेल असें सुधीरच्या स्वप्नींहि आलें नसतें हें दुसरें !—

पण तो किंचित् चकित होऊन थबकतो न थबकतो तोंच तिमिरपटल दूर करीत पूर्णकला झालेली चंद्रिका क्षितिजावर यावी त्याप्रमाणें मीनाक्षी अगदीं नजीक आली, व आपल्या मनांतील विस्मय नाहींसा होऊन तिच्या दर्शनाच्या शुद्ध आनंदाचाच तेवढा आपण अनुभव घेत आहोंत असें सुधीरला वाटलें.

तो हंसला.

मीनाक्षीहि हंसली व थांबली.

सुधीर म्हणाला,

" आंत गाभाऱ्यांत अंधेरांत देवी दिसली नाहीं. इथें या बाजूला अशी दिसेल अशी कल्पनाहि नव्हती."

हे शब्द उच्चारून संपल्यावर बोलण्यांत आपला तोल राहिला नाहीं असें त्याला वाटलें, व त्याचीं कानशिलें एकदम लाल झालीं आणि त्यानें दचकून आजूबाजूला पाहिलें.

चौकाच्या त्या मागच्या बाजूस त्या वेळीं एकहि माणूस नव्हतें. फक्त देवळाच्या एका कोपऱ्यावर, जेथें दगडीकाम संपून विटांचें काम सुरू झालें होतें तेथें उंचावर, एक घरटें होतें त्यांत चारपांच चिमण्या चिवचिवाट करीत होत्या.

मीनाक्षीनें क्षणभर खालीं पाहिलें व मग चटकन वर मान करून हंसरी नजर फेंकीत ती म्हणाली,

" रोज संध्याकाळीं सूर्य बंगल्यावर उगवतो येवढंच आजपर्यंत माहीत झालं होतं. सकाळीं सूर्यदर्शन इथं हटकून होतं हें माहीत असतं—तर—तर रोज आलें असतें—"

त्या वेळीं तिची ती साधी शुभ्र साडी आणि त्या साडीवरची लाल किनार किती सुबक दिसत होती! तिच्या कटिभागापाशीं ती किनार दुमडून अर्धी झाली होती आणि डावें वक्षस्थल रेखून दाखविणाऱ्या ब्लाउझच्या झिरझीरीत कांठाखालीं ती अमळशी लपली होती.

बोलत असतांना ती बरीचशी घाबरल्यासारखी दिसली, व त्या घाबरण्याचाच परिणाम होऊन ती उजव्या हातानें डाव्या हातांतली आंगठी पुढें मागें सरकवीत होती. तिच्या नाजूक, बांधेसूद, लांबट, आरक्त बोटांची प्रभा आंगठींतल्या खड्यावर पडल्यामुळेंच तो येवढा चमकत आहे असें सुधीरला वाटलें.

तिचें घाबरणें दूर करावें या हेतूनें सुधीरनें असें कांहीं हास्य केलें कीं,

" अशी एकान्तीं आपली गांठ पडली तर जें मनापासून हवं तेंच झालं. व्यर्थ घाबरून मनाचा आनंद कां बरं बिघडवायचा ? " असेंच तो म्हणाला.

सुधीरचें तें हंसणें पाहतांच तिचें हंसूं पाहणारें अधरबिंब एकदम पूर्ण विकसित झालें, आणि तिच्या नेत्रांत अलौकिक तेजाचा विलास नेहमींप्रमाणें दिसूं लागला. जणूं तिनें भयाचें झिरझिरीत अवगुंठन आतांपर्यंत घेतलें होतें तें आतां झटकन टाकून दिलें आणि दंतपक्तींतून आणि नेत्रांतून आपल्या खऱ्या प्रणयी वृत्तीच्या शतधारा एकदम मोकळ्या सोडल्या.

सुधीर कायसें बोलणार होता, पण तितक्यांत तिच्या बोटांतली आंगठी निसटली व खालीं फरशीवर पडली.

मीनाक्षीनें दचकून कांहींसा उद्गार काढला व ती आंगठी उचलून घ्यावया-साठीं खालीं वांकली.

पण त्याच वेळीं सुधीरहि वांकला, व त्यामुळें मीनाक्षीच्या विपुल केशकलापाचा मत्त सुगंध सुधीरच्या मस्तकांत भिनला, व ती वांकल्यामुळें ब्लाउझमधून उघड्या राहिलेल्या तिच्या गळ्याजवळील भागाची गौरकान्ति आणि कंठस्थानावरच्या किंचित् खोल जागेचा लाडकेपणा त्याच्या दृष्टींत शिरून हृदयापर्यंत भिडला. मीनाक्षीची नजर आंगठीकडे जाण्याऐवजीं त्याच्या बांधेसूद हाताकडेच लागून राहिली, आणि त्याचा ऊष्ण श्वासोच्छ्वास तिच्या मस्तकावर झाला त्याचें सौख्य तिला विलक्षण उन्मादकारी वाटलें.

दोघांनीं आंगठीकडे एकदमच हात नेल्यामुळें त्यांचा एकमेकांस स्पर्श झाला व तो होतांच चमकून मीनाक्षी मागें सरली.

आंगठी उचलून सुधीरनें वर मान केली व हंसत मीनाक्षीजवळ परत दिली.

मीनाक्षी हंसली, पण मग एक शब्दहि न बोलतां प्रदक्षिणेच्या वाटेनें पुढें निघून गेली ! तिच्या पाठीवर रुळणारी लांब सडक वेणी साडीखालून किती सुंदर दिसत आहे, आणि त्या वेणीच्या शेवटाला गुंफलेली रंगीत फीत किती डौलदार दिसत आहे, असें मनाशीं म्हणत सुधीर तिच्या पाठमोऱ्या आकृती-कडे पहात राहिला !

त्या दिवशीं संध्याकाळीं त्यानें अस्लमकाकांना मीनाक्षीची देवळांत गांठ पडल्याचें सांगितलें व विचारलें,

" मुसलमानाच्या मुलीला हिंदू देवळांत येऊं द्यावं अन् तिनं भक्तीनं हिंदू देवळांत जावं या दोन्ही गोष्टी सारख्याच असंभवनीय. तरी त्या कशा घडतात ? "

अस्लमकाका म्हणाले,

" मीना गाभाऱ्यापर्यंत कधीं जात नाहीं. ती दुरून दर्शन घेते. ती गेली कीं पुजाऱ्याला एकदोन रुपयांची प्राप्ति सहज होते म्हणून तो तेवढी सवलत तिला देतो. अन् मीना श्रद्धेनं तिथं जाते यांतहि आश्चर्य नाहीं."

" तें कसं ? "

" तिच्या जन्माचा इतिहास तुम्हांला माहीत नाहीं ? "

" नाहीं.—सांगा.—"

" आमच्या खानसाहेबांच्या पत्नीला फार दिवस मूल होत नव्हतं. पुष्कळ उपाय झाले, फकीर झाले, पीरांचे नवस झाले, पण कांहीं यश येईना. शेवटीं एक हिंदू साधू या गांवीं आला अन् त्याची सेवा केल्यानं खानसाहेबांच्या बायकोला मीना झाली—"

" अस्सं ?—"

" हं. त्या साधूचा प्रभाव खानसाहेबांना मान्य नाहीं. ते त्याच्या हिंदुत्वावर चिडतात. पण मीनाच्या आईला हिंदु धर्माविषयीं पूज्यभाव होता अन् तो आदर मीनांतहि उतरला आहे. तिचा पोषाख हिंदू पद्धतीचा असतो तो यामुळंच."

अस्लमकाकांच्या तोंडून ही नवलपूर्ण हकीगत ऐकल्यापासून सुधीरच्या मनांत ती राहून राहून घोळत होती, व आत्तां खान्याबद्दलच्या गोष्टी निघून मीनाक्षीचें खाणें अगदीं साधें असतें असें जेव्हां खानसाहेबांकडून कळलें तेव्हां सुधीरला त्या गोष्टीची आठवण झाली, आणि जणूं कांहीं तरी खुलासा मनाशीं झाल्यासारखें वाटून तो अर्धवट मोठ्यांदा उद्गारला,

" हं हं. बरोबर आहे."

त्यावर खानसाहेब म्हणाले,

" समजलांत ?—तेव्हां आतां तर आमच्याकडे जेवण्याचा तुम्हांला संकोच वाटायचं कांहीं कारण नाहीं ? अं ?—"

" नाहीं."

" मग आतां गांवांतलं झोंपडं सोडा अन् इथं बंगल्यावर येऊन रहा पाहूं !"

" वा ! तेवढं मात्र नाहीं अं !—उद्यां तुम्ही जात आहांत तेव्हां काकांना सोबत म्हणून दोन दिवस इथं रहायचं मीं कबूल नाहीं बरं केलं ?—जास्त आग्रह कां बरं ?—"

" अच्छा, अच्छा ! जैसी आपकी मर्जी !—"

असें म्हणून खानसाहेब हंसले व त्याच वेळीं अस्लमकाकांनीं पुढें केलेली गुडगुडीची नळी हातीं घेऊन ती त्यांनीं तोंडांत घातली.

गुड् गुडक् गुडक् गुड् गुड् ! असा गुडगुडीचा आवाज सुरू झाला.

तो आवाज ऐकून, गुडाखूचा खुशबू घेऊन व दिवाणखान्यांतल्या एकंदर वैभवसूचक वस्तूंकडे पाहून सुधीरला त्या क्षणीं वाटलें,

कोठल्या या अकल्पित विलासपूर्ण स्थळीं आपण आलों !—

—आणि कोठल्या या नवीन सुगंधमय विकारानें आपल्या हृदयाचा सारा प्रान्त दरवळून सोडून कांहीं एक सूक्ष्म अवर्णनीय अस्वस्थता आंतल्या आंत उत्पन्न केली !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं खानसाहेब बांदेषकडे निघून गेले.

गाण्याच्या तालमीसाठीं खोलीकडे जातांना मीनाक्षीनें दिवाणखान्याच्या एका खिडकींतून हळूच पाहिलें तों एका टेबलापुढें शेजारीं शेजारीं खुर्च्या मांडून अस्लम व सुधीर बसले होते त्यांच्या पाठमोऱ्या आकृति तिला दिसल्या. ते कामांत गढले आहेत असें पाहून ती तशीच पुढें गेली.

दुपारची जेवणाची वेळ होईपर्यंत अस्लम व सुधीर कामांतच गढले होते व त्यामुळें मीनाक्षीहि दिवाणखान्यांत गेली नाहीं. जेवण झाल्यावरहि पुन्हां त्या दोघांनीं काम सुरू केलें, व तें पाहून तीहि आपल्या उद्योगाला लागली.

तिसऱ्या प्रहरानंतर कॉफीच्या वेळेस जेव्हां ती दिवाणखान्यांत गेली तेव्हां मात्र आतां पुन्हां त्या दोघांना काम सुरू करूं द्यावयाचें नाहीं असें तिनें मनाशीं ठरविलें, व डॉ. अस्लम कॉफी संपवून कप खालीं ठेवीत होते तेव्हां त्यांस ती म्हणाली,

" हूं काका, आतां तुम्ही पुन्हां काम काढून बसाल तर खबरदार अं !—उभ्या दिवसांत तुम्ही माझ्याशीं एक शब्द बोललां असाल तर शपथ ! मला अगदीं राग आला आहे तुमचा ! "

डॉ. अस्लमना तिच्या त्या बोलण्याची व त्या वेळच्या आविर्भावाची गंमत वाटली. ते हंसले व म्हणाले,

"अरे अरे! तरीच दोन कप कॉफी प्यायलीस वाटतं!—बरं बरं. रागावूं नकोस. हें बघ मी आमचं सारं काम गोळा करून ठेवतों. हं. आतां झालं?—बोल. आतां आपण खूप गप्पा मारूं. का माझ्याशीं एखादा बुद्धिबळाचा डाव खेळतेस?—"

"अस्सं? तुमचा अन् बाप्पांचा डाव आज टळला म्हणून मला धरायची आहे वाटतं वेठीला?—माझ्यावर डाव होणार हें तर ठरलंच आहे."

"बरं, मी डाव्या हातानं खेळतों मग तर झालं?"

"असं असं! जसा कांहीं त्यानं फरकच पडणार आहे खेळण्यांत! मोहरं उचलून ठेवायचं तें उजव्या हातानं काय अन् डाव्या हातानं काय एकच. इतकंच नाहीं दांतांनीं उचलून ठेवायचं कबूल केलंत तरी आमचीं मोहरीं तुमच्या दाढेखालीं सांपडायचीं तशीं सांपडणारच!"

तें ऐकून डॉक्टर मनःपूर्वक हंसले; व सुधीरहि मीनाक्षीकडे पाहून हंसला.

अस्लमनीं विचारलें,

"मग कसं खेळूं म्हणतेस?—"

"तुम्ही आपले नेहमींसारखे खेळा." असें अस्लमकडे पहात म्हणून मीनाक्षी एकदम सुधीरकडे वळली व म्हणाली, "आपण दोघं मिळून खेळूं. अं?—अन् काकांच्यावर डाव करायचा हो! आहे कबूल काका?—"

"हो हो! दोघं तरणीं माणसं एक झालेलीं पाहून बुढ्ढा घाबरेल असं तुला वाटलं होय?—हं, चल. मात्र डाव टाकायच्या आधीं नोकराला टरपेन तेल आणायला सांग. माझा पाय काल लचकला आहे तो अजूनहि दुखतोच आहे. मी एकीकडे डाव खेळतां खेळतां पाय चोळीन."

मग पट पसरला गेला, काकांनीं व मीनाक्षीनें आपापलीं बुद्धिबळें मांडलीं, डावाला प्रारंभ झाला.

सुधीर जरा अंतरावर पण मीनाक्षीच्या शक्य तितका जवळ बसला होता. प्रत्येक खेळीच्या वेळीं जें बुद्धिबळ हालवायचें मनांत योजलें असेल त्यावर हात ठेवून मीनाक्षी सुधीरकडे वळून वर मान करून पाही. "काय? हेंच टाकायचं ना?" असें शब्दांनीं विचारण्याऐवजीं नुसत्या अभिनयानेंच ती तो प्रश्न

करी, त्या वेळीं तिच्या नेत्रांचा व भ्रुकुटींचा मोठा रम्य विलास होई. सुचलेली खेळी मोठी हुषारीची आहे असें तिला एखादे वेळीं वाटे त्या वेळीं तिच्या ओठांच्या कळ्याहि विलग होऊन गंमतीचें लबाड हास्य तिच्या चेहऱ्यावर दिसे. दर वेळीं तिनें अशी वर तिरपी मान केली कीं तिची चिंचोळी हनुवटी उचलली जाई आणि तिच्या कंठप्रदेशांत उजवीकडे एक बारीक तीळ होता तो सुधीरला स्पष्ट दिसे. तिच्या त्या विलोभनीय हालचालींकडे आणि विभ्रमां-कडेच एकतानतेनें पहात रहावें अशी सुधीरच्या मनाची खरी ओढ असे, व त्यामुळें आपलें डावाकडे लक्ष आहे असा बहाणा करणें त्याला केव्हां केव्हां जड जाई.

एकदां आपली खेळी खेळून काका आतां कोणतें मोहरें कसें हालवितात तें मीनाक्षी उत्सुकतेनें पहात राहिली असतां तिनें आपल्या अधरोष्ठावर डावें बोट अधान्तरें ठेवलें होतें. त्या वेळचा त्या नाजूक बोटाचा सुंदर बांक आणि लाल-सर ओठावर आहे कीं नाहीं असें वाटणारें हास्य तन्मयतेनें पाहतां पाहतां सुधीरच्या मनांत विचित्र विकार आले. क्षणमात्र त्याच्या मनांत असाहि विचार आला कीं वास्तविक मीनाक्षीचा विवाह तिच्या पित्यानें सव्यदर्शी ठर-विला असतांना आपण तिच्याविषयीं आसक्त असावें हें पाप आहे, आपली आसक्ति आपण आपल्या बोलण्याचालण्यांत उघड करावी हें तर त्याहून मोठें पाप आहे, आणि मीनाक्षीच्या मनांत उत्पन्न होणारा आपल्याविषयींचा प्रेमभाव आपण उत्तेजित करावा हें तर——

पण लगेच त्याचें मन म्हणालें——

मीनाक्षीच्या मनांत सव्यदविषयीं यत्किंचितहि प्रेम नाहीं हें जर तिच्या बोलण्याचालण्यांत स्पष्ट दिसत आहे, इतकेंच नव्हे तर ती व आपण दोघेंच एकटीं केव्हांशीं बोलत असतां सव्यदविषयींचा तिटकाराच जर तिच्या बोल-ण्यांत मुद्दाम दर्शविला गेला होता,——

——आणि आपला प्रेमोपहार तिला रुचत असल्याचें जर तिच्या शब्दांवरून व कृतीवरून स्पष्ट दिसत आहे, तर——

——मग तिच्या मुखमंडलावरचे हे विविधसुंदर विलास पाहतांना आपल्या अंतःकरणांत कांहीं एक तीव्र तृष्णा उद्भवली तरी काय विघडलें ?——

अशा विचारानें शंकांचे पायबंद तोडून टाकून त्यानें आपल्या व्याकुळ

दृष्टीला मोकळें सोडलें कीं मीनाक्षीकडे पाहतां पाहतां तिचें तें वदनबिंब वाढत चाललें आहे व शेवटीं त्यानेंच सारें आकाश व्यापलें आहे असा त्याला भास होई! त्याला वाटे मीनाक्षी व आपण येवढींच कोठें तरी उंच हवेंत तरंगत आहोंत; व अशा वेळीं पटावरचीं तीं बुद्धिबळें ठिपक्या ठिपक्यासारखीं भासत व समोर बसलेल्या अस्लमकाकांची मूर्तिदेखील उंच डोंगरावरून खालच्या शेतांत उभें केलेलें खोटें बुजगावणें दिसावें तशी त्याला भासे!—

इतक्यांत काका मोहरें टाकीत व लगेच एक मोहरें टिचकींत धरून मीनाक्षी सुधीरकडे मान वळवी व हंसून म्हणे,

"अं?—"

सुधीर कसाबसा भानावर येई व काय म्हणे तें त्याचें त्याला माहीत!

* * *

डाव संपल्यावर समुद्रकांठीं फिरावयास जाण्याची कल्पना मीनाक्षीनें काढली.

पायावर तेल चोळीत अस्लम म्हणाले,

"बेटा, मला माफ कर. माझा पाय अगदीं जाया आहे बघ. तुम्ही जा मात्र. मी पडतों व्हरांड्यांत आरामखुर्चीवर."

* * *

डॉ. अस्लम खुर्चीवर पडले तों जरा वेळानें त्यांना जुबेदा व्हरांड्यांतून जातांना दिसली.

त्यांनीं विचारलें,

"क्यं जुबेदा! तूं नाहीं गेलीस फिरायला मीनाबरोबर?"

"नहीं जी!—मला आज सैंपाकाकडे जरा नजर ठेवायची आहे म्हणून जातां नाहीं आलं."

असें म्हणून जुबेदा लगबगीनें आंत गेली.

* * *

सुधीर व मीनाक्षी फिरून परत आलीं तेव्हां त्यांच्याबरोबर आलेला जेवर त्यांच्या पुढें धांवला, व अस्लमकाकांच्या जवळ येऊन व त्यांच्या खुर्चीवर पुढचे पाय टेंकून मोठमोठ्यानें भोंकला.

डॉ. अस्लमनीं त्याचें मस्तक थोपटीत म्हटलें,

" हां हां, बेटा क्या हुवा ? क्या हुवा ? "

जेवर अधिकच आवेशानें भुंकूं लागला, व भुंकतांना त्यानें पुनः पुन्हा मान वळवून सुधीर व मीनाक्षी यांच्याकडे बोट दाखविल्यासारखी मान हालविली.

तें पाहून मीनाक्षी गोंधळली.

तिला वाटलें समुद्रतीरावरच्या एकान्तांत, चांदण्याच्या दैदीप्यमान शुभ्र पांघरुणांत, आणि लाटांच्या गंभीर शब्दांच्या आक्रोशानें, जे गुप्त, उन्मत्त प्रणयप्रलाप आपण व सुधीरचंद्रानें केले ते ऐकून घेऊन हा चहाडखोर जेवर काकांना सांगत आहे !

व्हरांड्याच्या पायऱ्या चढल्यावर काकांच्या खुर्चीपाशीं थांबण्याऐवजीं ती पार आपल्या खोलीकडे पळाली.

# प्रकरण १८ वें

## जीवित कीं स्वप्नमालिका ?




नाक्षी आपल्या खोलींत एका कोचावर बसून कशिद्याचें काम करीत होती. जवळच्या पलंगाजवळ उभें राहून जुबेदा मीनाक्षीच्या पोलक्याच्या व ब्लाउझच्या नीटनेटक्या घड्या घालण्यांत गुंतली होती.

वर न पाहतां मीनाक्षी म्हणाली,

" जुबी ! "

" हां " जुबेदानेंहि तिच्याकडे न पाहतां म्हटलें.

" जुबी, तुला गरूर ( गर्व ) आहे नाहीं फार, कीं आपल्याला पर्शिअन भाषेंतल्या सुंदर मार्मिक म्हणी येतात म्हणून--? "

" हां—फिर् ?--"

" पाहूं. मी तुझी परीक्षा घेतें."

" क्यं ? " आश्चर्यानें कामांत थबकून डाव्या हातांत उचललेली एका ब्लाउझची बाही तशीच धरीत जुबेदा उद्गारली.

" तुझी परीक्षा घेतें." चेहऱ्यावर गांभीर्य कायम ठेवून मीनाक्षी म्हणाली, " बोल. जगांत सगळ्यांत मोठं संकट कोणतं ? "

" माणसाचं इमान सुटणं " एक पार्शिअन सुभाषित जुबेदानें सांगितलें.

" छी ! पुन्हां सांग."

" खुदाची याद न राहणं " दुसरी एक पर्शिअन म्हण जुबेदानं सांगितली.

" छी ! झूट ! " मान हालवीत मीनाक्षी म्हणाली.

" तो क्यं? तू बताव." चिडून जुबेदानें म्हटलें.

" हां, सुन ( ऐक ). जगांत सगळ्यांत मोठं संकट म्हणजे नको असलेला पाहुणा ! "

तें ऐकतांच मीनाक्षीच्या विनोदाचा रोंख जुबेदाच्या ध्यानांत आला व ती मनःपूर्वक हंसली. व आपलें नाटकी गांभीर्य टाकून मीनाक्षीहि हंसली व हंसण्याच्या आवेगांत तिनें हातीं धरलेलें कशिद्याचें काम मांडीवर टेंकलें.

हंसणें ओसरल्यावर मीनाक्षी पुन्हां म्हणाली,

" जुबी, असल्या पाहुण्यांवर तुला कांहीं इलाज माहीत आहे ?—"

तो प्रश्न ऐकून जुबेदानें गांभीर्याचा आव आणला व म्हटलें,

" हां, हां."

" कोणता उपाय ? "

" मुंबईच्या पाहुण्यावर प्रेम न करणं."

त्या उत्तराबरोबर

" जुबी !—"

असें ओरडून मीनाक्षीनें तिच्या अंगावर रेशमाची गुंडी फेंकून मारली.

मात्र तिला अंतर्यामीं अतिशय आनंद झाला हें तिच्या चर्येवर स्पष्ट दिसत होतें.

कारण जुबेदानें खरोखरच तिच्या अंतःकरणाची खरी स्थिति ओळखून मोठें मार्मिक उत्तर दिलें होतें.

परवां संध्याकाळीं खानसाहेबांकडे जे तिघेचौघे पाहुणे कलकत्त्याहून आले होते त्यांचा मीनाक्षीला मनस्वी राग येण्याचें कारण येवढेंच होतें कीं ते आल्यापासून तिला पुरुषांत जाऊन बसणें अशक्य झालें होतें व त्यामुळें तिचें व सुधीरचें एकत्र येणें व बोलणेंहि अशक्य होऊन बसलें होतें, इतकेंच नव्हे तर दृष्टि-भेटीचा आनंदहि दुर्मिळ होऊन बसला होता.

मीनाक्षीला स्वातंत्र्य होतें खरें; पण अगदींच केवळ धंद्यानिमित्त म्हणून खानसाहेबांकडे आलेल्या पाहुण्यांच्याहि समोर ती जाणें शक्य नव्हतें. ते पाहुणे सारखे खानसाहेबांशीं बोलत दिवाणखान्यांत असत; व अस्लमकाका व सुधीरहि दिवाणखान्यांतच एका कोंपऱ्यांत आपलें काम करीत बसत. त्यामुळें परवांपासून आज तीन दिवस मीनाक्षीला दिवाणखाना वर्ज्य असल्यासारखें झालें होतें; व सुधीर जरी रोज संध्याकाळीं ठरीव क्रमाप्रमाणें बंगल्यावर येत होता तरी त्याच्याशीं बोलण्याची संधि मीनाक्षीला एकदांहि मिळाली नव्हती.

या कारणासाठीं ती कलकत्त्याच्या पाहुण्यांवर चिडली होती, व 'जगांतलं सगळ्यांत मोठं संकट म्हणजे नको असलेला पाहुणा' हें नवीन सुभाषित तयार करून तिनें आपल्या मनांतील चीड जुबेदाजवळ व्यक्त केली होती.

सुधीरलाहि त्या पाहुण्यांचा तितकाच राग आला होता. पण मीनाक्षीनें आपला राग जुबेदाजवळ बोलून दाखविला तसा तो प्रगट करायला त्याला वाव नव्हता. उलट, शिष्टाचार संभाळण्यासाठीं त्याला त्या पाहुण्यांशीं मोठ्या प्रेमानें वागण्याचें नाटक करावें लागत होतें; आणि पाहुण्यांचा पाहुणचार कसा करावा याबद्दल खानसाहेबांनीं जर त्याला अगत्यानें सल्ला विचारला तर पाहुण्यांच्याविषयीं मोठा अगत्यभाव दाखवून खानसाहेबांशीं बोलणें त्याला भाग पडत होतें.

आत्तां असेंच झालें.

खानसाहेब व त्यांचे पाहुणे यांचें कांहीं बोलणें चाललें होतें तें संपलें, ते सगळे मिळून बाहेर फिरावयास जाणार होते म्हणून मोटार तयार होऊन आगाशीखालीं येऊन उभी राहिल्याचा आवाज झाला, कपडे करावयासाठीं म्हणून पाहुणे आपल्या खोलीकडे गेले, व खानसाहेब, सुधीर व अस्लम कामांत गढले होते त्यांच्याजवळ येऊन, एक पाय एका खुर्चीवर ठेवून, वांकून म्हणाले,

"कमाल आहे बुवा, किती काम करतां तुम्ही दोघे?—उठा, कपडे करा. गाडी आली."

किंचित् त्रासानें अस्लमनीं विचारलें,

"आतां कुठं जायचं?—तुझ्या या पाहुण्यांच्याबरोबर नाचायची ही एक नवी ब्यादच आली म्हणायची!"

"श्! वा! अरे पाहुणे धंद्यासाठीं आले हें खरं. पण त्यांची सरबराई उत्तम नको करायला?"

हें म्हणतांना खानसाहेबांनीं सुधीरकडे पाहिलें, व त्यानें "हो, हो, तर!" अशा अर्थीं चेहरा करून मान हालविली.

खानसाहेब सुधीरला म्हणाले,

"आणि तुमच्या मुंबईंत गोष्ट वेगळी असते हो! पाहुणा आला तर त्याची करमणूक करायला हजार साधनं असतात! आमचं हें धेनुकुंज मोत्याची पेठ आहे. पण कांहीं झालं तरी हें गांवढंच! इथं आम्ही पाहुण्यांचा वेळ हलका

कसा करायचा ?—त्यांना मोटारींत फिरवलं, शिकारीला नेलं, हें तें झालंच कीं संपलं !--अधिक काय करणार आम्ही ?--तुम्ही सांगा सुधीरचंद्र तुम्हांला कांहीं नामी प्रोग्रॅम सुचत असला तर."

सुधीर चटकन म्हणाला,

"एक सुचवितों गोष्ट--पण ती या पाहुण्यांइतकीच माझ्या स्वतःच्यासाठीं आहे. तुम्ही मला अप्पलपोटा म्हणूं नका."

"छे छे ! काय हें बोलणं ?—सांगा."

"तुमच्या खांसाहेबांचं गाणं करा ना. मला फार फार ऐकायचं आहे. किती दिवस म्हणतों आहें आपणांला विनंति करीन म्हणून. पण संकोच वाटे. आत्तां ओघानंच निघालं तेव्हां म्हटलं ढकलावं घोडं पुढं--"

"वा वा ! बहोत अच्छी बात निकली ! फार सुंदर सुचवलंत. ठरलं. उद्यां रात्रीं बसवूं खांसाहेबांना. या दोनतीन महिन्यांत ते बसले नाहींच आहेत. अच्छा !--चलिये चलिये ! कपडे कर लीजिये !--"

मग सुधीर, अस्लम, सारीच मंडळी दिवाणखान्यांतून बाहेर पडली, व मोटारकडे आली.

मोटारींत बसण्यापूर्वी सुधीरनें झटकन मान वळवून मीनाक्षीच्या खोलीच्या बाजूला नजर फेंकली.

पण तेथें कोणीहि नव्हतें !

सुधीर चिडून गाडींत चढला व त्याच्या बुटाचा पाय एका पाहुण्याच्या नडगीला लागला. पाहुण्यानें हाय केलें तें ऐकून त्यानें म्हटलें,

"उः ! माफ करा हं."

"नही, कुच नही !" पाहुणा म्हणाला.

सुधीरनें पुन्हां दिलगिरी प्रदर्शित केली, पण मनांत म्हटलें,

"मेला कां नाहींस एकदांचा !"

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नित्यक्रमाप्रमाणें सुधीर पत्रें टाकावयासाठीं पोस्टांत गेला. त्यानें पत्रें टाकलीं, व मग त्याला साबण विकत घ्यावयाचा होता म्हणून तो पोस्टासमोरच्या एका दुकानाकडे वळला.

तो दुकानांत शिरत होता इतक्यांत त्या दुकानाला लागून असलेल्या एका छोट्या विडीकाडीच्या दुकानापुढें एक इसम त्याला दिसला, व तो दिसतांच सुधीर एकदम चमकून उभा राहिला. किंचित् आड होऊन त्यानें त्या इसमाकडे निरखून पाहिलें.

विकत घेतलेल्या विड्यांपैकीं एक त्या इसमानें शिलगावून तोंडांत धरली होती, व डाव्या हाताचा तळवा त्यानें दुकानदारापुढें धरला होता. त्यानें एका पैच्या विड्या घेतल्या असाव्यात. कारण दुकानदारानें आपल्या लांकडी पेटींतला गल्ला खळखळ वाजवून त्याचें झांकण मोठ्या ऐटीनें फट्दिशीं मिटलें व त्या इसमाच्या हातावर दोन पै ठेवल्या.

सुधीरनें अगदीं निरखून पाहिलें, व तो मनाशीं म्हणाला,

" तोच हा. पण—"

त्याचें मन किंचित् घोंटाळलें. कारण, कलाबतूच्या किनारीचा चढाव, चौकड्याची रेशमी लुंगी आणि जरीकामाची टोपी अशा थाटाच्या पोषाखांत आणि मदीना हॉटेलच्या मॅनेजरच्या अंगावर पांच नोटा बेफिकिरीनें फेंकतांना दिसलेला इसम, आणि मळकट लुंगी नेसलेला, बोडका आणि अनवाणी, आणि दोन पै मोठ्या आस्थेनें हातांत मोजून घेतांना आत्तां दिसत असलेला इसम एकच आहेत हें क्षणभर सुधीरला खरें वाटेना—

तथापि सुधीरचें मन फार वेळ शंकित राहिलें नाहीं. कारण त्या व्यक्तीचा वेष बदलला असला तरी त्याची ती पैलवानी ऐट, ती उणीपुरी उंची, आणि हाताची ती राकट ठेवण या गोष्टी पाहतांच शंकेला जागाच उरण्यासारखी नव्हती.

" खचित तोच ! "

असें मनाशीं उद्गारून सुधीर साबण घ्यावयासाठीं आंत शिरण्याऐवजीं बाहेर पडला, व जणूं विडीच्याच दुकानांत त्याचें काम होतें अशा सहजपणानें त्या दुकानापुढें थांबला.

" दोन पैशांच्या विड्या द्या हो " असें म्हणून त्यानें खिशांतली एक आणेली दुकानदारापुढें फेंकली.

दोन पैशांच्या विड्या घेऊन ओढणाऱ्या गिऱ्हाइकासारखा सुधीरचा वेष किंवा आविर्भाव नव्हता त्यामुळें दुकानदारानें त्याच्याकडे जरा साशंक नजरेनें

पाहिलें. पण येवढें मोठें फॅशनेबल गिऱ्हाईक आपल्या दुकानाच्या कट्ट्याजवळ उभें राहिलेलें पाहून त्याला जरा गुदगुल्याच झाल्या. सुधीरकडे पाहून हंसून

" जी "

असें मोठ्या अदबीनें म्हणून तो उठला, व उंचावरच्या कप्यांतलें अगदीं स्पेशल बंडल काढून त्यांतल्या विड्या त्यानें झरझर मोजल्या.

त्या सुधीरच्या हातीं देतां देतां

" बडी फर्मास हय बिडी. देख लीजिये."

असें म्हणून त्या दुकानदारानें त्या विकत दिलेल्या विड्यांखेरीज आणखी एक विडी बंडलांतून काढली व ती काड्याच्या पेटीवर ठेवून पेटी व विडी सत्काराच्या आविर्भावानें सुधीरपुढें केली.

सुधीरचें लक्ष त्याच्या बोलण्याकडे नव्हतें. तो त्या पैलवानी बांध्याच्या इसमाकडे अगदीं लक्षपूर्वक पहात होता, व मनाशीं म्हणत होता,

" तोच. शंकाच नको.—पण ही स्वारी इथें कां ?—अन् अशा भिकार वेषांत कशी ?—याचा अन् सय्यदचा कांहीं संबंध आहे कीं काय ?—"

" लीजिये मेहेरबान " दुकानदारानें पेटी व विडी आणखी पुढें करून सुधीरला म्हटलें.

" नको, नको. माफ करा. असूं द्या. मला आत्तां नाहीं ओढायची विडी."

" असं ?—आपण इथें पाहुणे आहांत—अं—होय ? "

" हं."

" किधरसे आये ?—मार्मुगोवा ?—तो बेलगांव ?—"

" नाहीं. मुंबई."

मुंबई हा शब्द ऐकतांच तो धिप्पाड मनुष्य चमकला तें सुधीरला स्पष्ट दिसलें.

मग दुकानदारानें परत दिलेले सुटे दोन पैसे खिशांत घालून तो तेथून निघाला; कोंपऱ्यावर वळतांना त्यानें हातांतल्या सगळ्या विड्या रस्त्याच्या कडेला टाकून दिल्या व त्या उंच धिप्पाड माणसाविषयीं विचार करीत तो पुढें गेला.

साबण खरेदी करण्याची गोष्ट त्याच्या लक्षांतच राहिली नाहीं !

सुधीरनें विड्या टाकून दिल्या तें दुकानदाराला दिसलें, व तो विस्मयानें त्या धिप्पाड गृहस्थाला म्हणाला,

" वा ! क्या अजीब आदमी ! देख याकुब."

" क्यं ? " दुकानदारानें बोट दाखविलें म्हणून मान वळवून याकुब उद्गारला.

" पहा, त्या मुंबईच्या गृहस्थानं साऱ्या विड्या रस्त्यावर खुशाल फेंकून दिल्या ! अन् मी मारे त्याला माझी अस्सल फर्मास बिडी निवडून दिली. प्यायची नव्हती तर खरेदी कशाला केली बेव्यानं विडी ! अफसोस ! ये बंबईवाले साहेब बडे अवलाद रहते हय !—"

याकुबनें कपाळाला आंठी घातली, दांतांत धरलेली विडी जोरानें चावली व चाळविली, आणि म्हटलें,

" हां. बडे अवलाद—"

*   *   *

रात्रीं गाण्याच्या वेळीं खानसाहेबांच्या बंगल्यांतील दिवाणखान्याला कांहीं वेगळीच शोभा आली होती. पांढरी स्वच्छ परीटघडीची बिछायत सबंध दालनभर तंग पसरली होती, आणि रोजचे गालिचे व रुजामे काढून दोन्ही बाजूंना अतिशय उंची गालिच्यांची मांडणी केली गेली होती, त्यांचे भडक चित्रविचित्र रंग त्या सफेत बिछायतीमुळें उठून दिसत होते. ठिकठिकाणीं मांडलेल्या लोडांवर उंची साटिणीचे अभ्रे चढले होते, व प्रत्येक लोडाच्या दोन्ही टोंकांना असलेल्या सरकपदराला जे झरमिळ्यांचे गोंडे होते ते मोठ्या आढ्यतेनें फटीफटींत रुळत होते. सतत सेंटच्या पेटींत दाबून ठेवलेले उंची पडदे खिडक्यांना व दरवाजांना बसविले होते व त्या पडद्यांना वाऱ्याच्या झोतानें मिळणाऱ्या प्रत्येक झोंक्याबरोबर मंद, अस्पष्ट सुगंधाची चोरटी हालचाल सगळ्या दिवाणखान्यांत झाल्यासारखी वाटे. तऱ्हेतऱ्हेच्या फुलदानांत गुच्छ घालून अंतराअंतरावर मांडले होते. त्यांतील फुलांचा सुगंधाचा अभिमान त्या सेंटच्या वासापुढें व्यर्थ ठरत होता, आणि त्यामुळें ईर्षेला पेटूनच कीं काय तीं आपल्या रंगांच्या मोहानें लोकांस आकर्षित करण्यासाठीं आपलें तें वैचित्र्यपूर्ण वैभव अधिकच मिरवीत होतीं. दिव्यांचा प्रकाश इतका झगझगीत केला होता कीं या स्थळीं एखादा नवीन सूर्यच उगवला आहे कीं काय अशा भ्रमानें बाहेरचीं चंद्रकिरणें व्हरांड्यांत येऊन तेथूनच स्तिमित होऊन परतल्यासारखीं वाटत होतीं.

आमंत्रित मंडळी जमूं लागतांच सर्वांचें स्वागत करून ज्याला त्याला योग्य मानाच्या जागीं बसविण्याचें काम देवशरणनें केलें. जवळजवळ सगळ्यांच्या मागून सय्यद आला. खानसाहेबांनीं त्याला स्वतः मोठ्या प्रेमानें हातांत हात धरून आणून उजव्या बाजूच्या अगदीं पहिल्या लोडाजवळ बसविलें.

सुधीर त्याच्या खालच्याच जागेवर होता. खानसाहेबांनीं सय्यदला आणून बसविलेलें पहातांच त्याच्या मनांत आलें,

" अस्सं. भावी जांवई म्हणून हा सन्मान दिसतो आहे!—पण—पण हा सय्यदच का होणार खानसाहेबांचा—"

तितक्यांत सय्यदची व त्याची दृष्टादृष्ट झाल्यामुळें त्याला तोंडावर हास्य दाखवून बंदगी करावी लागली.

त्यानें सय्यदकडे पाहिलें तों त्याचा पोषाख अमीराला साजण्यासारखाच उंची होता. सय्यद त्याच्याजवळ बसला तेव्हां त्याच्या त्या शेरवाणीच्या उंची कपड्याचा सळसळाट झाला व त्याच्या कपड्यांवरील खुशबूचा दर्प सुधीरच्या नाकांत शिरला.

सुधीरच्या स्वतःच्या अंगांत एक साधा रेशमी शॉर्ट कोट होता व डोक्याला साधी घडीची टोपी होती. समोरच्या भिंतीच्या भव्य आरशांत स्वतःचें व सय्यदचें अशीं दोन प्रतिबिंबें त्याला जवळ जवळ दिसलीं, त्यांकडे पहात त्याचें मन म्हणालें,

" या रुबाबदार, विलासी, सुंदर तरुणापुढं मी कसासाच दिसत असेन! मग मीनाक्षी—"

त्याबरोबर त्याची दृष्टि झिरझिरीत उंची पडद्यांनीं विभागलेल्या पलीकडच्या खोलीकडे सहजच वळली. तेथें मीनाक्षी बसली होती.

सुधीरच्या मनांत त्या क्षणीं एक विचित्र कल्पना आली.

त्याला वाटलें जणूं येथें गाणेंबिणें कांहीं नसून मीनाक्षीच्या स्वयंवरासाठीं सज्ज केलेला हा मंडप आहे. दूरदूरचे तरुण स्वयंवराच्या समारंभासाठीं आले आहेत. त्या पलीकडच्या दालनांतून मीनाक्षी जुबेदाचा हात धरून येत आहे. तिनें एकदां थबकून सर्व मंडळींकडे नजर टाकली, सय्यदकडे पाहून तिरस्कारानें मान फिरविली, आपल्याकडे पाहतांच मधुर हास्य केलें व जवळ येण्यासाठीं तिनें पाऊल पुढें टाकलें तोंच—

वाटेंत दोन तंबोरे होते त्यांत ती अडखळून पडली, ती भिऊन ओरडली, तंबोरे फुटल्याचा आवाज झाला, सारे लोक !—

सुधीर दचकला व भानावर आला.

म्हणजे दिसलें तो भासच तर !

भासच तर काय ? तंबोरे फुटले कुठले ? ते पहा खांसाहेब येऊन आपल्या आसनावर बसले आहेत व तंबोरे हातीं घेऊन जुळवीत आहेत. टंव् ! टंऽव् ! टंऽऽव् ! टंव् टंव् !

ओ हो ! काय सुंदर जोडाच्या तारा जमल्या !

तितक्यांत देवशरण आला व खालीं वांकून सय्यदच्या कानांत सांगूं लागला,

" आपल्याकडे एक इसम आला आहे."

" या वेळीं ? " सय्यदनें तुच्छतेनें म्हटलें, " जा म्हणावं."

" जात नाहीं तो. म्हणतो अतिशय महत्त्वाचं—"

" च् !—" असें उद्गारत सय्यद उठला व गेला.

सुधीर शेजारीं बसलेल्या अस्लमना म्हणाला, " काका, तहान फार लागली आहे हो."

" मग माझ्या निजायच्या खोलींत सुरई आहे कीं. मी येऊं का बरोबर ?—"

" छे छे ! " असें म्हणून सुधीर उठला, व अस्लम ज्या खोलींत निजत असत तिकडे गेला.

ती खोली बंगल्याच्या अगदीं मागच्या बाजूस होती.

सुधीरनें सुरईतून पेल्यांत पाणी घेतलें व तोंडांत मोठी चूळ घेऊन ती टाकण्यासाठीं तो खिडकीजवळ गेला. तेथें वांकून तो चूळ टाकणार तोंच—

बंगल्याच्या सावलीच्या अंधारांत दोन आकृति—

सय्यद व तो सकाळचा धिप्पाड इसम त्याला दिसले.

सुधीरनें एकदम चूळ टाकण्याऐवजीं गिळली व खिडकीच्या फळीआड होऊन तो कानोसा देऊन ऐकूं लागला.

"—स् ! चूप ! याकुब, हैवान ! पुन्हां इथं कशाला मरायला आलास ?— अन् इथं कशाला ? "

" —मग ?—कुठं भेटूं ?—बंगल्यावर तुम्ही नोकरांना सक्त ताकीद देऊन मला बंदी—मग कुठं गांठूं—? "

" पण—काम—? "

" मला—पैसे—"

" सुव्वर !—शैतान—लेव—"

मग त्या धिप्पाड माणसाची आकृति खालीं समुद्रतीराकडे गेलेली सुधीरला दिसली, व सय्यदनें खिशांतून सिगारेट काढून पेटविली तिचें टोंक एखाद्या निखाऱ्यासारखें दिसलें.

सय्यद परत येईल त्या वेळीं आपण तेथें आपल्या जागेवर नसलों तर कदाचित् आपल्याविषयीं त्याला शंका येईल अशी सुधीरच्या मनांत कल्पना आली. म्हणून त्यानें सुरई आवाज न करतां जागच्या जागीं ठेवली व तो दिवाणखान्यांत गेला. सय्यद जवळजवळ त्याच्या मागोमागच येऊन बसला.

सुधीरनें हळूच चोरट्या नजरेनें त्याची चर्या निरखून पाहिली. त्या चर्येवर अस्वस्थता तर स्पष्ट दिसतच होती. परंतु सय्यदचा व त्या उंच, धिप्पाड याकुबचा काय संबंध असावा याबद्दल सुधीरला तर्क करतां येईना ! त्याच्या मनांत आलें या सय्यदनें—

तितक्यांत खांसाहेबांनीं गावयास प्रारंभ केला व मग सुधीरचे हे विचार बंद झाले. सकाळपासून निरनिराळ्या लहानमोठ्या घटनांनीं निरनिराळ्या प्रमाणांत चाळविल्या गेलेल्या त्याच्या वृत्ती खांसाहेबांचा तो पहिला भरदार सुरेला हुंकार ऐकतांच एकदम शान्त झाल्या, आणि गाण्याच्या प्रगतीबरोबर त्याची ती शान्ति वाढतच गेली. खांसाहेबांचें गाणें अलौकिक दर्जाचें आहे हें त्याच्या लक्षांत यावयास वेळ लागला नाहीं, व आवाजीचा अदमास घेण्यापुरतें तिच्याशीं खेळून जेव्हां खांसाहेबांनीं भर जोसानें गावयास प्रारंभ केला तेव्हां सर्व श्रोत्यांप्रमाणेंच सुधीरहि भान विसरून ऐकूं लागला.

त्याला वाटलें हें गाणें नव्हे तर विश्वांतलीं नानातऱ्हेचीं सौंदर्यें स्वरमालांच्या पाशांत धरून खांसाहेब आपल्यापुढें खडीं करीत आहेत. खांसाहेबांच्या कंठांतून जसजशा स्वरमालिका उसळत तसतशीं उदात्त, गंभीर, चंचल, अस्थिर अशीं हजार प्रकृतीचीं सौंदर्यस्वरूपें आपल्या नेत्रांना स्पष्ट स्पष्ट दिसत आहेत असा सुधीरला भास होई. वृक्षराजींनीं आच्छादिलेले उंच उंच पहाड, त्यांच्या

शिखरांशीं शिवाशिवी खेळल्यासारखें करून फिरणारे निळे काळे प्रचण्ड मेघ, त्यांच्या गंभीर गर्जना आणि भव्य दऱ्याखोऱ्यांत उठलेले त्या गर्जनेचे प्रतिध्वनि त्याला त्या गाण्यांत आहेतसें वाटलें. खवळलेल्या दर्यांच्या चारचार पांचपांच पुरुष उंच उठणाऱ्या लाटा, त्या अजस्र लाटांचा कोप शान्त करण्यासाठीं वरुणदेवतेनें वरून सोडलेल्या सहस्र जलधारा, आणि जणूं पंचमहाभूतांचा धिंगाणा थांबावा म्हणून वाजलेल्या इंद्रवज्ररूपी प्रचण्ड प्रतोदाचा कडकडाटहि त्यांत होता. एकाला एक लागलेले ताज्या फळांफुलांनीं बहरलेले बगीचे, त्या बगीचांतील कुंजांच्या एकान्तांत प्रणयी जोडप्यांनीं एकमेकांच्या कानांत सांगितलेले प्रतिज्ञेचे प्रीतिशब्द, आणि त्या प्रीतिवचनांचा जणूं उपहास करण्यासाठीं पंख फडफडावीत त्यांच्या डोक्यावरून उडत जाणारे विहंगवृंदहि त्या गाण्यांत दृग्गोचर होत होते. आकाशाच्या पूर्वभागीं भव्य इंद्रधनुष्य उमटलें असतांना एखाद्या गुलाबदाणींतून शिडकाव व्हावा तद्वत् पडणाऱ्या कोंवळ्या पावसाचें मार्दव, हिरव्याचार कुरणांत सकाळच्या प्रहरींच मकणाऱ्या दंवबिंदूंचा ताजेपणा, संकेतस्थळीं वल्लभाला भेटावयासाठीं निघालेल्या कामिनीच्या पावलांची लाडकी घाई, फार दिवसांनीं भेटलेल्या पराक्रमी पुत्राला डोळे भरून पाहण्यापूर्वींच डोळे भरून टाकून उत्कण्ठ आईची दृष्टि अंधुक करणाऱ्या अश्रुधारांतील पवित्र वात्सल्य, आणि आईची मूर्ति दृष्टीस पडतांच खेळण्याचा मोह सहज टाकून तिच्याकडे धांवणाऱ्या बालकाच्या बोबड्या हांकेंतील शुद्ध प्रीतीचा पडसाद— अशा अनंत प्रकारांनीं विश्वांतील सौंदर्य आपण पहात आहोंत व ऐकत आहोंत असें सुधीरला वाटलें.

त्याच्या अंतःकरणांत कांहीं एक अवर्णनीय निर्विकल्प आनंद त्या वेळीं इतका भरला कीं राग, खेद, चिंता, महत्त्वाकांक्षा, यांपैकीं कशालाच जागा उरली नाहीं.

त्याची प्रणयाची भावना मात्र विरली नाहीं. उलट त्याला सारखें वाटत होतें कीं, ज्या या विश्वांत नानाविध सौंदर्याचा उल्लास चालला आहे तेथें आपलें दिव्य प्रेम सफल झालेंच पाहिजे.

तितक्यांत गाणें संपलें, तंबोऱ्यांच्या तारांच्या नादाचे अखेरचे अवशेषहि हवेंत विरले, आणि—

मोठा धक्का बसल्यासारखा सुधीर भानावर आला—

त्याला वाटलें आपल्या हृदयावर मस्तक टेंकून आपल्या बाहुपाशांत झोंपीं गेलेल्या मीनाक्षीला कोणी तरी खस्‌दिशीं हिसकून घेऊन दूर—अतिशय दूर नेलें.

तो मोठ्यानें आरोळी ठोकणार होता--

पण अस्लम म्हणाले,

" चला, कॉफी घ्यायची ना ? "

सुधीर गोंधळला. जें इतका वेळ सारखें दिसत होतें तें सत्य कीं हें सत्य ! कां सगळींच स्वप्नें ! जीवित म्हणजे विविध स्वप्नांची एक मालिकाच म्हणायची कीं काय ?--

त्याला कांहींच कळेना.

---

# प्रकरण १९ वें

-++++++-

## अकस्मात् पंख गळले



कलकत्त्याचे पाहुणे गेल्यानंतरची गोष्ट. एके दिवशीं सकाळीं उमरखानांची मोटार तयार होऊन आगाशीखालीं येऊन उभी राहिली. कांहीं सावकारी कामानिमित्त घेनुकुंजापासून वीस मैलांवर असलेल्या एका गांवीं जाऊन यावयाचा उमरखानांचा बेत होता, व त्यासाठीं सकाळीं गाडी तयार ठेवण्याचा हुकूम देवशरणकडून नोकराला काल मिळाला होता. पण गाडींत बसतां बसतां उमरखान ड्रायव्हरला म्हणाले,

"अरे, आपल्याला गांवाला नाहीं जायचं बरं का—"

असें म्हणत ते आंत शिरले व बसले.

ड्रायव्हरनें विचारलें,

"मग कुठं घेऊं गाडी ?—"

"गांवांत—मुंबईचे मैमान राहतात माहीत आहे ना ?—तिकडे—"

"जी."

मीनाक्षी त्या वेळीं आपल्या खोलींत होती तिनें हें सारें पाहिलें व ऐकलें होतें, आणि त्याचा तिला विस्मय वाटला होता. एक चमत्कारिक शंकाहि तिच्या मनांत चटकन येऊन गेली होती. पण ती मनाशीं म्हणाली होती,

"छी !—कांहीं तरीच !—तसं कुठलं आलं आहे ?—"

परंतु मोटारींत बसतांना बापाची जी एक चर्या तिच्या दृष्टीस पडली होती ती आठवली कीं तिला आपल्या मनांत उद्भवलेली शंका दूर करणें कठीण जाई, आणि उमरखानांना जाऊन एक तास होऊन गेला तरी ते परत आले नाहींत तेव्हां तर ती शंका तिला फारच त्रास देऊं लागली.

मनांतली अस्वस्थता फारच वाढली तेव्हां ती अस्लमकाकांच्या खोलींत गेली.

एका वेताच्या खोलगट खुर्चीत पडून अस्लमकाकांनीं आपली शून्य दृष्टि छताकडे लावली होती, व मनांतली कांहीं अस्वस्थता शक्य तेवढी घालविण्याचा

प्रयत्न करणाऱ्या माणसाप्रमाणें ते आपल्या उजव्या हाताच्या पांची बोटांचीं टोंकें डाव्या बोटांच्या टोंकावर आपटीत होते.

मीनाक्षीनें खोलींत शिरतांना

" काका "

अशी हांक मारली तेव्हां ते थोडेसे दचकले व झट्दिशीं चाळवाचाळव करून जरी ते सरळ बसले, व " क्यं ?--ये बेटा." असें म्हणाले तरी त्यांच्या त्या चळवळींत व शब्दांत सहजपणा नव्हता हें मीनाक्षीच्या चटकन लक्षांत आलें.

शेजारच्या खुर्चीवर बसत तिनें विचारलें,

" काका, तुमच्या कांहीं एकाग्र विचारांत मीं व्यत्यय आणला ?—तुम्ही जणूं कांहीं फिकिरींत असल्यासारखे आतां दिसत आहांत—"

" हेः ! वेडी !—कां ऽ हीं नाहीं. उलट तुझीच मुद्रा आज सुकल्यासारखी दिसत आहे."

यावर मीनाक्षीनें झटकन तोंड खालीं केलेलें पाहून अस्लम म्हणाले,

" बघ, तोंड चुकवते आहेस. ए पोरी, वर बघ पाहूं ?—"

तिनें वर पाहिलें, परंतु हंसण्याऐवजीं अधिकच गंभीर मुद्रा करून ती म्हणाली,

" काका, मी एक गोष्ट तुम्हांला विचारतें, तिचं छपवाछपवी न करतां उत्तर द्या."

कांहीं उत्तर करण्याऐवजीं अस्लम नुसते तिच्याकडे पहात राहिले.

मीनाक्षी म्हणाली,

" बाप्पा आत्तां येवढ्या सकाळीं मुद्दाम सुधीरचंद्रांच्याकडे कां गेले आहेत ?—"

हा तिचा प्रश्न ऐकतांच तिच्या मुद्रेवर दिसणाऱ्या चिंतेचें कारण अस्लमच्या लक्षांत आलें. तिच्या त्या प्रश्नाला जें उत्तर आपणांस द्यावें लागणार तें तिला क्लेशकारक होणार ही कल्पना त्यांच्या मनांत आली, व खरेंखुरें उत्तर देऊन टाकावें कीं चतुराईनें तें द्यावयाची आपली जबाबदारी चुकवावी अशा विचारानें त्यांचें मन क्षणभर द्विधा झालें. एखाद्या माणसाचा पुढें पाऊल टाकायचा निश्चय झालेला नसावा आणि तसें असूनहि तोल न आवरून त्याचें एक पाऊल पुढें पडावें तद्वत्

" बेटा मीना !—"

येवढाच शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडला, व मग पुढें कांहीं बोलण्या-ऐवजीं ते गप्प राहिले.

कारण, काल रात्रीं त्यांचा व खानसाहेबांचा जो वाद झाला होता त्या साऱ्या वादाची त्यांना आठवण झाली, व त्यांचें स्वतःचेंच चित्त व्याकुल झालें.

काल रात्रीं नेहमींप्रमाणें बुद्धिबळाचा डाव आटपल्यानंतर व मीनाक्षी दिवाणखान्यांतून उठून गेल्यानंतर खानसाहेब व अस्लम दोघेच बोलत बसले असतां, गुडगुडीची नळी एकदम तोंडावेगळी करून खानसाहेब म्हणाले होते,

" अस्लम, एक गोष्ट तुमच्याजवळ बोलायचं आज दोनतीन दिवस माझ्या मनांत घोळतं आहे."

अस्लमनीं म्हटलें, " कोणती ?—बोला कीं."

" मुंबईच्या पाहुण्यांच्याविषयीं तुमचं मत काय आहे ?—"

" इतका विद्वान, सुस्वभावी अन् पाक दिलाचा सच्चरित्र जवान मीं कधीं पाहिला नव्हता."

" हंः ! अस्लम तुम्ही भोळे आहांत. तुमचा दिल माखनसारखा मऊ आहे अन्—"

त्या त्यांच्या बोलण्याचें अस्लमना जरा आश्चर्य वाटलें. ते म्हणाले,

" काय ?—माझं मत तुम्हाला मान्य नाहीं ?—सुधीरचंद्र विद्वान नाहीं ? —सुस्वभावी नाहीं ?—"

" विद्वान आहे, सुस्वभावी आहे—नाहीं कोण म्हणतो ?—पण—पण तो पाक दिलाचा आहे हें नाहीं मला कबूल. निदान ज्या अर्थी तुम्ही त्याला पाक म्हणतां त्या अर्थी तरी म्हणायला मी तयार नाहीं."

तें बोलणें ऐकतांच खानसाहेब कोणत्या गोष्टीला उद्देशून बोलत आहेत तें अस्लमच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. पण तसें न दाखवितां त्यांनीं विचारलें,

" एखाद्या माणसाच्या स्वभावाचा माझा अदमास इतका चुकावा हें अजब आहे. तुम्हाला सुधीरचंद्राच्या सदाचारांत कोणतं वैगुण्य आढळलं बुवा ?—"

" त्याच्यावर माझे थोडेबहुत उपकार झाले आहेत हें तर खरं ना ?—"

अस्लमनीं नुसती होकारार्थी मान हालविली.

खानसाहेब म्हणाले,

" मीना अमीरसाहेबांना द्यायची असा माझा संकल्प आहे हें तर त्याला माहीत आहे ?—"

अस्लमनीं पुन्हां मानेनें हो म्हटलें.

खानसाहेब म्हणाले,

" मग मीनाकडे त्यानं बुऱ्या ( वाईट ) नजरेनं पहावं याला तुम्ही दिलाचा पाकपणा म्हणतां ? "

हा प्रश्न ऐकतांच अस्लम खानसाहेबांकडे क्षणभर पहातच राहिले, व आतां काय उत्तर द्यावें याचा त्यांनीं मनाशीं अंमळ विचार केला. मीनाक्षी व सुधीर यांच्यांत प्रतिदिवशीं वाढत चाललेला प्रेमभाव आपल्या जसा लक्षांत आला आहे तसा खानसाहेबांच्याहि ध्यानांत आलाच असला पाहिजे याबद्दल त्यांना शंका नव्हती. सुधीरबद्दल स्वतः अस्लमकाकांचें मत इतकें उत्तम झालें होतें कीं त्याच्याकडून एखादा प्रमाद झाला असता तरी त्याचें त्यांनीं कौतुक केलें असतें. आणि त्यानें मीनावर प्रेम करावें यांत तर अस्लमकाकांना विचाराअंतीं गर्हणीय असें कांहीं वाटेनासें झालें होतें. त्यांचा गुडघा दुखत होता व सुधीर आणि मीना एकत्र फिरावयास जाऊन आलीं होतीं त्या दिवशीं या दोन तरुण अंतःकरणांत कांहीं तरी नाजूक भावना उत्पन्न झाली आहे अशी त्यांना प्रथम शंका आली; व ती येतांच हें बरें कीं वाईट हें ठरविणें त्यांच्या मनाला कांहीं वेळ मुष्किल वाटलें. सुधीरचंद्रानें ही घटना टाळायला हवी होती असा विचार त्यांच्या मनांत क्षणमात्र आला. पण तो क्षणमात्रच. सुधीरची बौद्धिक व शारीरिक तेजस्विता आणि मीनाचें सर्वांगी सौंदर्य यांचा विचार करतां त्यांचा विवाह झाला म्हणून काय बिघडलें असेंच त्यांना वाटलें. ते मुसलमानी धर्मांत लहानाचे मोठे झाले होते. पण त्यांची स्वाभाविक वृत्ति उदारमतवादी आणि सौंदर्योपासक असल्यामुळें मीना व सुधीर यांच्यासारख्यांचें परस्पर गाढ प्रेम जमलें तर धर्माची किंवा संस्कृतीची आडकाठी करून तें दुखविणें चुकीचें होय हाच विचार त्यांना उत्तरोत्तर पटत गेला.

अर्थात् या बाबतींत खानसाहेबांची विचारसरणी भिन्न असणार याबद्दल त्यांची खात्री होती. एक तर खानसाहेब धर्मभावनांच्या बाबतींत अगदीं आंधळे व आततायी होते. मुसलमानानें आपल्या मुलीचा हात एखाद्या

हिंदूच्या हातीं द्यावा ही नुसती कल्पनाच खानसाहेबांचा प्रक्षोभ उत्पन्न करायला पुरेशी होती. एखाद्या धर्मांत जन्म पावलेल्या माणसापेक्षां बाट्रून दीक्षेनें त्या धर्मांत आलेल्या माणसाच्या ठिकाणीं धर्मविषयक दुराग्रह व आततायीपणा अधिक दिसतो, व त्याप्रमाणें तो खानसाहेबांत आहे हें अस्लम-काकांना पुरें माहीत होतें. आणि शिवाय या दुराग्रहाला खानसाहेबांच्या एका महत्त्वाकांक्षेची जोड मिळाली होती. अमीरसाहेबांशीं मीनाचें लग्न लावून आपल्या कुलाची खानदानी व इभ्रत वाढविण्याचें त्यांच्या मनानें घेतलें होतें, व या त्यांच्या बेतांत कांहीं विघ्न आल्यास ते आपला सारा प्रेमळपणा टाकून विलक्षण निर्घृणता धारण करतील हें अस्लमकाकांना उघड दिसत होतें.

त्यामुळें मीना व सुधीर यांच्याविषयीं त्यांना एकीकडे सहानुभूति वाटे खरी, पण दुसरीकडे या गोष्टीचे परिणाम काय होणार याविषयीं त्यांना सारखी चिंता वाटे. सुधीरबद्दलचा विषय खानसाहेब केव्हां तरी आपल्याजवळ काढणार याविषयीं त्यांना शंका नव्हती, व एकेक दिवस उलटला कीं ते आपल्या मनाशीं आश्चर्य करीत कीं खानसाहेब अजून कसे गप्प आहेत.

त्यामुळें खानसाहेबांचा तो प्रश्न ऐकतांच हा विषय निघाला कीं खानसाहे-बांशीं कसें बोलावयाचें याबद्दल त्यांनीं जें कांहीं मनाशीं योजून ठेवलें होतें त्याची याद करीत अस्लमकाकांनीं त्यांच्याकडे क्षणभर पाहिलें व मग म्हटलें,

" खानसाहेब, मन शान्त ठेवून या गोष्टीबद्दल माझ्याशीं बोलायची तुमची तयारी असेल तर मी बोलतों. नाहीं तर व्यर्थ बोलण्यांत कांहीं फायदा नाहीं."

" नाहीं, तसं कां ?—अगदीं शान्तपणानं बोलूं. सांगा—"

" सांगतों—किंवा खरं म्हणजे विचारतों. एखाद्या पुरुषाची स्त्रीवरची दृष्टि बुरी ( अनोतीची ) केव्हां म्हणतां येईल ?—त्यांचीं दोघांचीं लग्नं झालीं असलीं तर. किंवा त्यांपैकीं एकाचं लग्न झालं असेल तर. नाहीं का ? तसं नसेल—"

" पण तसं नसेल कसं ?—" एकदम आवेशानें खानसाहेब म्हणाले, " मीनाचं लग्न अगदीं विधीनं झालं नसलं तरी तें झाल्यासारखंच नाहीं का ? "

" कसं ? "

" मीं ठरवलं आहे म्हणून—"

" हं: ! तुम्ही !—"

अस्लमकाकांचा तो उद्गार एका शब्दाचाच होता पण त्यांत खोंच भयंकर होती ती खानसाहेबांना लागल्यावांचून राहिली नाहीं व ती लागतांच मन शान्त ठेवण्याच्या त्यांच्या निश्चयाला जबर धक्का बसला. ते चिडून म्हणाले,

" मी, हो, मी ! मीं ठरवलं म्हणजे ठरलंच नाहीं का ? "

" मीनाची संमति घेऊन ठरवलं असलं तर ठरलं म्हणूं. नाहीं तर—"

हें ऐकतांच खानसाहेबांच्या चेहऱ्यावर अधिकच रुष्टता दिसूं लागली व ते म्हणाले,

" अस्लम, मला तुम्हांला एकदां विचारायचंच आहे कीं तुम्ही मीनाच्या संमतीचा हा काय बडेजाव मांडला आहे ?—"

" मलाहि तुम्हांला एकदां विचरायचंच आहे कीं स्वतःच्या विचारसरणींत दोष असणं शक्यच नाहीं असा अभिमान तुम्हांला केव्हांपासून जडला आहे ?—"

" यांत अभिमानाचा भाग कुठं दिसतो तुम्हांला ?—मीना माझी लेक आहे, तिच्या हिताचा विचार करून मीं तिचं लग्न ठरवलं; हें उजूच नाहीं का ?— लग्नाच्या बाबतींत मुलीची संमति घ्यायला हवी असं धर्मानं सांगितलेलं नाहीं, अन् एखाद्या हिंदू तरुणावर तिचं मन जडलं असलं तर धर्माची अन् मुसलमानी संस्कृतीची कीर्ति राखण्यासाठीं—"

" खानसाहेब, धर्म अन् संस्कृति म्हणजे काय याचा तुम्ही नीट विचार कधीं केला आहे का ?—त्या शब्दांची उगीच पोपटपंची करण्यांत काय अर्थ आहे ?—"

हें ऐकून खानसाहेब चपापले. इतके विलक्षण तीव्र शब्द अस्लम वापरतील अशी त्यांची कल्पना नव्हती. सरळ जमीन समजून चालणाऱ्या माणसाचा पाय एकदम भस्‌दिशीं खालीं गेला म्हणजे तो जसा गांगरून पाहतो तसें त्यांनीं अस्लमकडे पाहिलें.

खानसाहेबांचा गोंधळ उडालेला पाहून अस्लमना बरें वाटलें. त्यांना तेंच पाहिजे होतें. ते पुढें म्हणाले,

" उगीच धर्माच्या अन् संस्कृतीच्या बाता करूं नका. तुमच्यापेक्षां मीं कुराणाचा अभ्यास अधिक केलेला आहे. मुसलमानी संस्कृतीचा इतिहासहि मला अधिक माहीत आहे, अन् त्यावरून मी तुम्हांला इतकंच सांगतों कीं त्या संस्कृतीचं स्वरूप देशकालाप्रमाणं नेहमीं बदलत गेलेलं आहे. अहो,

तुम्ही स्वतःला मोठे कट्टे धर्माभिमानी समजताहां, पण महमद गझनी आज जिवंत होऊन इथं आला तर तो तुम्हांला बिलकुल काफीर समजून तुमची गर्दन उडवील, समजलांत ? ”

अस्लमकाकांच्या त्या स्पष्टोक्तीनें खानसाहेब गांगरून गेल्यासारखे दिसले. मनांतल्या त्रासामुळें त्यांची भुवई वक्र झाली, व त्यांच्या हाताची वांकडी-तिकडी चाळवाचाळव झाली.

अस्लम पुढें म्हणाले,

“ तेव्हां सुधीरचंद्र अन् मीना यांचीं मनं परस्परांवर अनुरक्त झालीं असलीं तर त्यांत ‘ अफसोस ! तोबा ! ’ म्हणून अल्लाचा नामोच्चार करण्यासारखं कांहीं नाहीं ! ”

हें ऐकून खानसाहेबांना उत्तर तर कांहीं सुचेना, पण निराकार असंख्य विचारांची त्यांच्या मनांत गर्दी मात्र झाली.

अस्लम पुढें म्हणाले,

“ धर्माचं अन् संस्कृतीचं नांव तुम्ही घेतां; पण अमीरसाहेबांकडून धर्माला अन् संस्कृतीला काय मोठा उजाळा मिळतो आहे तें दिसतंच आहे. पण मीना त्याच्या घरांत दिल्यानं धर्म अन् संस्कृति राखलीं जातील असं तुम्हांला वाटतं; अन् सुधीरचंद्रासारख्या तेजस्वी तरुणावर मीनाचं मन जडलं तर केवळ त्याचा जन्म हिंदू घरांत झाला येवढ्याचसाठीं संस्कृति बुडायला लागली असं तुम्ही ओरडून उठतां !—यापेक्षां सरळ कबूल करा कीं तुम्हास आपली एक लौकिकी महत्त्वाकांक्षा पुरवायची आहे अन् त्यासाठीं मीनाचा बळी द्यायचं तुम्ही ठरवलं आहे !—”

अस्लमकाकांचा हा शेवटचा डोझ फारच जलाल होता. तो खानसाहेबांच्या घशाखालीं शान्तपणें उतरणें शक्य नव्हतें. त्यांच्या मुद्रेवर क्रोधावेश स्पष्ट दिसूं लागला व त्यांच्या कपाळावरच्या आंठ्या वाढल्या. मात्र अस्लमच्या नजरेला नजर भिडविण्याचा आत्मविश्वास त्यांच्या ठायीं उरला नव्हता; व त्यामुळें दृष्टि दुसरीकडे फिरवून ते म्हणाले,

“ अस्लम, तुम्ही आतां बरळायला लागलांत—बरळायला—समजलांत ?—माझ्या अंतःकरणांत मीनाबद्दल प्रेमाचा बुंद नाहीं असं गृहीत धरूनच मुळीं तुम्ही बोलताहांत—”

" हुः हः ! " अस्लम हंसून म्हणाले, " अन् मीनाक्षीला मुलीसारखी मानून मीं आजपर्यंत तिच्यावर प्रेम केलं तरी तिच्या लग्नाच्या बाबतींत कांहीं बोलायचा अधिकार मला नाहीं असं गृहीत धरून चालूनच मुळीं तुम्ही माझं बोलणं ऐकताहांत---! "

" अस्लम !—" एकदम वर मान करून खानसाहेब उद्गारले, व कांहीं तरी बोलणार होते.

पण त्यांना थांबवून अस्लम म्हणाले,

" नको, खानसाहेब, हा विषय आपण आतां असाच सोडूं. मी जें बोललों तेवढ्यानं सुधीरचंद्रावरचा तुमचा रोष जरा कमी झाला असला किंवा होणार असला तरी मला समाधान आहे---"

" हुंः ! मुळींच नाहीं, " खानसाहेब हिरवटपणानें म्हणाले, " मी उद्यां सकाळीं प्रथम सुधीरचंद्राकडे जाऊन त्याला बजावणार कीं मीनाच्या बाबतीं-तलं त्याचं वर्तन मला बिलकूल नापसंत आहे, अन् ती वागणूक ताबडतोब बंद झाली पाहिजे."

अस्लमकाकांनीं त्याच्याकडे न पाहतां म्हटलें,

" तुम्हांला चाहेल तें करायला तुमचे तुम्ही मुखत्यारच आहांत, पण---पण खानसाहेब, विवेकाला सोडून माणूस जें बोलतो व करतो त्याबद्दल पुढं पश्चात्ताप झाल्यावांचून रहात नाहीं हें विसरूं नका."

त्यानंतर तो वाद संपला होता, पण विंचू उतरला तरी त्याचा फणकारा चालूच आहे अशी भावना मागें रेंगाळते त्याप्रमाणें त्या वादाची आठवण अस्लमच्या मनांत रुखरुखत होती, व आत्तां मीनाक्षी त्यांच्याजवळ येऊन बसली व खानसाहेब कोठें गेले म्हणून तिनें विचारलें तेव्हां तिच्याशीं कसें बोलावें व काय बोलावें याबद्दल त्यांच्या मनाचा घोंटाळा उडून

" बेटा मीना ! "

येवढेच शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडले हें साहजिकच होतें.

अस्लम स्तब्ध राहिलेले पाहून मीनाक्षीनें कांहीं वेळ अगदीं तीक्ष्ण नजरेनें त्यांच्याकडे पाहिलें. मग ती म्हणाली,

" काका, सांगा ना ?—"

अस्लम म्हणाले,

" बेटा, काय सांगू ?—तूं अन् सुधीरचंद्रानं एकमेकांवर अनुरक्त असावं हें तुझ्या वडिलांना अक्षम्य गुन्ह्यासारखं वाटत आहे, अन् म्हणून सुधीरचंद्राला ताकीद द्यायसाठीं ते गेले आहेत."

" पण काका, तुम्ही त्यांना जाऊं कसं दिलंत ?—-"

" पोरी, तुला माहीत नाहीं. काल रात्रीं किती तरी वेळ या बाबतींत मी खानसाहेबांची समजूत घालीत बसलों होतों. आजपर्यंत आम्ही कधीं एकमेकांना बोललों नव्हतों अशीं तिखट बोलणींहि आमच्यांत झालीं. खानसाहेब शान्त विचार करतील अन् त्यांना माझं बोलणं पटेल असं मला रात्रीं वाटलं होतं. पण तसं झालं नाहीं. माणूस इरेला पेटला कीं त्याच्या कानांत सदुपदेशाचे शब्द शिरतच नाहींत."

मीनाक्षीचें लक्ष अस्लमच्या बोलण्याकडे होतेंसें दिसलें नाहीं. खानसाहेब सुधीरचंद्राकडे गेले तेथें त्यांचीं दोघांचीं काय बोलणीं होतील व काय घडेल याविषयीं कल्पना करण्यांतच तिचें चित्त गुंतलें होतें, व एखाद्या माणसाच्या मनश्चक्षूंपुढें कांहीं प्रसंगांचीं चित्रें हालत असलीं म्हणजे त्याची जशी चर्या होते तशी तिची झाली होती.

जणूं कल्पनेनें उभ्या केलेल्या चित्रांकडे पहातच ती म्हणाली,

" बाप्पा जर त्यांना कांहीं भलतंसलतं बोलले तर—-तर ते—-ते अतिशय मानी आहेत—-ते पुन्हां बंगल्यावर पाऊलसुद्धां टाकणार नाहींत !—-इतकंच काय ते मुंबईस निघूनसुद्धां जातील."

" मलाहि तीच धास्ती आहे."

" काका, तसं झालं तर तुमच्या बॅगेंतलं सगळ्यांत जालीम विष असेल तें मला द्या म्हणजे मी—-"

असें म्हणतांना तिनें आपला खालचा ओंठ अतिशय जोरानें दांतांनीं दाबला, व आंतून येणारा हुंदक्याचा कढ आणि डोळ्यांपर्यंत पोंचलेला अश्रूंचा पूर जिरविला. भावनांचा सारा आवेग फक्त एका दीर्घ निःश्वासांतच व्यक्त झाल्यामुळें तिचें वक्षस्थल कंपित होऊन जोरानें वरखालीं झालें.

अस्लमनीं तिचा हात झटकन् आपल्या हातीं घेतला व म्हटलें,

" श् ! हें काय ? असे अभद्र शब्द काय म्हणून ?—-"

" मग काय तर ? मी जर तुम्हांला सगळ्यांना नकोशीच झालें असलें तर जगून तरी काय करायचं ?—"

हें म्हणतांना तिचा आवाज रडवा आणि कांपरा झाला, आणि तिच्या नेत्रसंपुटांत सांठलेले अश्रू अनावर होऊन त्यांचे ठिपके अस्लमनीं ज्या हातांत तिचा हात धरला होता त्यावर टपकन् पडले.

*    *    *

मीनाक्षी आपल्या वियोगाच्या कल्पनेनें आंसवें गाळीत आहे असें सुधीरला एखाद्या दिव्य दृष्टीच्या सहाय्यानें दिसलें असतें तर सुधीर जो आतां हतबुद्ध होऊन आपल्या खोलींत एका आरामखुर्चीवर पडला होता तो तसा पडला नसता.

खानसाहेब त्याची भेट घेऊन नुक्तेच गेले होते, व ते जें कांहीं बोलले त्यानें सुधीरची मनस्थिति मोठी चमत्कारिक होऊन गेली होती.

खानसाहेबांनीं जर त्याला सरळ असें सांगितलें असतें कीं तुझें व मीनाक्षीचें परस्परांवरील प्रेम मला पसंत नाहीं व म्हणून तें थांबलें पाहिजे तर त्याला त्यांच्या प्रतिबंधाचा राग आला असता खरा, पण मीनाक्षीचें आपल्यावर प्रेम आहे ही गोष्ट इतरांना स्पष्ट दिसावी याचा त्याला हर्षच झाला असता. एखाद्या स्त्रीनें आपल्यावर अनुरक्त असावें यांत तर आनंद आहेच, पण तिचा आपल्यावरील अनुराग लोकांच्या नजरेस आलेला समजण्यांत कांहीं विशेषच आनंद असतो. तसल्या त्या आनंदांत खानसाहेबांच्या गैरमर्जीची सुधीरला विशेष क्षिति वाटली नसती.

परंतु हें ओळखूनच कीं काय कोण जाणे खानसाहेबांनीं आपला कार्यभाग फार निराळ्या रीतीनें उरकून घेतला होता. त्यांनीं सुधीरला असें भासविलें होतें, कीं तो ज्या वृत्तीनें मीनाक्षीशीं वागत होता ती वृत्ति स्वतः मीनाक्षीलाच बिलकुल पसंत नव्हती. तिनें त्याच्या तोंडावर तसें सांगितलें नव्हतें याचें कारण केवळ तिच्या स्वभावांतील मार्दव. आपल्या बापाचा पाहुणचार घेणाऱ्या माणसाला कठोर शब्द बोलणें तिच्या जिवावर येत होतें. परंतु आपल्या मनांतली नापसंति तिनें आपल्याजवळ व अस्लमकाकांजवळ वारंवार बोलून दाखविली होती असें खानसाहेबांनीं दर्शविलें, व आपण व डॉ. अस्लम यांनीं

सुधीरला यापूर्वींच या बाबतींत इशारा दिला नाहीं याबद्दल तिचा रोषहि आपल्यावर झाल्याचें सांगितलें. अस्लमकाकांनाहि सुधीरच्या वागण्याचा राग आलेला होता, पण ते स्वभावाचे इतके मऊ कीं कोणालाहि काडीमात्र दुखविणें त्यांच्या हातून कधीं व्हायचें नाहीं त्यामुळें ते गप्प राहिले होते. एवंच कडू शब्द बोलण्याची वाईट कामगिरी करणें आपल्यालाच भाग होतें असें खान-साहेबांनीं सूचित केलें, व काल रात्रीं मीनाक्षीनें पुन्हां आपल्याजवळ हा विषय काढल्यामुळें आपल्याला सकाळीं असें येण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं असें बोलून दाखविलें. मीनाक्षीच्या मोकळ्या बोलण्याचालण्याचा सुधीरनें भलता अर्थ केला होता. ती सुधीरवर प्रेम कसें करील ? ती जवळजवळ विवाहित असल्यासार-खीच होती. अमीरसाहेबांशीं तिचें लग्न व्हायला आतां महिन्या दीड महिन्या-चाहि अवधि नव्हता. अशा स्थितींत तिचा अनुराग आपल्यावर आहे असा सुधीरनें समज तरी कसा करून घेतला ? छे छे ! सगळाच गैरसमज ! तेव्हां आतां उत्तम मार्ग म्हणजे सुधीरनें मीनाक्षीशीं बोलणेंचालणें अजिबात वर्ज्य करावें ! मीनाक्षीची तशी इच्छा आहे; व तेंच सार्‍या दृष्टींनीं हिताचें आहे.

खानसाहेबांचें हें सारें बोलणें ऐकून सुधीरची मनस्थिति मोठी चमत्कारिक झाली. मीनाक्षीच्या नापसंतीसंबंधीं तुम्ही जें कांहीं सांगत आहांत तें मला खरें वाटत नाहीं असें खानसाहेबांच्या तोंडावर सांगण्याचा त्याला मोह पुनः पुन्हां झाला; पण तसें सांगणें शक्य नव्हतें. आपल्या मुलीची अमुक तक्रार आहे म्हणून प्रत्यक्ष बापच सांगत आला असतांना त्याला कसें म्हणायचें तुझ्या बोलण्याचा भरंवसा वाटत नाहीं म्हणून ? परंतु एकीकडे खानसाहेब काय सांगतील तें मान्य करणें भाग होतें, तर दुसरीकडे मीनाक्षीच्या वाग-ण्याचा अर्थ करण्यांत आपण चकलों हें कबूल करायला त्याचें मन तयार होत नव्हतें. मीनाक्षीच्या अशा कित्येक कृती आणि कित्येक भाषणें त्याला आठवत होतीं, कीं त्यांचा अनुरक्तीखेरीज दुसरा अर्थच होणें शक्य नव्हतें. आणि जे अनेक कटाक्ष, हास्यप्रकार आणि हावभाव लोकांना अमुक तर्‍हेचे म्हणून सांगतां येणें शक्य नव्हतें पण प्रत्यक्ष शब्दांपेक्षां किंवा कृतीपेक्षांहि वास्तविक जे किती तरी पटींनीं अधिक मधुर आणि अधिक अभिप्रायपूर्ण होते त्यांचीहि आठवण त्याला स्पष्ट होती. या सगळ्यांचा आपण कांहीं तरीच चुकीचा अर्थ केला ? आपल्याविषयीं मीनाक्षीच्या मनांत प्रीतिभाव असल्याची आपली

कल्पना खोटी ? तिचें तें पाहणें अन् तें बोलणें अन् तें हंसणें, सगळें केवळ साध्या स्नेहाचें ? त्यांत विशेष खोल अभिप्राय कांहींच नाहीं ? उलट, आपल्या प्रियाराधनानें ती मनांतल्या मनांत रुष्टच होत होती ?

असे प्रश्नावर प्रश्न सुधीरच्या मनांत उभे राहिले, व खानसाहेब त्याचा निरोप घेऊन गेले तरी त्याच्या मनाचा गोंधळ चालूच राहिला, व हे सगळे प्रश्न सर्कसमधल्या कसरतवाल्यांनीं एकमेकामागोमाग उलट्यासुलट्या उड्या घ्याव्या तसे त्याच्या डोक्यांत फिरत, घोळत राहिले.

एकदां त्याच्या मनांत अशी कल्पना जोरानें आली कीं या पावलीं मीनाक्षीकडे धांव घेऊन, तिला एकान्तीं गांठून विचारावें कीं, " मीनाक्षी, माझी प्रेमपूजा तुला अव्हेरावीशीच वाटते का ? " अशा प्रश्नाला ती काय उत्तर देईल याची तो कल्पना करूं लागला तों आजपर्यंत त्याच्यांत व मीनाक्षींत झालेले सारे एकान्ताचे प्रसंग त्याला आठवले, व मीनाक्षीला आपला प्रेमोपहार मान्य आहे असाच त्या साऱ्या प्रसंगांचा स्पष्ट अर्थ आहेसें त्याला वाटलें. पण—

पण—पुन्हां त्याला वाटलें, आपणच आपल्या मतीनें मीनाक्षीच्या भावनांचें स्वरूप ठरविण्यांत काय अर्थ आहे ? माणूस प्रेमांत वाहवला कीं स्त्रीच्या सामान्य बोलण्याचालण्याचे आपल्याला अनुकूल असे अर्थ तो करूं लागतो असें कालिदासानें म्हटलें आहे. आपलें तसेंच होत असेल कदाचित्. आणि खेरीज ज्या अर्थीं खानसाहेबांनीं मुद्दाम येऊन आपल्याला इशारा दिला त्या अर्थीं मनाच्या साऱ्या कल्पना बंद करून मीनाक्षीचा ध्यास सोडणें हेंच आपल्याला आपलें कर्तव्य समजलें पाहिजे.

परंतु—

ध्यास सोडावा असें म्हणणें सोपें होतें, पण तो खरोखर सुटणें सोपें नव्हतें. किंबहुना, खानसाहेब गेल्यावर प्रथम जरी सुधीर त्यांच्या बोलण्याचा सर्व दृष्टींनीं विचार करीत पडला तरी शेवटीं मीनाक्षीचीं व त्याचीं आजपर्यंत झालेलीं बोलणीं पुनः पुन्हां आठवून त्या स्मृतितरंगांवर विहार करण्यांतच शेवटीं तो गर्क झाला.

तो तसाच किती वेळ पडून राहिला असता कोण जाणे, पण तितक्यांत बुड्ढा बागवान खोकत खोकत तेथें आला व पोस्टमननें त्याच्याजवळ दिलेलीं सुधीरचीं पत्रें त्यानें त्याच्यापुढें धरलीं.

तीं पत्रें हातीं घेत सुधीरनें बागवानाला विचारलें,

" क्यं बुड्ढा ? उमरखानसाहेब कैसे आदमी है ? "

म्हाताऱ्या बागवानाला सुधीरच्या प्रश्नाचा रोख मुळींच कळला नाहीं. त्यानें नुसतें भरपूर हास्य केलें, व हातावर हात चोळले.

सुधीरनें विचारलें,

" नही, देख. उमरखानसाहेब झूटी बात करेंगे या नही?—( उमरखान एखादे वेळीं खोटें बोलतील कीं नाहीं ? ) "

" अफसोस ! च् च् ! उमरखानके जैसे इमानदार और सच्चे आदमी कोन है ! ( छे छे ! भलतंच ! उमरखानासारखा सत्यभक्त माणूस कुठं सांपडायचा नाहीं !—) "

ते म्हाताऱ्याचे शब्द सुधीरला बरे वाटले नाहींत. एकूण खानसाहेबांचें सांगणेंच खरें तर !—आणि मीनाक्षीविषयींची आपली सारी लालसा भ्रमिष्ट-पणाचीच म्हणायची !—

छे ! ही भयंकर गोष्ट कबूल करतांना त्याला घेरीच आल्यासारखें झालें. खोलींतल्या त्या साऱ्या वस्तू आभासवत् वाटल्या, सूर्यप्रकाशहि खोटा, अंधुक, पिंवळसर दिसला, आणि गगनमंडलांत हर्षमत्त होऊन भरारणाऱ्या गरुडाचे पंख खोटे ठरून ते एकदम गळून तो जमिनीवर पडला तर त्याला जसें वाटेल तसें सुधीरला वाटलें.

# प्रकरण २० वें

## उंबरठा ओलांडला



धीरला पत्रें आलीं त्यांत एक केशवकाकाचें, एक ब्राउनिंगसाहेबाचें व एक त्याच्या वडिलांचें होतें.

ब्राउनिंगचें पत्र सर्वांत छोटें दिसत होतें म्हणून सुधीरनें तें आधीं फोडलें. त्यांत साहेबानें लिहिलें होतें,

"तुझें पत्र पोंचलें. जी माहिती मिळवायसाठीं तूं गेला आहेस ती तुला थोडी थोडी मिळत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. मला वाटतें, एखादी गोष्ट लिहावी तशी तूं या रहस्याबद्दलची माहिती लिहून काढशील तर फार चांगलें. म्हणजे एकंदर हकीकतींतले कोणते दुवे अजून शोधायला हवेत तें तुला स्पष्ट दिसेल.

"इकडे निघून यायची घाई करूं नकोस. तूं इथें नाहींस तर माझा एक हात नाहीं असें मला वाटत आहे खरें. पण तिकडचें कामहि फार महत्त्वाचें आहे.

"येथें गेल्या आठवड्यांत लुगेंडॉर्फ नांवाच्या विख्यात रशियन व्हायोलिनवाल्याचे तीन जलसे झाले. मी व मिसेस ब्राउनिंग गेलों होतों. केवळ जलशाला जाण्यासाठीं म्हणून मिसेस ब्राउनिंगला सवादोनशें रुपयांचा एक गाउन मला विकत घेऊन द्यावा लागला. तुझं लग्नहि झालं नाहीं, किंवा एखाद्या मुलीच्या प्रेमपाशांतहि तूं सांपडला नाहींस तेव्हां तूं सुखी आहेस म्हणायचा !"

यानंतर सुधीरनें काकांचें पत्र फोडलें. तें असें होतें:—

"तुझी प्रकृति आतां उत्तम झाली हें वाचून अतिशय समाधान वाटलें.

तुझ्या अपघाताची व तूं उमरखानांच्या घरीं पाहुणचार घेत असून सुखरूप असल्याची बातमी एकाच पत्रांत आली तरीसुद्धां मनाला काळजी वाटत होती. सकीना तर माझ्या मागें लागली होती कीं चला आपण धेनुकुंजला दोन दिवस जाऊन येऊं. परवांचें तुझें पत्र आल्यानें मात्र तिचीसुद्धां काळजी नाहींशी झाली. मीं तिला तुझें पत्र वाचून दाखविलें तेव्हां ती एकदम उद्गारली, 'अरे वा! चंद्र बडे खुषीमें मालूम पडते है!'

"वास्तविक धंद्याचा कांहीं तरी देखावा म्हणून तूं चित्रें नेलींस अन् तीं सारीं खपलीं हा योगायोग गमतीचा खराच. मात्र माझ्या कलेकडे पाहून उमरखानांनीं व अमीरसाहेबांनीं तीं खरेदी केलीं कीं तुझ्या मधुर स्वभावावर लुब्ध होऊन केलीं हा प्रश्नच आहे.

"चित्रांचे पैसे तूं ताबडतोब इकडे धाडलेस याबद्दल मला तुझा बराच राग आला. त्या पैशाकडे तूं परकेपणानें पाहिलेंस म्हणायचें! पण तुझ्या या वेडेपणाचें निराकरण करण्याची फार नामी युक्ति मला सकीनानें सुचविली. तिनें व मी दहाबारा कंपन्या हिंडून तुझ्यासाठीं तीनचार नमुन्यांच्या मोटारी पाहून ठेवल्या आहेत. तूं परत आलास कीं तुझ्या पसंतीनें त्यांतली एक खरेदी करूं. मात्र गाडी घ्यायची ती 'टू सीटर' ( दोघांनीं बसायची छोटीशी ) घ्यायची आहे. तेव्हां सकीनाचा तुला निरोप आहे कीं 'दुसऱ्या माणसाची' तजवीज तूं आतां लवकर केली पाहिजेस.

"मीनाक्षीचीं तुझ्या पत्रांतलीं वर्णनें वाचून एखादें काव्य वाचीत असल्यासारखें वाटलें. तुझें सगळें लेखनचातुर्य तीं वर्णनें लिहितांना उचंबळल्यासारखें दिसतें. मला तर कांहीं एक शंका येऊं लागली आहे. पण ती खरी कीं खोटी हें तुझी भेट झाल्याशिवाय नाहीं समजायचें.

"इथल्या कांहीं चित्रकारांचा व फैझी रहमान यांचा चांगलाच समरप्रसंग जुंपला आहे. टाइम्समध्यें रोज कोणाचें तरी पत्र असतें. टाइम्स स्वतः मधूनच एखादा वार फैझी रहमानवर करतो. पण ती स्वारी या सगळ्यांना पुरून उरली आहे. अर्थात् त्याच्या अंगीं कांहीं तरी अजब गुण आहे म्हणूनच.

“ तुझें तिकडे कामच आहे आणि तें संपल्याखेरीज इकडे येणें तुला शक्य नाहीं. पण शक्य तितकें लवकर ये. रोज दहा वेळां तुझ्या आठवणी निघतात.

“ सकीनानें तुला फार फार विचारलें आहे.”

काकांचें हें पत्र सुधीरनें पुन्हां वाचलें, व मीनाक्षीबद्दलचा त्या पत्रांतील पॅरा दोनतीनदां वाचला. तो पत्राकडे पहात म्हणाला, “ काका, तुमची शंका व्यर्थ ठरणार. सगळाच जर मुळीं माझा भ्रम ठरला ! ”

जरा वेळ तो तसाच सचिंत बसला व मग त्यानें दादांचें पत्र उघडलें:—

“ अनेक आशीर्वाद,

“ तुमचें पत्र पोंचलें. तुमची प्रकृति आतां अगदीं पूर्ववत् झाल्याचें वाचून काळजी दूर झाली. तुमच्या मातोश्रींची प्रकृति चांगली आहे.

“ तुमची तेथें खाण्यापिण्याची काय व्यवस्था आहे मला माहीत नाहीं. परंतु एका मुसलमानाच्या घरांत तुम्ही इतके दिवस राहिलांत हें माझ्या मनाला फार क्लेशकारक झालें. असो. तुम्हांला जीं बंधनें पाळावींशीं वाटत नाहींत त्याविषयीं अधिक लिहून तुम्हांला शिणविण्यांत अर्थ नाहीं.

“ तुम्ही इकडे लवकर आलांत तर बरें. कारण मला थोडें फिरतीवर जावें लागेलसें दिसत आहे. वे. शा. सं. गोविंदशास्त्री बापट, याज्ञिक हे सध्यां येथें आले आहेत व एक मोठा यज्ञसमारंभ करावा असा त्यांचा मानस आहे. त्यासाठीं बराच द्रव्यनिधि लागेल तो जमविण्या-साठीं मी, दामूअण्णा, विसूभाऊ अशी मंडळी खटपट करणार आहोंत. तुम्ही इकडे आलांत म्हणजे घरांत तुमच्या मातोश्रीवर एकटें रहायची पाळी यावयाची नाहीं.

“ बाकी सर्व कुशल आहे.”

दादांचें तें पत्र वाचून आधींच कष्टी झालेल्या सुधीरच्या मनाला अधिकच शीण वाटला. काकांच्या पत्रांतल्या एकेका शब्दांत जें आर्जव, प्रेम, माधुर्य होतें तें दादांच्या पत्रांत त्याला कोठेंहि दिसलें नाहीं. इतकेंच नव्हे ब्राउनिंग-साहेबाच्या पत्रांत जो जिव्हाळा होता तोहि त्यांत नव्हता. ‘ तुम्ही ’ असा दादांच्या पत्रांत वारंवार योजलेला शब्द तर सुधीरला इतका भेदक वाटला कीं जणूं त्या शब्दाच्या संकेतानें “ तुझा मला विटाळ होईल ! तूं दूर हो ! दूर

सरक " असेंच दादा आपल्याला म्हणत आहेत असें त्याला भासलें. मुसलमानाच्या घरांत राहतांना आपण योग्य तीं बंधनें पाळलीं असूनहि केवळ आपण तेथें चार दिवस राहिलों या कल्पनेचाच दादांनीं रोष धरावा याचा त्याला चमत्कार वाटला. त्या सबंध पत्रांत जणूं ताठरपणा, कठोरपणा, शुष्कता, उग्रता कांठोकांठ भरलेली आहे असें त्याला वाटलें. त्याच्या मनांत आलें, पितापुत्रांत मधुर स्नेहाचा बिंदूहि असतां कामा नये, पित्यानें पुत्राकडे उग्र, शुष्क चर्येनेंच सदा पहावें हा हिंदु धर्माचा आणि हिंदु संस्कृतीचा अवश्य भागच म्हणावयाचा कीं काय ?—

मुंबईत यज्ञसमारंभ करायसाठीं दादा खटपट करताहेत ! छान !

संस्कृतीच्या या अभिमानाला हंसावें कीं रडावें !—

मीनाक्षीचें व आपलें प्रेम खरोखरच परिणत झालें असतें तर दादांची संमति आपण कशी मिळविली असती ?—अरे बाप रे ! दादांनीं आपल्यावर क्रोधाग्नीचा वर्षावच केला असता !—

बरें झालें म्हणायचें कीं तें आपलें प्रेम संपुष्टांत आलें !—

बरें झालें ?—

पण खरेंच बरें झालें काय ?—

या विचारानें एखाद्या शस्त्राची धार लागावी तसें त्याचें हृदय व्याकुळ झालें, व मग तो टेबलावर मस्तक ठेवून तसाच किती तरी वेळ पडला.

* * *

त्या दिवशीं त्याला जेवण गोड लागलें नाहीं, आणि दुपारचा वेळहि त्यानें कांहीं उद्योग न करतां केवळ आपल्या नव्या दुःखाविषयीं विचार करण्यांत घालविला. तीन वाजण्याच्या सुमारास त्याचा थोडा डोळा लागला, व सुमारें अर्ध्या तासानें तो जागा झाला तेव्हां ताजेपणा वाटण्याऐवजीं आपल्या मनांतली अप्रसन्नता अधिकच वाढल्यासारखें त्याला वाटलें.

तो उठला व चूळ भरून त्यानें ब्राउनिंगला एक व मेरीला एक अशीं दोन पत्रें लिहिलीं.

तीं पोस्टांत टाकण्याच्या निमित्तानें तो बाहेर पडला.

पोस्टाच्या रस्त्याच्या अलीकडच्या चौकांत पोंचतांच तेथें विलक्षण गर्दी असल्याचें त्याला दिसून आलें. नवे कोरे कपडे घालून व आपापल्या

परी नटून निघालेल्या माणसांच्या थव्यांनीं रस्ता नुसता फुलून गेला होता. गाड्यांच्या रहदारीला जागा उरली नव्हती, आणि एखादी गाडी किंवा मोटार आली कीं तिला आपला मार्ग काढतां काढतां मुष्कील होत असे. मुसळधार पाऊस पडल्यावर गटारांतून खळखळणाऱ्या पाण्याबरोबर वहात येणारा एखादा भला मोठा घांसगवताचा भारा जसा मोठ्या मिनतवारीनें, थांबून, थबकून, आडवा तिडवा होत पुढें सरकावा तसें गाडीचें किंवा मोटारीचें होई; इकडे तिकडे बघत जाणारे लोक अगदीं घोड्याच्या तोंडाला डोकें भिडलें तरी आपल्याच नादांत असत व मग गाडीवाल्यानें मोठ्यांदा ओरडून कांहीं अपशब्द उच्चारला कीं दचकून दूर होत. मोटारीचें शिंग कितीहि वाजलें तरी त्याचा उपयोग होत नसे; कारण लोकांचा गलबला, मिठाईवाल्यांच्या आरोळ्या, आणि खेळणींविके लोक बिगुलें, किरकिरीं, डफ वाजवीत होते त्यांची कटकट, यांत तो ऐकूं येणें कठीण होतें, आणि ऐकूं आलाच तर तो लोकांना इशारा न वाटतां एकंदर कोलाहलांतीलच एक ध्वनि वाटून उपेक्षणीय समजला जाई.

तो संमर्द पाहिल्यावर सुधीरला वाटलें, आपण उगीच आलों. आज देवीच्या देवळांत कसली तरी जत्रा आहे हें कालपरवांपासून लोकांच्या बोलण्यांत आलेलें त्यानें ऐकलें होतें. सकाळीं तो नित्याप्रमाणें पोस्टांत गेला असता म्हणजे त्या वेळींच जत्रेची थोडीफार गर्दी त्याला दिसली असती. घरून निघतांना या गर्दीची त्याला कल्पना नव्हती; व त्यामुळें चौकानजीक येतांच व तेथें तें दृश्य पाहतांच "अरे! उगीच आलों." अशा विचारानें तो थबकला.

ती गर्दी त्याला हवीशी वाटली नाहीं. इतर एखाद्या वेळीं लोकांची ती लगबग व त्यांचे पोषाख त्याला प्रेक्षणीय वाटले असते, व त्याचें मन नेहमींसारखें उल्लसित आणि हलकें असतें तर त्या जनसंमर्दांत अनेक मनोरंजक प्रकार त्याच्या दृष्टीला दिसले असते. परंतु या वेळीं जत्रेच्या घाईंत धांवणारीं, पळणारीं आणि हर्षभरानें मोठ्यांदा बोलणारीं तीं शेंकडों माणसें त्याच्या नजरेला नकोशीं वाटलीं. माणसाची दुःखाकुल वृत्ति दोन प्रकारची असते. एक अशी कीं त्या वेळीं जगाच्या खेळकर धांवपळींत मिसळल्यानें वातुळ शरीरांतील मेद झडावा तसा दुःखभार हलका होतो. पण दुःखाचा दुसरा प्रकार असा विचित्र आहे कीं त्या वेळीं जगाचा संपर्क दूर राहील तितका बरा असें वाटतें आणि

गुडघ्यांत मान खुपसून आपल्या दुःखांत चूर राहण्याखेरीज दुसरें कांहींच चिडक्या झालेल्या मनाला पटत नाहीं. सुधीरची या वेळची मनस्थिति या दुसऱ्या प्रकारची होती.

त्यामुळें तो चौकाच्या अलीकडे तसाच उभा राहिला. शून्य दृष्टीनें त्या प्रवाही गर्दीकडे त्यानें दोनचार मिनिटें पाहिलें, व मग कपाळाला आंठ्या घालून तो मनाशीं म्हणाला,

" ही गर्दी तोडून पलीकडे कोण जातो !—उद्यां टाकूं पत्रं—"

असें म्हणून गांवसीमेवरचा ओढा एकदम लाल, गढूळ पाण्यानें दुथडी वहात चाललेला पाहून माणसानें गांवाकडे परत फिरावें तद्वत् त्यानें पाठ फिरविली व आल्या रस्त्यानें पावलें टाकण्यास प्रारंभ केला.

त्या वेळीं पश्चिमेच्या क्षितिजाजवळ सरकलेल्या सूर्यबिंबानें ऐन समोरून आपलीं किरणें त्याच्या चेहऱ्यावर टाकलीं; पण तो मित्रस्पर्शहि सुधीरला सुखाचा वाटला नाहीं. दृष्टि फिरवीत तो सूर्यबिंबाला मनांतल्या मनांत म्हणाला,

" आजचा हा कोठला अभद्र दिवस दाखविलास !—जा एकदां दृष्टि-आड हो !—"

* * *

त्याच वेळीं मीनाक्षीहि रविमंडलाचा असाच धिक्कार करीत होती. तिच्या खोलीच्या पश्चिमबाजूकडील खिडकीच्या बरोबर समोर रविबिंब आलें होतें व त्याकडे पाहून, जवळ पलंगाच्या कांठावर बसलेल्या जुबेदाला ती म्हणत होती,

" बघ, या दुष्ट सूर्यानं आज मला दुःखाखेरीज कांहीं दाखविलं असेल तर शपथ, अन् आतां दुःखानं होरपळून मी अंथरुणावर कशी पडलें आहें तें पहायसाठीं हा खिडकींतून डोकावून पहातो आहे !—"

कांहीं बोलण्याऐवजीं जुबेदानें फक्त तिच्याकडे पाहिलं आणि हातीं धरलेला तिचा उजवा हात अधिकच दाबून मान हालविली.

कांहीं वेळानें जुबेदा म्हणाली,

" बेटा, आतां माझं ऐकतेस ?—"

आपला सुकलेला चेहरा किंचित् उचलल्यासारखें करून मीनाक्षीनें " काय ? " असेंच जणूं म्हटलें.

" ऐकशील ना ?—"

" काय ? "

" थोडी कॉफी आणली आहे ती घे."

" नको. थेंबसुद्धां नको—"

" मेरेवास्ते ( माझ्यासाठीं ) "

" नही."

" बेटा, ऐसा नही करना " तिच्या मस्तकावरील केंस प्रेमानें मागें करीत जुबेदा म्हणाली, " इतनी इतनी ले. ( एवढीशी तरी घे. ) "

" जुबी, तुला खोटं वाटतं ? माझ्या जिभेला काडीची चव नाहीं. माझ्या जीवशक्तीचा झरा एकदम आटल्यासारखा झाला आहे. दोरा तुटून वावडी उलटीसुलटी होत खालीं यावी तशी मी कुठं तरी पडतें आहेसं मला सकाळ-पासून वाटतं आहे. आयुष्यांतला सारा वास, सारा रंग अन् सारी चव नाहींशी झाल्यासारखं मला वाटतं आहे. बाप्पांच्या त्या सकाळच्या कठोर भाषणानं माझा जीव एकदम गेला असता तर बरं झालं असतं—"

" श् ! मीना—" असें म्हणून जुबेदानें आपल्या हातानें तिचें तोंड दाबलें. पण मीनाक्षीच्या त्या उल्लेखानें तिला सकाळचा तो विलक्षण प्रसंग आठवला व मीना आत्तां उद्गारली तें कांहीं खोटें नाहीं अशा विचारानें जणूं एकदम हृदयांत उसळलेल्या सहानुभूतीचें सिंचन करण्यासाठीं तिनें मीनाचें मस्तक आपल्या कुशींत घेतलें.

सकाळचा तो प्रसंग खरोखरच पाहणारालादेखील क्लेशकारक होण्यासारखा होता.

खानसाहेब सुधीरची भेट घेऊन आले ते जसे कांहीं मीनाक्षीला आपलें उग्र स्वरूप दाखविण्याच्या निश्चयानेंच आले. ते सरळ मीनाक्षीच्या खोलींत गेले, तेथें ती नाहीं असें पाहून व अस्लमच्या खोलींतून तिचा शब्द ऐकूं आल्यावरून ते त्या खोलींत गेले. मीनाचा एक हात अस्लमनीं हातांत धरला होता व दुसऱ्या हातानें ती आपले डोळे व नाक पुशीत होती. तें पाहतांच खानसाहेबांनीं एकदम कठोर शब्दांची फेर झाडली. ते बसलेहि नाहींत. उभ्याउभ्याच ते बोलत होते. त्यांच्या स्वभावांतील सारें मार्दव जणूं त्यांनीं भिरकावून दिलें होतें आणि अगदीं विचारपूर्वक कठोरतेचा स्वीकार केला होता असे त्यांचे सारे हावभाव होत होते. एका हिंदू तरुणा-

विषयीं मीनानें आपल्या अंतःकरणांत प्रेमांकुर वाढूं द्यावा हें त्यांच्या मतें अतिशय भयंकर होतें. अमीरसाहेबांशीं लग्न ठरलेलें असतांना तिनें आपलें मन चळूं देण्याचें वास्तविक यत्किंचितहि कारण नव्हतें. ती जरी कुमारी होती तरी तत्त्वतः लग्नाच्या स्त्रींत व तिच्यांत फरक नव्हता. आणि ती कुमारी आहे असें मानलें तरी बेजबाबदारपणें आपलें मन बहकूं देण्याइतकी बेअक्कल तिनें दाखवावी ? आपण कोण, आपला दर्जा काय, आपला धर्म आणि संस्कृति काय याची जाणीवच ठेवूं नये ? सारें शिक्षण आणि सारी अक्कल गेली कोठें ?—

त्यांच्या बोलण्यांतील जालीमपणा अस्लमना बिलकूल खपला नाहीं. ते मध्येंच म्हणाले,

" खानसाहेब, तुम्ही इतक्या—"

पण खानसाहेबांनीं त्यांना बोलूं दिलें नाहीं. व कधींच न दिसलेलें त्यांचें क्रोधिष्ट आणि चिडलेलें स्वरूप पाहून अस्लमनींहि अधिक बोलण्याचा प्रयत्न केला नाहीं.

खानसाहेबांचा कटु वाक्प्रवाह चालू झाला. आपण किती प्रेमानें आणि हौशीनें मीनाक्षीला वाढविलें व शिक्षण दिलें त्याचें त्यांनीं चित्र काढलें, आपली लेक आपल्या घराण्याची आणि आपल्या धर्माची इभ्रत वाढवील ही आशा आपण रात्रंदिवस उराशीं कशी बाळगली त्याचें वर्णन केलें, आणि अमीरसाहेबांशीं तिचें लग्न झाल्यानें ती केवढ्या सुखांत जाऊन पडेल तें परोपरी सांगितलें. ते इतक्या आवेशानें बोलूं लागले कीं जणूं एखाद्या ज्यूरीपुढें ते आपली बाजू मांडीत आहेत. त्यांचा तो आवेश अधिकाधिक क्रोधजन्यसा वाटूं लागला, आणि सुधीरबद्दल ते पुढें बोलूं लागले तेव्हां त्यांच्या बोलण्यांतली मर्यादा अजीबात सुटली. अतिशय वाईट शब्दांनीं ते त्याचा उल्लेख करूं लागले. मीनाक्षीची प्रेमदृष्टि एका हिंदूवर पडली हें दिसतांच आपल्या अंतःकरणाला घरें पडलीं असें ते म्हणाले. मीनाच्या साऱ्या शिक्षणाचा आणि स्वातंत्र्याचा असा दुष्परिणाम होईल असें स्वप्नींहि नव्हतें ! बायकांना पडदानशीन ठेवणारे पूर्वींचेच लोक शहाणे म्हणायची वेळ आली ! मीना आपला रुबाब विसरली, धर्म विसरली, संस्कृति विसरली ! पितृद्रोह आणि धर्मद्रोह यांहून भयंकर पातक तें काय असणार ! हीं पातकें करून एका काफिरावर मुलगी प्रेम करूं

लागली तर कठोरपणा पत्करून मुलीचा बंदोबस्त करणें भाग आहे ! मीनानें पुन्हां सुधीरशीं शब्दहि बोलतां कामा नये—त्याचें मुखावलोकनदेखील !—

परंतु खानसाहेबांचें तें ऐन आवेशांतील कठोर वाक्य एखादी ताणलेली तांत तुटावी तसें तुटून अपुरें राहिलें.

कारण मीनाक्षी आपल्या जागेवरून एकदम उठली आणि एक शब्दहि न बोलतां खोलीबाहेर गेली !

खानसाहेबांचें बोलणें इतका वेळ चालू असतांना राग, तिरस्कार, विस्मय, दुःख अशा नाना विकारांनीं तिच्या अंतःकरणाचा प्रक्षोभ उडाला होता. पण झंझावात सुटला असतां एखाद्या जातिवल्लरीनें हेलकावे खावे तद्वत् जागच्या-जागीं तिचें शरीर कंपित होत होतें तेवढेंच. तिनें एकदांहि बापाकडे वर मान करून पाहिलें नाहीं, व एक चकार शब्दहि उच्चारला नाहीं. खानसाहेबांचे कांहीं शब्द ऐकतांच तिच्या हृदयांत एकदम अनंत दुःखलहरी उसळल्यासारखें एकदोनदां तिला झालें; आणि सुधीरविषयींचे खानसाहेबांचे कर्णकठोर उल्लेख ऐकून तिच्या मूळच्या मानी—व प्रीतीच्या संसर्गानें अधिकच मानी झालेल्या—हृदयांतून निराकरणाचे तीव्र स्पष्ट शब्दहि ओंठापर्यंत धांवले. पण तिनें दुःखाचे कढत अश्रू आणि कलहाचे कडक शब्द—दोन्हीहि मोठ्या ऐटीनें आवरले. आणि आतां बापाचें बोलणें यापुढें आपल्याला निमूटपणें ऐकवणार नाहीं असें वाटतांच ती झटकन उठली व आपल्या खोलीकडे निघून गेली.

खोलींत पोंचतांच मात्र गांभीर्याचें तिचें सारें अवसान एकदम गळून पडलें, व ती एखाद्या कुसकरलेल्या मंजिरीसारखी अंथरुणावर पडली आणि उंची, मऊ गिरद्यांत आपलें मस्तक पालथें लपवून हुंदके देऊन रडूं लागली.

सकाळचा हा सारा प्रसंग जुबेदाला या वेळीं आठवला व मीनाक्षीचे उद्वेगाचे अमंगल उद्गार ऐकतांच जरी तिनें तिच्या तोंडावर हात ठेवला तरी ते उद्गार यथार्थच होत असें तिला मनांतल्या मनांत वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

मग तिनें पुन्हां मीनाक्षीची विनवणी केली व तिला थोडी कॉफी घ्यावयास लावलें.

मीनाक्षी कॉफीचा कप जुबेदाच्या हातीं परत देत होती इतक्यांत दारांत ड्रायव्हर डोकावला व त्यानें अदबीनें विचारलें,

" गाडी आणूं काय ? "

आज गांवांत देवीची जत्रा होती व आज संध्याकाळीं देवीला जायचा बेत मीनाक्षीनें ड्रायव्हरला कालच सांगून ठेवला होता. त्या तिच्या कालच्या हुकुमाप्रमाणें ड्रायव्हरनें मोटार लख्ख पुसून तयार केली होती व आत्तां तिला येऊन विचारलें होतें.

परंतु मीनाक्षीच्या लक्षांत कांहींच येईना. तिनें त्रासिक स्वरानें विचारलें,

" कशाला ? "

" आपण काल हुकूम दिला होता ना आज देवीला जायचं संध्याकाळीं म्हणून—"

" हं—पण नको. मला नाहीं जायचं—"

" जी—"

असें म्हणून सलाम करून ड्रायव्हर परत जावयाच्या बेतांत होता.

तितक्यांत मीनाक्षी म्हणाली,

" फिर देखो—"

तें ऐकतांच ड्रायव्हर उभा राहिला.

मीनाक्षी 'देखो' असें म्हणून गप्पच राहिली. तिनें अशी मुद्रा केली कीं जणूं एखादी विलक्षण कल्पना तिच्या मनांत एकाएकीं आली होती, व उंच टप्प्यावरून खालच्या नीलवर्ण, स्वच्छ, शीतल जलाशयांत सूर मारण्यापूर्वी पोहणारानें क्षणभर थबकावें तशी त्या कल्पनेप्रमाणें वागण्याचा निश्चय न होऊन ती थबकली होती. मनांत आलेल्या कल्पनेचा आनंद आणि त्या कल्पनेप्रमाणें वागण्याचें भय असे दोन्ही विकार तिच्या मुद्रेवर त्या क्षणीं खेळत होते.

शेवटीं विचाराच्या ओढीनें चढलेल्या तिच्या भ्रुकुटी एकदम सरळ झाल्या व ती म्हणाली,

" हें बघ, जायचं. आण गाडी. लवकर."

" जी " असें म्हणून ड्रायव्हर गेला.

तो जातांच मीनाक्षीनें जुबेदाचें मस्तक आपल्या दोन्ही हातांनीं दाबून जवळ ओढलें, व तिच्या कानांत कांहींसें सांगून ती मोठ्यानें हंसली.

मीनाक्षीनें जें कांहीं सांगितलें त्याचें जुबेदाला विलक्षण आश्चर्य वाटलें असलें पाहिजे. कारण, कांहीं बोलण्याऐवजीं ती नुसता आ वासून मीनाक्षीकडे पहात राहिली.

खेळांतल्या बाहुलीनें डोळे विस्फारून झांजा वाजविल्या म्हणजे लहान मुलीला हर्ष होतो तसाच जुबेदाचा तो विस्मय पाहून मीनाक्षीला झाला. तिनें जुबेदाचे दंड धरून तिला गदगदां हालविलें व खदखदां हंसून म्हटलें,

" एखाद्या बुद्धीसारखी तोंड वासून काय बसलीस ?—आटप, माझी सगळ्यांत उत्तम साडी अन् सगळ्यांत उत्तम ब्लाउझ काढ. ए ! चल !—"

* * *

मीनाक्षीचें देवीचें दर्शन आटोपेपर्यंत जुबेदा बाहेर मोटारींतच बसून होती. मीनाक्षी परत येऊन गाडींत बसली व गाडी चालू झाली.

मघांशीं ज्या चौकापर्यंत येऊन सुधीर परतला होता त्या चौकांत मोटार येतांच मीनाक्षीनें जुबेदाला खुणविलें, व जुबेदा ड्रायव्हरला म्हणाली,

" अरे थांब. गाडी अशी या रस्त्याला घेऊन उभी कर. आम्ही दोघी एके ठिकाणीं जाऊन येतों पायींच. गाडी नको. तूं थांब कोंपऱ्यावर."

तो हुकूम ऐकतांच ड्रायव्हरनें पों पों पों असा शिंगाचा मोठा इशारा करून गाडी वळविली, व रस्त्याच्या कडेला घेऊन उभी केली.

जुबेदा व मीनाक्षी खालीं उतरल्या व चालूं लागल्या. ड्रायव्हर त्यांच्याकडे पहात राहिला, पण लवकरच त्या वळल्या व दिसेनाशा झाल्या.

वाटेनें मीनाक्षी हळूच म्हणाली,

" आपण वाट तर चुकलों नाहीं ? "

" छी ! मला पक्की माहीत आहे ती झोंपडी. ती पहा त्या कोंपऱ्यावरची."

मीनाक्षीनें पाहिलें, पण झोंपडी दिसतांच तिच्या हृदयाची विलक्षण धडधड झाली.

कोंपऱ्यावरच्या त्या आवारांत जातांच जुबेदा थबकली.

" कां ? " मीनाक्षीनें विचारलें.

" तो बुड्ढा बागवान त्या नारळीवर चढला आहे त्याच्याशीं मी बोलत उभी राहीन. तूं जा."

तिची धूर्त योजना मीनाक्षीच्या लक्षांत आली, पण ती येतांच तिचे हातपाय लटपटले व तिच्या घशांत आंवडा आला. तिनें आधारासाठीं जुबेदाचा हात धरला व

" जुबी !—"

एवढाच उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडला.

" बेटा ! "

" जुबी, असं इकडे येण्यांत माझ्या शीलाला कमीपणा नाहीं ना यायचा ? —त्यांनाच हें माझं करणं भ्रष्टाचाराचं वाटलं म्हणजे ?—"

" खुळी कुठली !—जा—"

असें म्हणून जुबेदानें तिला लोटलें, व ती पुढें गेली.

त्या वेळीं सूर्य अगदीं क्षितिजाखालीं लोपण्याची वेळ आली होती. पण जणूं मीनाक्षीच्या प्रीतीचा मार्ग उज्ज्वल राखण्याची त्याला चिंता होती व क्षितिजाच्या कंगोऱ्यावरच तो घोंटाळत होता.

मीनाक्षीनें दार उघडलें तों सूर्याच्या लाल सोनेरी किरणांचा झोतच्या झोत आंत शिरला.

आंत एका कोचावर सुधीर पडला होता. त्यानें मान वर करून पाहिलें. मीनाक्षी दृष्टीस पडतांच क्षणार्धपर्यंत तो गोंधळला. पण लगेच त्यानें मधुर हास्य केलें.

मीनाक्षी हंसली, पण तिच्या हृदयांत धडकी भरली असल्यामुळें त्या हंसण्याच्या वेळीं तिच्या ओंठाच्या पाकळ्या फारशा विलगल्या नाहींत.

ती उंबरठ्याच्या अलीकडे तशीच दारावर हात ठेवून उभी राहिली.

सुधीर हंसत उठला व उंबऱ्यापर्यंत येऊन थबकला. दोघांनीं क्षणभर एकमेकांकडे निरखून पाहिलें.

जणूं संस्कृतीचा उंबरठा दोघांच्या मधोमध होता, व ओलांडण्यापूर्वीं दोघें परस्परांकडे पहात होतीं.

शेवटीं सुधीरनें तिला आंत घेतलें, आणि तिच्या हातानें आतांपर्यंत दबून राहिलेलें दार परत बंद झालें.

त्याच वेळीं सूर्यगोल अदृश्य झाला, आणि जणूं भला मोठा चेंडू रंगाच्या हौदांत वरून पडून रंगाच्या धारा चहूंकडे उडाव्या तद्वत् लाल रंगाचा शिडकावा आकाशांत जिकडे तिकडे उसळल्यासारखा दिसूं लागला.

* * *

दुःखाचा क्षोभ आणि आनंदाचा उन्माद दोहोंनींहि झोंप सारखीच नष्ट होते.

दुसऱ्या दिवशीं अरुणोदयाबरोबरच सुधीरनें शय्येचा त्याग केला, आणि तोंड वगैरे धुवून त्यानें कपडे केले. कोठें तरी मजेनें हिंडून यावयाचें त्यानें ठरविलें होतें. बाहेर पक्षी घरट्यांतून हर्षभरानें भरारी मारून निघतांना दिसत होते. त्यांच्याप्रमाणें आपणहि भरारी मारावी असें त्याला वाटत होतें. म्हणून तो निघाला.

पण तो आवाराच्या फाटकाशीं पोंचला तोंच एक तारेचा शिपाई आला, व त्याच्या नांवाची तार त्याच्या हातीं देऊन निघून गेला.

सुधीरनें तार फोडली.

ती त्याच्या वडिलांची होती.

| | | | |
|---|---|---|---|
| माई | कराचीस | अत्यवस्थ | असल्याची |
| तार | आली | आहे | तूं |
| ताबडतोब | निघून | ये. | |

* * *

त्या दिवशींची पंजीमकडे जाणारी मोटार धेनुकुंजहून निघाली तींत अगदीं पुढच्याच सीटवर सुधीर होता.

एखाद्या बहरलेल्या वृक्षावर एकाएकीं वज्राघात होतांच तो वठावा तसा त्याचा चेहरा निस्तेज दिसत होता. तो कोणाशीं कांहीं बोलत नव्हता, व कोणाचेंहि बोलणें त्याला ऐकूं येत नव्हतें. तो खुळ्यासारखा शून्य दृष्टीनें समोर पहात होता. व मोटार वेगानें जात होती, तरी हा रस्ता जणूं कधीं संपणारच नाहीं व आपण कराचीला पोंचणारच नाहीं अशा एका विचित्र आभासानें त्याचें मन व्याकुळ होत होतें.

# प्रकरण २१ वें

## दुःखाचा कळस कीं शेवट?



मुंबईस घरीं पोंचेपर्यंत सुधीरच्या मनांत बहिणीबद्दलच्या विचाराखेरीज कसल्याहि विचाराला अवकाश मिळाला नाहीं. वास्तविक इतक्या अनपेक्षितपणें आणि इतक्या पूर्णपणें प्रणयपूर्तीचा आनंद त्याला लाभला होता कीं त्या आनंदाच्या उन्मादांत इतर सारे विचार नष्ट व्हावेत. परंतु अगदीं हृदयाचा भेद करणाऱ्या एखाद्या दुःखाचें एकदम आक्रमण झालें कीं प्रणयाच्या कोमल भावना लाजून दूरच होतात; त्यामुळें त्यानें तार वाचली त्या क्षणापासून स्वतःच्या प्रणयाची फारशी तीव्र जाणीव सुधीरच्या मनांत राहिली नाहीं.

धेनुकुंजाहून त्याला इतक्या धांदलीनें निघावें लागलें होतें कीं खानसाहेबांच्या बंगल्यावर जाऊन त्यांचा व अस्लमकाकांचा—आणि साधल्यास नुसत्या दृष्टिभेटीनेंच कां होईना मीनाक्षीचा—निरोप घेऊन यावा असें त्याच्या मनांत तेवढ्या वेळांत जरी हजारदां आलें तरी तें त्याला शक्य नव्हतें. त्यानें फक्त घाईघाईनें एक पत्र अस्लमकाकांच्या नांवानें लिहिलें होतें, व मीनाक्षीला आपण गेल्याचें सांगण्याचें व पुन्हां आपण आल्याखेरीज राहणार नाहीं असा धीर देण्याचें काम त्यानें त्यांजवरच सोंपविलें होतें. तें पत्र बागवानाजवळ देऊन तो मोटारींत चढला होता.

माणसाला दृष्टिआडचें दिसत नाहीं त्यामुळें बऱ्याचशा सुखाला त्याला मुकावें लागतें, तसेंच कितीक दुःखांचें व काळज्यांचें ओझें त्याच्या पाठीवर रचलें जावयाचें राहतें. आपलें पत्र अस्लमकाकांना खास पोंचेल व आपल्या या आकस्मिक जाण्यानें मीनाक्षीला वाईट वाटलें तरी ती आपल्यावर रुष्ट

होणार नाहीं अशी सुधीरची खात्री होती. पण प्रत्यक्ष घडलें तें त्याच्या अद्-मासाहून फारच वेगळें.

त्याची मोटार हालून फारसा वेळ झाला नाहीं तोंच सय्यद तेथें आला. बागवानानें तो गेल्याचें सांगितलें व म्हटलें,

“ त्यांना सकाळीं उजाडत तार आली, मग ते कोणाचीच भेट न घेतां अगदीं तांतडीनं गेले. येवढं पत्र घाईघाईनं खरडून अस्लमसाहेबांना द्यायसाठीं माझ्याजवळ दिलं त्यांनीं—”

हें म्हणतांना म्हाताऱ्यानें हातांतील पत्र सहज वर धरून दाखविलें.

सय्यदनें तें पाहून म्हटलें,

“ मग मी देईन कीं तें अस्लमना. मी बंगल्यावरच निघालों आहें. आण इकडे.”

इतकें म्हणून त्यानें तें बागवानाच्या हातून घेतलेंदेखील. व नको होय म्हणण्याचा अवकाशहि न मिळाल्यामुळें म्हाताराहि कांहीं बोलला नाहीं. किंबहुना आपण पत्र नेऊन दिलें काय किंवा अमीरसाहेबांनीं दिलें काय एकच असें त्याला वाटलें.

मोटारींत बसून दूर गेल्यावर सय्यदनें तें पत्र फोडून वाचलें, व दांतओंठ खात आपल्या खिशांत घातलें.

या प्रकाराची कल्पनासुद्धां नसल्यामुळें मीनाक्षी आपल्यावर रागावेल किंवा तिला आपलें हें जाणें विलक्षण चमत्कारिक, गूढ आणि विश्वासघाताचें वाटेल ही शंका सुधीरच्या मनांत येण्याचें कारणच नव्हतें. धेनुकुंज असें अकस्मात् सोडतांना त्याच्या जिवाला संकट वाटावें हें साहजिकच होतें. तार त्याच्या हातीं पडली तेव्हां मीनाक्षीच्या त्या अकल्पित एकान्ती भेटीला पुरे बारा तासहि झाले नव्हते. परस्परांत झालेल्या मधुर प्रणयवचनांचे श्रुतिमनोहर प्रतिध्वनि त्याच्या कानांत अजून घोळत होते. ती व आपण जवळ जवळ कोचावर बसलों तेव्हां ज्यावर कशियानें पतंगांच्या आकृति काढल्या आहेत असें तिचें ब्लाउझ वक्षभागापाशीं तंग झाल्याचें आपल्या नजरेस कसें पडलें होतें, आणि या सुकुमारीच्या हृदयांतील प्रेमज्योतीवर या पतंगाप्रमाणेंच आपणहि झडप घेत आहोंत अशी कल्पना आपल्याला कशी आली होती याच्या आठवणी अजूनहि त्याच्या मनांत ताज्या होत्या. ती इतकी जवळ बसली

असून व तिला बाहुपाशांत घेऊन हृदयाशीं घट्ट धरण्याची आपल्या जिवाला एकसारखी ओढ लागली असून आपण तिला स्पर्शहि केला नाहीं हें चांगलें केलें कीं वाईट केलें याचा वाद त्याच्या मनांत अजूनहि चालू होता, व तो संपूं नये अशी एक विचित्र इच्छा त्याच्या अंतःकरणाला सुखवीत होती. त्यामुळें धेनुकुंज एकाएकीं सोडतांना त्याच्या हृदयाला पीळ पडावा हें साहजिकच होतें. पण ज्या कारणासाठीं त्याला जावें लागत होतें तें त्याच्या मनाला दुःखानें ग्रासून टाकणारें असल्यामुळें प्रणयोद्भव विरहाची बोंच त्यांत लोपून गेली. आणि शिवाय आपलें पत्र अस्लमना पोंचेल व मीनाक्षीला आपला निरोप कळेल या विश्वासानें त्याचे मीनाक्षीबद्दलचे विचार अधिकच मंद झाले. त्यामुळें साऱ्या प्रवासभर तो आपल्या बहिणीबद्दलच नाना तऱ्हेचे विचार करीत होता, व घरीं पोंचेपर्यंत त्याची ही स्वगत चिंता सारखी चालूच होती.

मुंबईस तो सकाळीं पोंचला व लगेच रात्रींच्या गाडीनें कराचीस निघावयाचें असल्यामुळें त्याचा सबंध दिवस अगदीं धांदलींत गेला. घरीं गेल्याबरोबर त्यानें आधीं कराचीहून आलेली तार मागून घेऊन वाचली. ती माईच्या नवऱ्यानें केली नसून डॉ. थत्ते नांवाच्या कोणा तरी गृहस्थांनीं केली होती. हे डॉ. थत्ते कोण याबद्दल कोणाचाच तर्क चालेना, आणि माईच्या नवऱ्यानें तार कां करूं नये याबद्दलहि सर्वांना विस्मय वाटला. माईच्या वास्तविक स्थितीची मुंबईच्या मंडळींना यथार्थ कल्पना नसल्यामुळें हें सारें साहजिक होतें. मात्र या तर्कांत त्यांनीं फारसा वेळ घालविला नाहीं. कोणी कोणी जावयाचें त्याबद्दल त्यांची चर्चा झाली. माईला भेटण्याविषयीं लक्ष्मीबाई अतिशय उत्सुक व चिंताकुल होत्या तेव्हां त्यांनीं सुधीरबरोबर जावयाचें याबद्दल प्रश्नच राहिला नाहीं. दादांनींहि यावें अशी सुधीरची इच्छा होती व ती त्यानें बोलूनहि दाखविली. पण दादा म्हणाले,

"मला नाहीं येतां यायचं—"

तें त्यांचें तुटक बोलणें सुधीरला बरें वाटलें नाहीं. तो हलकेच म्हणाला,

"पण तुम्ही आलांत म्हणजे तितकंच बरं—"

"त्यांत बरं कसलं अन् वाईट कसलं ?—मी आलों म्हणून नियति असेल ती टळायची आहे थोडीच !—"

"नाहीं—अं—पण—"

" पण नाहीं अन् कांहीं नाहीं. शिवाय बापटदीक्षितांचा यज्ञ आतां जवळ आला, त्याच्या फंडाची खटपट आतां जरा नेटानं केली पाहिजे. तुम्ही दोघं जातां आहांत—पुरे आहे—"

यावर बोलायचेंच असतें तर पुष्कळ बोलण्यासारखें होतें, व तसें बोलावें असें सुधीरला क्षणभर वाटलेंहि. दादांच्या त्या नियतिवादाची त्याला अगदीं चीड आली, व " जशी माईची नियति टळायची नाहीं तशी बापट-दीक्षितांच्या यज्ञाचीहि काय नियति असेल त्याप्रमाणें घडेल, तुम्ही असलांत काय आणि नसलांत काय ! " असा जबाब त्याच्या अगदीं ओंठावर आला होता. प्रत्यक्ष पोटची लेक पुन्हां भेटेल न भेटेल अशा स्थितींत आहे हें ठाऊक असतांना तिला डोळे भरून पहायसाठीं तळमळण्याऐवजीं बापटशास्त्र्यांच्या यज्ञाच्या फंडाची काळजी दादांनीं वहावी हें त्याला अगदीं भयंकर वाटलें. परमार्थाची भ्रामक कल्पना याहून अधिक बहकणें शक्य नाहीं असें तो मनाशीं पुटपुटला. जुन्या संस्कृतीवरील श्रद्धेचें अगदीं हिडिस स्वरूप आपल्याला दिसत आहे असें त्याला वाटलें. त्यानें शहारल्यासारखी मान हालविली, व दादांशीं अधिक न बोलतां तो विषय तसाच सोडला.

मग त्याचा सबंध दिवस धांदलींत गेल्यामुळें तो विषय त्याच्या मनांत फारसा आलाहि नाहीं. त्यानें घराबाहेर पडल्यावर आधीं जयंतला बडोद्यास तार केली कीं, अशा अशा कारणासाठीं मी आज रात्रींच्या गाडीनें कराचीस जावयास निघत आहें, तरी तूं बडोद्याच्या स्टेशनवर मला भेट. मग तो ब्राउ-निंगसाहेबाकडे गेला, तेथें त्याचे तीन तास मोडले. नंतर घरीं येऊन जेवण उरकून त्यानें ब्राउनिंगसाहेबाच्या सांगण्याप्रमाणें ज्या रहस्याचा उलगडा त्यानें चालविला होता त्याची शक्य ती संगतवार हकीगत पांच कागदांवर टाइप केली, व पुन्हां ऑफिसांत जाऊन ती ब्राउनिंगच्या हवालीं केली. मग तेथून तो काकांकडे गेला.

काकांशीं व सकीनाशीं बोलण्यांत त्यानें दोनअडीच तास घालविले तरी ते त्याला व काकांनाहि अपुरे वाटले. रहस्याबद्दल सुधीरनें चकार शब्दहि काकांना सांगितला नाहीं, पण मीनाक्षीबद्दलची हकीकत सांगतांना त्यानें अवाक्षरहि लपवून ठेवलें नाहीं. माईच्या अत्यवस्थेची जाणीव सुधीर व काका या दोघां-च्याहि मनावर धुक्याचा भार सुंदर देखाव्यावर तरंगावा तशी होती. त्यामुळें

त्यांचीं तीं बोलणीं फारशा उल्लसित वृत्तीनें झालीं नाहींत. आणि हंसून खेळून एकमेकांशीं चारचार घटका बोललें तरी जेथें त्या चुलत्यापुतण्यांचें पुरें समाधान होत नसे तेथें त्या दिवशींचें तें बोलणें त्यांना अपुरें वाटलें असल्यास नवल नाहीं.

त्यामुळें केशवकाका सुधीरला पुन्हां कुलाब्याच्या स्टेशनवर भेटले, व अगदीं गाडी सुटेपर्यंत एका बाजूला त्यांचीं बोलणीं चालल्याचें लक्ष्मीबाई डब्यांत बसल्या जागेवरून पहात होत्या.

बडोद्याच्या स्टेशनच्या आवारांत गाडी शिरली तेव्हां अरुणोदयाचा तांबुस प्रकाश बाहेर पसरला होता. सुधीरनें खिडकींतून बाहेर वांकून पाहिलें व जयंत प्लॅटफॉर्मवर दिसतांच त्यानें हात हालवून खूण केली.

गाडी थांबतांच सुधीर उतरला.

जयंतानें एका हमालाला म्हटलें,

" ठेव माझं सामान या डब्यांत."

सुधीरला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला,

" हें काय ?—"

जयंत म्हणाला,

" मी कराचीला येतों आहें तुझ्याबरोबर."

" खरं ? "

तितक्यांत डब्यांत सुधीरची आई दिसल्यामुळें जयंतनें वांकून नमस्कार केला, व मग सुधीरला किंचित् एकीकडे घेऊन म्हटलें,

" तुझी तार पाहून मी घाबरलों. नुसतं तुला इथं स्टेशनवर भेटून माझा जीव स्वस्थ राहिला नसता. माईबद्दल मला फार हकीकती माहीत आहेत अन् त्या तुम्हांला मुळींच ठाऊक नाहींत.—"

" म्हणजे ?—"

" आतां डब्यांत सांगतोंच तुला अन् काकूंना सगळं. बरं—तूं चहा घेणार का थोडा ?—अं ?—घेऊं या, चल—"

मग बडोद्याचें स्टेशन सुटल्यापासून जयंतनें लक्ष्मीबाईंना व सुधीरला माईची इत्थंभूत हकीकत सांगितली. ती ऐकल्यानंतर त्या दोघांची माईबद्दलची काळजी कमी होण्याऐवजीं वाढेल हें त्याला कळत नव्हतें असें नाहीं. पण कराचीस पोंचल्यावर त्यांच्या मनाला एकदम मोठा धक्का बसण्यापेक्षां आत्तांच

त्यांचीं मनें थोडीफार आपल्याकडून दुखलीं तरी तें अधिक बरें असा त्यानें विचार केला, व माईचें जेवढें वृत्त त्याला माहीत होतें तेवढें सगळें त्यानें सांगितलें.

जयंतनें डॉ. थत्त्यांना आधींच तार केली होती. त्यामुळें ते या मंडळीस उतरून घ्यावयास स्टेशनवर आले होते. नीळकंठरावांचें व आपलें कोणतें नातें जडणार आहे तेंहि जयंतनें सांगून टाकलें असल्यानें त्यांच्या घरीं पोंचल्यापासून त्यांच्या साऱ्या मंडळीकडे व विशेषतः सुभद्रेकडे सुधीर व लक्ष्मीबाई सूक्ष्मपणें पहात होत्या. जयंतनें फार सुंदर निवड केली हें त्यांना ताबडतोब कळून आलें, व त्या वेळीं कोणीच मोठ्या उल्हसित वृत्तींत नव्हतें तरीदेखील सुधीरनें तो व जयंत पुढच्या खोलींत एकटे असतांना आपली पसंति बोलून दाखवून त्याचें अभिनंदन केलें.

मंडळीचा चहा वगैरे होईपर्यंत दिवेलागणी झाली. माईचें घर थत्त्यांच्या शेजारींच आहे हें सुधीरला कळलें होतें. तें लांब असतें तरी तिकडे जाण्यास त्याच्यानें विलंब करवला नसता. मग तें इतकें जवळ आहे हें कळल्यावर चहा होतांक्षणींच तिकडे जावयाची इच्छा त्यानें प्रदर्शित केली हें साहजिकच होय.

त्याची चुळबूळ पाहून नीळकंठराव म्हणाले,

" माईच्या घरीं जायची गोष्ट तुम्हाला वाटते तितकी सोपी नाहीं—"

" म्हणजे ? " सुधीरनें आश्चर्यानें विचारलें, व जयंतनेंहि प्रश्नात्मक दृष्टीनें नीळकंठरावांकडे पाहिलें.

नीळकंठरावांनीं उत्तर केलें,

" माझ्या बोलण्याचा तुम्हांला चमत्कार वाटावा हें साहजिकच आहे. पण माई आजारी कशा पडल्या तें ऐकल्यावर माझ्या म्हणण्याचा अर्थ तुम्हांला कळेल. ती हकीकत अशी. त्या दिवशीं—"

असा आरंभ करून नीळकंठरावांनीं जो खेदकारक वृत्तान्त सांगितला तो असा—

त्या दिवशीं डॉ. थत्त्यांच्या घरीं सत्यनारायणाची पूजा होती व सुभद्रेनें अतिशयच आग्रह केल्यामुळें माई त्यांच्या घरीं जेवायला आली होती. वसंतराव कोठें जातो व केव्हां परत येणार याविषयीं कांहींच न सांगतां नेहमींप्रमाणेंच दोन दिवसांपूर्वी जे घरांतून बाहेर पडले होते ते अजून आले नव्हते, व केव्हां येतील त्याचा नियम नव्हता. घर बंद करून तसेंच टाकून येणें

माईला बरें वाटलें नाहीं, म्हणून मुद्दाम सुभद्रेनें आपल्या घरचा गडी त्यांच्या घरांत बसविला होता. माईचें जेवण होतांच तिला घरीं परत पोंचवायचें सुभद्रेनें कबूल केलें होतें, व सुभद्रेच्या व तिच्या मामीच्या अत्याग्रहाला अगदींच नकार द्यावयाचें जिवावर आल्यामुळें माई कधीं घराबाहेर पडायची नव्हे ती थत्त्यांकडे आली होती.

थत्त्यांच्या घरीं सर्व स्त्रीपुरुष पोथी ऐकत बसले होते अशा वेळीं माईच्या दारापाशीं एक घोड्याची गाडी येऊन थांबली. त्या गाडींतून वसंतराव खालीं उतरला व त्याच्यामागोमाग एक स्त्री उतरली, आणि नंतर आंत दोघे राहिले ते सिंधी भाषेंत वसंतरावाला म्हणाले,

" बरं आहे दोस्त, आम्ही जातों. तुझ्या मजेंत व्यत्यय कशाला ?—"

वसंतराव इतका झिंगला होता कीं त्याला ते शब्द धड समजलेहि नाहींत. एखाद्या खुळ्यासारखा तो हंसला व त्या स्त्रीला हातानें धरीत म्हणाला,

" आतां कशी सुटशील माझ्या हातून ?—हीः ! "

असल्या बोलण्याचा व बरळण्याचा ज्यांना सराव असतो अशा स्त्रियांपैकींच ती होती हें उघड दिसण्यासारखें होतें. तिनें कांहींच न बोलतां हंसल्यासारखें केलें, गाडींत राहिलेल्या दोघांकडे पाहून कसली तरी सांकेतिक खूण केली व नंतर वसंतरावाबरोबर पुढें पावलें टाकलीं.

मग ती गाडी वळली व गेली. ती थोडी दूर जातांच तिच्यांतील एकजण दुसऱ्याला म्हणाला,

" या मूर्खाचे सारे सावकारी कागद ही चोरून आणील असं तुला वाटतं ? "

" वाटतं ?—" दुसरा म्हणाला, " हंः ! खात्री आहे माझी. ही ' मिठी ' साऱ्या मुलखाची चालाख आहे. उगच नाहीं माझ्या पदरचे पैसे खर्चून याच्या घरांत मीं तिला घातली. आं ?—हंः !—"

' मिठी'चा हात धरून वसंतराव दारापाशीं आला. दार बंद असलेलें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तितक्यांत थत्त्यांचा गडी पायऱ्यांवर बसून राहिला होता त्याच्याकडे त्याचें लक्ष गेलें. त्याबरोबर त्यानें रागानें विचारलें,

" ए पागल, तूं कोण ? "

त्या गड्यानें वसंतरावाला ओळखलें, व आतां माईंना बोलावून आणलें पाहिजे अशा विचारानें तो झटकन उठला व पायऱ्या उतरूं लागला.

पण वसंतरावानें एकदम त्याचा हात पकडला व म्हटलें,

" बदमाष, पळून कुठं जातोस ?—"

त्या शिवीनें तो गडी चिडला असता. पण वसंतरावाच्या तोंडाचा भपकारा येतांच त्यानें सर्व प्रकार ओळखला व तो शान्तपणें म्हणाला,

" मला तुम्ही वळखलं नाहीं रावसाहेब. मी डाकतरांच्या घरचा जिवा नव्ह का ?—"

" एँ ऽऽ " वसंतरावानें रागाचा विचित्र उद्गार काढला.

त्या उद्गारानें जिवा किंचित् गोंधळला, व पुन्हां तो बोलला तेव्हां त्याच्या आवाजांत बदल झाला होता.

" बाई आमच्या घरीं ज्येवाया आल्याती. आपुन आला म्हून सांगतू जाऊन. बाई म्हणल्या—"

पण जिवाचे पुढचे शब्द ऐकूंच आले नाहींत. कारण वसंतरावानें एकदम खाड्कन् त्याच्या कानशिलांत लगावली व म्हटलें,

" बाई बाई कोणाला—म्हणतो आहेस ?—ती काय तुझ्या मालकाची रखेली आहे ?—"

हे शब्द त्यानें कांहीं एका विचित्रच स्वरानें उच्चारले व त्या तोंडांत मारण्याचें व रागानें बोलण्याचें अवसान त्याच्या झिंगलेल्या शरीराला न पेलल्यामुळें त्याची मोठी झोकांडी गेली. पण कसेंबसें शरीर सांवरीत तो म्हणाला,

" रखेली—रखेली !—"

तितक्यांत त्याची दृष्टि कुलूप लागलेल्या दाराकडे गेली, व त्याच्या डोक्यांत सुसंगत विचार येणें शक्य नसल्यामुळें तो आपल्या बरोबरच्या स्त्रीला म्हणाला,

" जा, थत्त्यांच्या घरून माझ्या बायकोला बोलावून आण."

त्या स्त्रीनें खांदे उडविले व मानेला हिसडा देऊन सिंधी भाषेंत म्हटलें,

" जळला मेल्या तुझा हा तमाशा !—"

त्यावर वसंतराव हंसला व त्या स्त्रीकडे पाहून डोळे मिचकावीत तो तिच्या जवळ गेला. पण असल्या पशूंना सरावलेल्या त्या चतुर बाईनें त्याला दूर केलें व म्हटलें,

" तुझं घर उघडणार आहे का इथं उघड्यावरच माझा प्राण घेतोस ? "

तें ऐकतांच घरांतल्या अगदीं खोल दालनांत असलेल्या माणसाला बाहेरची हांक बऱ्याच वेळानें ऐकूं जावी व त्यानें बाहेर दाराशीं यावें तद्वत् निशेखालीं दडपलेल्या मनाला जणूं कांहीं जाणीव झाल्यासारखी त्याची चर्या झाली, व

“ अच्छा. बराबर—”

असें कांहीं पुटपुटत तो डॉक्टरांच्या घराकडे जाऊं लागला.

जिवा आधींच पुढें पळत गेला होता व त्यानें घाबऱ्या घाबऱ्या वसंतरावाच्या आगमनाची व झालेल्या प्रकाराची वर्दी नीळकंठरावांना दिली होती.

त्यामुळें वसंतराव थत्त्यांच्या दाराशीं आला तेव्हां नीळकंठराव पायरीवरच उभे होते.

त्यांना पाहतांच वसंतराव म्हणाला,

“ ए डाक्तरड्या !—”

“ वसंतराव ! ” गंभीर आणि कठोर आवाजांत नीळकंठराव म्हणाले, “ माई इथं प्रसादासाठीं आलेल्या आहेत. त्या प्रसाद घेतील अन् पांच मिनिटांत घरीं परत येतील—”

नीळकंठरावांच्या तीव्र शब्दाचें ज्ञान होण्याइतकीं वसंतरावाच्या मेंदूचीं केंद्रें ठिकाणावर नव्हतीं. तो एखाद्या वेडसरासारखा हंसला व म्हणाला,

“ पांच मिनिटांत पाठवितोस ?—हंः ! तुझं काम तूं आधींच उरकलं आहेस वाटतं ?—प्रसाद ! हः हः हा ! कसला प्रसाद रे ! दवाखान्यांत ख्रिश्चन पोरी येतात त्यांना प्रसाद देतोस तरी हौस राहिलीच वाटतं तुझी ?—वा रे डॉक्—”

“ चूप ! एक शब्द अधिक बोलशील तर तोंडांत दांत शिल्लक ठेवायचा नाहीं !—”

असें नीळकंठराव इतक्या कर्कश शब्दांत ओरडले कीं शुद्धीवर नसलेला वसंतरावहि क्षणभर शुद्धीवर आला, चपापला व गप्प झाला.

नीळकंठराव पायऱ्या उतरून खालीं आले, त्यांनीं खस्कन् वसंतरावाचा एक दंड पकडला व

“ चल मी तुला पोंचवतों घरापर्यंत. माई येताहेत मागून.”

असें म्हणून त्याला धरून ते चालूं लागले.

बाहेरचा तो देखावा आंतल्या मंडळींना दिसत होता. सारीं माणसें आश्चर्यानें व माईविषयींच्या सहानुभूतीनें जागच्या जागीं उभीं राहिलीं होतीं.

माईनें आपलें तोंड पदरांत लपविलें. तिला आपल्या मस्तकावर वज्र कोसळल्यासारखें वाटलें. इतक्या लोकांच्यादेखत आपल्या संसाराचें केविलवाणें स्वरूप उघड झालें याची तिला खंत वाटली.

सुभद्रेला व मामींना अगदीं चोरट्यासारखें होऊन गेलें. आपण कोठून माईंना आग्रह करून आणलें अशा पस्ताव्यानें त्या अगदीं रडकुंडीस आल्या. भटजींच्या संमतीनें त्यांनीं माईला प्रसाद दिला व आपलीं आसवें आवरीत तिच्या कपाळीं कुंकू टेंकून तिला जाऊं दिलें.

वसंतरावांच्या दारापाशीं पोंचतांच नीळकंठरावांनीं त्याला म्हटलें,

“ ही बाई कोण आहे ?—”

वसंतराव नुसता फिदकन् हंसला.

नीळकंठराव म्हणाले,

“ ही बाई घरांत घेणार असाल तर माई घरांत यायच्या नाहींत. जायला सांगा या बाईला.”

यावर वसंतरावानें पुन्हां विचित्र, गैरशुद्धीवर असल्यासारखें हास्य केलेलें पाहून त्याच्याकडचें तोंड एकदम त्या स्त्रीकडे फिरवून ते म्हणाले,

“ बाई, आम्ही जिवंत आहोंत तंवर तुमचा पाय या घरांत आम्ही पडूं देणार नाहीं. हा माझा गडी तुम्हांला सांगाल तिथं सुखरूप पोंचवील. जिवा, या बाईंना गाडी करून ने—हं. जा. जा म्हटलं ना ! ”

त्या स्त्रीनें वसंतरावाकडे एकदां पाहिलें. पण नीळकंठरावांनीं मुद्दाम विचारपूर्वक तो जो अवतार धारण केला होता त्याच्यापुढें वसंतराव एखाद्या श्वानासारखा झाला होता. त्यामुळें हें स्थळ सध्यां तरी आपल्याला सोडलें पाहिजे हें तिला पटलें व ती जिवाबरोबर चालूं लागली.

मग वसंतराव व माई यांच्याबरोबर नीळकंठरावहि घरांत गेले व त्यांनीं वसंतरावाला पुन्हां दरडावून म्हटलें,

“ माईंना मारशीलबिरशील, इतकंच नाहीं तर उणंअधिक कांहीं बोलशील तर खबरदार ! आम्ही ताबडतोब धांवून येऊं.”

त्यांनीं माईंना धीर दिला व कांहीं वेळानें ते घरीं परत आले. एक मोठा बिकट प्रसंग फार चांगल्या रीतीनें पार पडला असें सर्वांना वाटलें.

परंतु तें त्यांचें समाधान अल्पकाळच टिकलें. झिंगलेला माणूस बेफिकीर होतो तसाच पक्का भित्राहि असतो, त्याला भेवडविण्याइतकें जबरदस्तासारखें वागलें मात्र पाहिजे या तत्त्वानुसार नीळकंठराव वागले व त्यांना जय मिळाला खरा. पण तो तात्पुरता ठरला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं वसंतराव जेव्हां निद्रेंतून बाहेर पडूं लागला तसतशा रात्रींच्या एकेक गोष्टी त्याला आठवल्या. नीळकंठरावांनीं आपल्याला कसें वागविलें तें त्याला स्पष्ट स्मरत नव्हतें. पण जें कांहीं अस्पष्टसें त्याला आठवलें तेवढ्यानें त्याचा खुनशी क्रोध जागृत झाला. ‘ मिठी ’ला आपण आणली, पण तिलाहि परत जावें लागलें हेंहि त्याला आठवलें व मग त्याचा क्रोध फारच पेटला. निशेची शेवटची सुस्ती त्याच्या अंगांतून निघत होती. आणि शुद्धीची ताकद बरीचशी आली होती. अशा संधिकालीं व्यसनी माणसाला राग आला कीं त्यांत जागृतीचा अचूकपणा आणि सरत्या सुस्तीचा बेफामपणा दोन्ही मिसळलेले असतात, व त्या रागांत तो भयंकर गोष्टी करतो.

तो उठला व—

आजूबाजूचीं सारीं घरें भेदरून चपापलीं.

माईच्या अशा आरोळ्या कोणी कधीं ऐकल्या नव्हत्या.

नीळकंठराव दवाखान्यांत जायला निघाले होते ते धांवले.

पण ते गेले तों वसंतरावानें दाराला आंतून कडी लावलेली त्यांना आढळली.

ते ओरडले,

“ दार उघड चांडाळा ! ”

वसंतराव दाराशीं आला व हातांतील छडी पाजळीत म्हणाला,

“ मी माझ्या बायकोचा प्राण घेईन नाहीं तर वाटेल तें करीन. चालता हो ! ”

त्या वेळीं आपलें जबरदस्तीचें धोरण सुपरिणामी होणार नाहीं हें ओळखून नीळकंठराव परत फिरले, व त्यांनीं ताबडतोब मुंबईस सुधीरच्या नांवानें तार केली.

त्या वेळेपासून वसंतरावानें माईविषयीं सहानुभूति असऱ्या कोणाहि माणसाला घरांत येऊं दिलें नव्हतें. त्या दिवशीं त्याचे दारुडे सोबती लवकरच

जमा झाले होते व 'मिठी'चा फेराहि रात्रीं आल्यावांचून राहिला नाहीं. माईची अवस्था कशी आहे याविषयीं तर्क करण्यापलीकडे कोणाच्याच हातीं कांहीं नव्हतें.

ही हकीगत संपवून नीळकंठराव म्हणाले,

"अशी विचित्र हकीकत आहे. आलं लक्षांत? तेव्हां तुम्ही सरळ माईंना भेटायला म्हणून गेलांत तर भेट व्हायचीच नाहीं. बरं, जबरदस्ती करून घरांत जायचं म्हटलं तर तेंहि ठीक नाहीं. कायद्याच्या तावडींत सांपडण्यांत काय अर्थ?—"

सुधीरनें चटकन् म्हटलें,

"एखादा मॅजिस्ट्रेट तुमच्या ओळखीचा नाहीं? त्याला--"

"बरोबर कल्पना काढलीत तुम्ही. हीच युक्ति मलाहि सुचली व तुम्हांला तार केल्यानंतर मी याच मार्गाला लागलों, अन् मी सारी व्यवस्था उत्तम करून ठेवली आहे."

"किती तुमचे उपकार आहेत आमच्यावर."

"शीः! उपकार कसले? आतां असं, आपण तिघं मिळून दौलतराव नांवाचे फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट आहेत त्यांच्याकडे जाऊं. त्यांना घेऊं बरोबर. त्यांना मी आधींच सगळं सांगितलेलं आहे. आजची ही वेळहि ठरलेली आहे. त्यांनीं पोलिसांचीहि तजवीज करून ठेवलेली आहे. चला, सांगतों वाटेनं--"

*　　*　　*

त्यानंतर वसंतरावाच्या घरीं काय प्रकार झाला तें सहज कळण्यासारखें आहे.

सुधीरनें माईचा नुसता समाचारच घेतला नाहीं. तिला थत्त्यांच्या घरीं आणण्यांत आलें. असें नवऱ्याच्या मर्जीवांचून घरांतून निघणें तिला पसंत नव्हतें व तिनें अतोनात आडकाठी घेतली. पण सुधीरनें मोठ्या चतुराईनें तिला आपल्या बेताचा जुलूम मान्य करावयास लावलें. मॅजिस्ट्रेटची मात्रा चांगलीच लागू पडली व वसंतरावांची स्वारी मुकाट्यानें मूग गिळून बसली.

माईचें अंग अनेक ठिकाणीं ठणकत होतें त्यामुळें थत्त्यांच्या घरीं तिला आणल्याबरोबर बिछान्यावर निजविण्यांत आलें.

तेथेंच तिची आई तिला प्रथम दिसली.

त्यावरोबर " आई " असा उद्गार काढून तिनें डोळे मिटले.

लक्ष्मीबाईनीं झटकन् पुढें होऊन तिचें मस्तक कुशींत घेतलें व हुंदके देत त्या म्हणाल्या,

" कशी मी कसाबासारखी आई तुझी, इतके दिवस दूर राहिलें ग !—"

माईनें त्यांना घट्ट मिठी मारली.

" आई ! आई—"

हे तिचे उद्गार नीट बाहेर पडले नाहींत. मातृहृदयांतला अमृताचा लोंढा एकदम तिच्या सर्वांगावर वाहूं लागला होता, व त्यांत बुडून न जातां वर मान ठेवतां ठेवतां तिला श्वास लागला होता.

सुभद्रा शेजारीं उभी होती तिच्या डोळ्यांत हें पाहून अश्रुधारांची गर्दी झाली. पण ते अश्रु दुःखापेक्षां आनंदाच्याच गहिंवराचे होते. कारण माईला त्या स्थितींत पाहून तिच्या दुःखाचा कळस नव्हे तर शेवट झाला असेंच तिच्या मनांत आलें.

# प्रकरण २२ वें

## कलहाचा इशारा




बेदा मीनाक्षीच्या खोलींत शिरली तों ती आपल्या मंचकावर पडून एक पत्र वाचीत होती. ती अगदीं जवळ गेली तरी मीनाक्षीला तिचें भान नव्हतें. शेवटीं तिनें आपला हात पत्राआड धरला तेव्हां मीनाक्षीनें तिच्याकडे पाहिलें व म्हटलें,

" क्यं ? "

जुबेदानें हात काढला व म्हटलें,

" कमाल झाली तुझी ! तें पत्र आतां कोळून प्यायचंच तेवढं शिल्लक राहिलं आहे. सकाळपासून कितव्यांदा वाचते आहेस हें सांग पाहूं कसम खाऊन ! "

तिच्या त्या लडिवाळ रागें भरण्यानें मीनाक्षीला फार बरें वाटलेंसें दिसलें. ती हंसत म्हणाली,

" जुबी, हें पत्र खरंच कितीदां वाचलं तरी पुरेसं वाटत नाहीं !—"

" म्हणूनच म्हटलं ना कोळून पी म्हणून."

" जुबी, किती तीव्र मानसिक यातनांतून या पत्रानं माझी सुटका केली तुला माहीत आहे ना ? मग कां बरं चेष्टा करतेस ?—"

जुबेदानें मान हालविली व त्या वेळीं तिनें जरी हास्य केलं तरी तिच्या चर्येवर एक प्रकारच्या गांभीर्याचाच विकार दिसला. कारण आज सकाळीं पत्र येईपर्यंत मीनाक्षीची अवस्था काय झाली होती तें तिला पुरें माहीत होतें व तें सारें एकदम या क्षणीं तिच्या मनांत आलें.

सुधीरचें पत्र सय्यदच्याच ताब्यांत राहिल्यामुळें त्याच्या एकदम निघून जाण्याचा निरनिराळ्या व्यक्तींवर निरनिराळा परिणाम झाला. खानसाहेब सुधीरला कांहीं तरी अतिशय अप्रिय बोलून आले आहेत एवढें अस्लमकाकांना माहीत होतें, व तो मानी तरुण तेवढ्यानें रुष्ट होऊन पुन्हां बंगल्यावर पाय-

देखील कदाचित् टाकणार नाहीं अशी कल्पना त्यांच्या मनांत घोळतच होती. त्यामुळें सय्यद जेव्हां दुसऱ्या दिवशीं खानसाहेबांकडे आला व सुधीर एकदम नाहींसा झाल्याचें सांगूं लागला तेव्हां ते मनाशीं म्हणाले,

" झालं. माझी भीति खरी ठरली !—"

आपल्या मनांतला हा विचार त्यांनीं खानसाहेबांजवळ अर्थातच बोलून दाखविला नाहीं. तसें करण्याची सोयच उरली नव्हती. सुधीरचें व मीनाक्षीचें प्रेम जमून आपल्या महत्त्वाकांक्षेच्या मार्गांत अडथळा येणार हें पाहतांच काळ्या कांचांचा चष्मा एकदम चढविल्याप्रमाणें त्यांची सुधीरविषयींची नजर काळवंडली होती. ज्या सुधीरला त्यांनीं अतिशय लोभानें आणि प्रेमानें वागविलें होतें त्याच्याचविषयीं त्यांची दृष्टि एकदम दूषित झाली होती, व त्याच्याविषयीं वाटेल तें बोलायला त्यांची जिव्हा तयार झाली होती. सय्यदचें व त्यांचें सुधीरच्या जाण्याबद्दल बोलणें चाललें असतां सय्यद कुत्सितपणें म्हणाला,

" मुंबईचे भामटे असेच दिसायला मोठे झकपक अन् खानदानी असतात!—"

एक आठवड्यापूर्वीं खानसाहेबांजवळ सुधीरबद्दल असें कांहीं बोलायची सय्यदची छाति नव्हती. पण आज सय्यदचे ते शब्द खानसाहेबांनीं ऐकून घेतले येवढेंच नव्हे तर ते म्हणाले,

" तो भामटा तरी असावा किंवा गुप्त हेर तरी असावा असा मला मधूनमधून संशय येतच होता खरं म्हणाल तर ! तुमच्यावर किंवा माझ्यावर पाळत असल्यासारखं त्याचं वागणं कधीं कधीं वाटे—"

खानसाहेबाच्या या कल्पनेचा सय्यदच्या मनावर भलताच परिणाम झाला. त्यानें दचकून म्हटलें,

" हं ?—खरं ?—"

त्याच्या त्या बदलत्या मुद्रेचें व दचकण्याचें खरें कारण खानसाहेबांना कळणें शक्यच नव्हतें. ते म्हणाले,

" हं—मला पुष्कळदां वाटे तसं. त्या दिवशीं रात्रीं खांसाहेबांची मैफल झाली तेव्हां गाणं सुरू व्हायच्या आधीं तुम्ही कशालासे बाहेर उठून गेलां होतात ना ?—त्या वेळीं तुमच्या मागोमाग तो गेला होता अन् मग किती वेळ तरी तो तुमच्याकडे निरखून पहात होता—"

" काय म्हणतां ? " असें एकदम उद्गारून सय्यदनें कसासाच चेहरा केला. खानसाहेबांना त्याच्या त्या मुद्रेंतील आश्चर्य तेवढें दिसलें, भय दिसलें नाहीं. परंतु सय्यदची मुद्रा विशेषतः भयाचीच होती. खानसाहेबांच्या त्या बोलण्यानें सय्यद सुधीरविषयीं खरोखरच त्या दृष्टीनें विचार करूं लागला, व तेवढ्या एका क्षणांत सुधीरच्या धेनुकुंजांतील मुक्कामाची त्याच्या मनानें घाईनें पाहणी केली, तेव्हां भित्याला पाठीशीं ब्रह्मराक्षस आहेसें वाटावें तशी खानसाहेबांची कल्पना त्याला खरी वाटली. तो अर्धवट मोठ्यानें स्वतःशीं म्हणाला,

" अस्सं काय !—अरे तिच्या !—"

तीं त्यांचीं बोलणीं अस्लमकाकांना इतकीं वेडेपणाचीं वाटलीं कीं आपण मध्येंच बोलावें असें त्यांच्या दहादां मनांत आलें. परंतु तो मोह त्यांनीं आवरला व खानसाहेब व सय्यद यांना सुधीर एकदम गेल्यानें जो आनंद झाला होता त्याचा त्यांनीं भंग केला नाहीं.

त्यांना स्वतःला मात्र सुधीरच्या जाण्याचा अतिशय खेद झाला होता, व तो असा गेला याला कारण खानसाहेबांचा अविचारीपणा अशी त्यांची पक्की समजूत झाल्यामुळें त्यांचा खेद त्यांना विशेष क्लेशदायक होत होता.

मीनाक्षीला दुःख अधिक झालें कीं आश्चर्य अधिक वाटलें तें सांगणें कठीण आहे. तिची व सुधीरची आदल्याच संध्याकाळीं गुप्त भेट झाली असल्यामुळें खानसाहेबांच्या बोलण्यानें अवमानित होऊन त्यानें धेनुकुंजाचा त्याग केला असें तिला वाटणेंच शक्य नव्हतें. उलट आपण भेट घेऊन आपल्या प्रेमाची ग्वाही सुधीरला दिली तेव्हां आतां खानसाहेबांकडून आपल्या प्रेमाला संमति मिळविण्यासाठीं तो धेनुकुंजला जरूर तितके दिवस राहीलच राहील अशी तिच्या मनाची खात्री होती. आणि बाप्पांची संमति मिळेपर्यंत त्याच्या व आपल्या गुप्त भेटी होणार व पहिल्या गुप्त भेटीचा उन्मादक अनुभव आपल्याला पुनः पुन्हां मिळणार या कल्पनेंत ती दंग होती. अशा स्थितींत सुधीर एकदम गेल्याचें समजतांच ती अगदीं स्तंभित झाली, व तिनें आपल्या तर्कशक्तीला कितीहि फटके मारले तरी त्या शक्तीचें दुबळें घोडें फारसें मजल मारीना. दुःख व विस्मय या दोहोंच्या क्लेशांनीं तिचें हृदय अगदीं दीन होऊन गेलें.

शेवटीं ती मनस्थिति तिला अगदीं असह्य झाली व तिनें अस्लमकाकांना आपल्या गुप्त भेटीची हकीकत सांगून टाकली. ती ऐकल्यावर खानसाहेबांच्या

बोलण्याचा राग मानून सुधीर एकदम गेला या आपल्या कल्पनेंत अर्थ नाहीं हें अस्लमकाकांस अर्थातच कळून आलें, व त्यांनाहि सुधीरच्या जाण्याचें मीनाक्षी-इतकेंच आश्चर्य वाटूं लागलें. सुधीरचा खानसाहेबांवर रोष होता तेव्हां जाण्या-पूर्वी त्यानें त्यांची भेट घेऊं नये हें कदाचित् साहजिक म्हणतां आलें असतें. पण कांहीं एका महत्त्वाच्या कामांत तो आपल्याला साहाय्य करीत होता, व आपल्यावर त्याचा मनापासून लोभहि होता असें असून एकदम निघून जाण्यापूर्वी सुधीरनें आपली गांठ घ्यायचा प्रयत्न करूं नये हें अस्लमकाकांना मनस्वी चमत्कारिक वाटलें. आणि मीनाची व त्याची आदल्याच दिवशीं एकान्तीं भेट झाली असून आणि त्या वेळीं परस्परांचीं प्रीतिवचनें झालीं असून तिचीहि भेट न घेतां त्यानें अक-स्मात् जावें हा तर चमत्काराचा कळस होता. अस्लमची मति चालेना. त्यांनीं फक्त मीनाला येवढाच धीर दिला कीं कांहीं तरी तसेंच विलक्षण निकडीचें काम आल्याखेरीज सुधीर गेला नाहीं, व तो पुन्हां भेटल्याखेरीज राहणार नाहीं.

परंतु येवढ्या आश्वासनावर समाधान मानायला प्रेमानें उत्शृंखल झालेलें स्त्रीहृदय कधीं तयार होईल काय? शिकाऱ्याची गोळी निसटती लागून दूर पळून झाडींत लपलेल्या हरिणानें सारखी उलगाघाल करावी तसें तिच्या मनाचें दिवसभर चाललें होतें; व शेवटीं खानसाहेब दोन दिवस हिंदोलीला जाऊन यावयासाठीं म्हणून संध्याकाळीं गेले तेव्हां तिला एक कल्पना सुचून ती अस्लमकाकांना म्हणाली,

"काका, एक काम करतां?"

"कसलं?"

जेथें सुधीर राहिला होता तेथील बागवानाला त्याच्या जाण्याचें कारण माहीत असलें पाहिजे व त्याची गांठ घेतली तर कांहीं तरी खचित कळेल अशी मीनाक्षीच्या डोक्यांत कल्पना आली होती. ती काकांना सांगून तिनें म्हटलें,

"जातां? आपली दुसरी मोटार आहे. अं? माझ्यावर उपकार होतील—"

"ए खुळे!—" तिच्या गालावर चापट मारल्यासारखा दुरूनच हात फिरवीत अस्लम म्हणाले, "जातों. सांग ड्रायव्हरला."

मग अस्लमकाका गेले व मीनाक्षी प्रथम व्हरांड्यांत उभी राहिली आणि काका काय बातमी आणतात याविषयीं कांहीं वेळानें मन फारच अधीर झाल्यामुळें ती पुढच्या प्रांगणांत येरझारा घालूं लागली.

अशा येरझारा घालीत असतां एकदां ती जागच्या जागीं बराच वेळ थबकून उभी राहिली. पश्चिमेकडील सूर्यास्ताचा देखावा पाहून अशाच रम्य देखाव्याच्या साक्षीनें आपलीं व सुधीरचीं पहिलीं मधुर वचनें कशीं झालीं होतीं त्याची तिला आठवण झाली, आणि आपलीं तीं लाजरीं भाषणें ऐकून घेऊन कोणा अदृश्य प्रीतिदेवतेनें या गडद गुलाबी रंगछटांनीं पश्चिमक्षितिजावर जणूं कायमचीं लिहून ठेवलीं आहेत असें तिला वाटलें. क्षितिजभागांत उसळलेल्या त्या रंगलहरींकडे कितीहि पाहिलें तरी तिच्या मनाची तृप्ति होईना.

इतक्यांत कोणाची तरी अगदीं आपल्याला लगटून चाहूल झाल्यासारखें तिला वाटलें व त्यामुळें ती त्या गोड अतृप्तींतून भानावर आली. कोणसें तिला विचारीत होतें,

" खानसाहेब खरंच गांवीं गेले आहेत ?—"

तिनें वळून पाहिलें व तत्क्षणीं तिच्या भ्रुकुटी वक्र झाल्या.

कारण तिच्याजवळ आलेलें माणूस दुसरें तिसरें कोणी नसून सय्यद होता.

त्यानें पुन्हां म्हटलें,

" रखवालदार म्हणतो खानसाहेब गांवीं गेले म्हणून. खरं आहे हें ?—"

हें विचारतांना सय्यदनें किंचित् हास्य केलें, पण तें पुरतें दिसण्यापूर्वीच विरलें. कारण मीनाक्षीनें कपाळाच्या आंठ्या वाढवून म्हटलें,

" आमच्या घरांत झूट बोलायची कोणाला संवय नाहीं."

या उत्तरानें सय्यद किंचित् वरमला, पण मुद्रेवर तें न दाखवितां त्यानें हंसत म्हटलें,

" तें मला सांगायला का हवं ? खानसाहेब शब्दाचे सच्चे आहेत अशीच त्यांची दुनियेंत ख्याति आहे. एकदां शब्दांनीं दिलेली गोष्ट कांहीं झालं तरी ते शब्द राखून देणारच—"

या बोलण्यांत काय ध्वनित करावयाचा सय्यदचा हेतू होता तें मीनाक्षीच्या ध्यानांत यावयास वेळ लागला नाहीं. खानसाहेबांनीं आपली मुलगी वाचेनें मला देऊन टाकलेली आहे हेंच त्याला सूचित करावयाचें होतें यांत मीनाक्षीला संशय वाटला नाहीं. त्याचा तो भावार्थ मनांत येतांच ती जरा गोंधळली व आपल्याच शब्दांत सय्यदनें आपल्याला पकडलें या कल्पनेनें ती गोंधळलीच नव्हे तर मनांतल्या मनांत चिडलीहि. हा सय्यद कोठून एकदम

या वेळीं आपल्यासमोर प्रगट झाला असें तिला वाटलें. त्याच्या त्या तशा जवळ लगटून उभें राहण्याचा तिला अगदीं तिटकारा आला. त्यानें पोषाखावर कसला तरी सेंट टाकला असावा त्याचा दर्पदेखील एखाद्या दुर्गंधीप्रमाणें तिच्या नाकांत सलला, व तिनें आपला पदर नाकाला लावल्यासारखेंसुद्धां केलें. एखादें माणूस आपल्याला अंतःकरणापासून नको असलें म्हणजे त्याचें बाह्य सौंदर्य व आकर्षणदेखील अंतःकरणाला तापदायक वाटूं लागतें.

तिच्या मुद्रेवरचा तो संभ्रम आणि राग पाहून सय्यदला मोठी गंमत वाटली. तो हंसून म्हणाला,

" तूं अशी कां बावरलीस ?—केवळ खानसाहेबांचा शब्द पकडून मी तुझी मागणी करतों अशी तूं भलती गैरसमजूत करून घेऊं नकोस. माझा दिल मीं तुला दिला आहे अन् इथं या अंतःकरणांत तुझ्यासाठीं तख्त तयार करून ठेवलं आहे त्याच्यावर तूं बैस असंच—"

एकदम मान वर करून मीनाक्षी रागानें म्हणाली,

" अमीरसाहेब ! "

" हाः हा ! किती मीठा तुझा हा रागाचा शब्द, अन् किती लाडका तुझ्या चेहऱ्यावरचा या वेळचा भाव ! हः ह ! मीना, या अजब सौंदर्यावर मला कविता रचतां यायची नाहीं, पण या जिवंत काव्याचं खरं सेवन करणारा रसिक एक मीच आहें. बेशक ! तुझ्यावर काव्य रचायचं काम आपण त्या पळपुट्या मुंबईच्या भामट्यावर—"

ते शब्द ऐकतांच

" अमीरसाहेब !—"

असा एकच उद्गार काढून खवळलेल्या नागिणीप्रमाणें मीनाक्षीनें एकदां सय्यदकडे पाहिलें, व मग मानेला एक धिक्कारदर्शक हिसडा देऊन ती तेथून जी गेली ती पायऱ्या चढून, व्हरांड्यांतून द्रुतगतीनें जाऊन, आपल्या खोलींत शिरून अदृश्य झाली.

शिकारीच्या वेळीं डावांत सांपडलेल्या वाघाच्या बच्चाशीं खेळावें तद्वत् सय्यद इतका वेळ तिच्याशीं खेळत होता; पण आत्तांच्या तिच्या उद्गारानें व मानेच्या त्या आविर्भावानें तोहि एकदम चमकला.

मीनाक्षी खोलींत गेली ती अगदीं चिडलेल्या मनःस्थितींत. सय्यदनें सुधीरचा अशा हलक्या शब्दांनीं उल्लेख केलेला ऐकण्याची पाळी यावी याचा तिला भयंकर विषाद वाटला. सुधीर कोठें गेला व कोणत्या कारणाकरतां गेला हें जर आपल्याला माहीत असतें तर सय्यदची आपण चांगली हजिरी घेतली असती असें तिला वाटलें. पण तें कोठें माहीत होतें? सुधीर कां गेला? आणि आपल्याला न भेटतां—आपल्याला बोटभर चिठ्ठीसुद्धां न धाडतां कसा गेला त्याचें आपल्यावरचें प्रेम एकदम कसें लयाला गेलें?—सुधीर परत येईल कीं नाहीं? समजा तो नाहीं आला तर?—

तर या सय्यदच्या विषारी एकडींतून आपली सुटका व्हायची कशी? या किळसवाण्या लग्नाच्या खाईंतच आपल्याला उडी घ्यावी लागणार! आपलें रक्षण कोण करणार? आणि मग आपल्या प्राणांचें रक्षण तरी कशाला व्हायला पाहिजे? ते प्राण कोणासाठीं ठेवायचे? त्या प्राणांचे स्वामी—त्यांनाच माझा धांवा ऐकूं जायचा नसेल!—

छे छे! काय अभद्र घटका आली ही!

अशा प्रकारें कांहीं खिन्नतेचे, कांहीं त्वेषाचे विचार करीत मीनाक्षी आपल्या खोलींतच बसून राहिली. दिवस सरला, रात्र पडून खोलींत अंधार पसरला तरी अंतःकरणांतल्या अंधारापुढें त्याकडे तिचें लक्षच गेलें नाहीं.

तितक्यांत बाहेर दारांतून कोणीशी हांक मारली,

"मीना! बेटा तूं इधर है?—"

तें ऐकतांच कोचावरून उठून मीनाक्षी धांवत आली व म्हणाली,

"काका, काका!"

"हें काय? अशी अंधेरांत कां बसलीस?"

"काका, माझ्या जीवितांतला प्रकाश एकदम नाहींसा झाला ना!"

"नही बेटा. असं म्हणूं नकोस. सुधीर तुझी माझी याद सोडून गेला नाहीं."

"काका?—" असें ती उद्गारली तेव्हां तिच्या त्या एकाच शब्दांत गहिंवराच्या कंपानें जो विलक्षण अर्थ व्यक्त झाला तो ज्यांनीं उन्मादक प्रेम केलें असेल व विरहाची व्याकुलता सहन केली असेल त्यांनाच कल्पनेनें जाणतां येईल.

" बेटा, मी त्या बागवानाची गांठ घेऊन आलों." अस्लम म्हणाले, " त्याच्या सांगण्यावरून असं दिसतं कीं त्याला कुठलीशी तार आली व त्याबरोबर त्यानं मुंबईस जायचं ठरवलं. पण त्या घाईतसुद्धां त्यानं एक माझ्या नांवाचं पत्र लिहून तें मला द्यायसाठीं बागवानाजवळ दिलं होतं."

" पण तें कधीं मिळालं तुम्हांला—"

" ऐक तर खरं. तो बागवान तें पत्र मला आणून देणारच होता. पण सकाळींच सय्यद तिथं गेला व त्यानं मी तें अस्लमना देईन असं सांगून म्हाताऱ्यापासून तें घेतलं, अर्थात्—"

" अस्सं काय ?—"

असें उद्गारून तिनें रागानें समोर पाहिलें. जणूं तिच्या कल्पनेनें हवेंत सय्यदची मूर्ति उभी केली होती व त्या काल्पनिक सय्यदवर ती आपल्या क्रोधाविष्ट दृष्टीचा वर्षाव करीत होती.

परंतु त्या क्रोधापेक्षां सुधीर तसाच निघून गेला नाहीं या बातमीच्या आनंदाचाच मीनाक्षीच्या मनावर पगडा अधिक होता, व त्यानंतर तिचीं व अस्लमकाकांचीं जीं बोलणीं झालीं तीं सगळीं आनंदाचीं व उल्हासाचींच होतीं.

त्या दोघांचें असें ठरलें कीं, अस्लमकाकांनीं सुधीरला पत्र लिहून इकडली हकीकत व मीनाक्षीचें कुशल कळवावें, व पत्राचें उत्तर बांदेषला आपल्या पत्त्यावर मागवावें. खानसाहेब हिंदोलीहून परत येतांच अस्लम त्यांचा निरोप घेऊन बांदेषला जाणार असें ठरलें होतें. तेथें अस्लमना सुधीरचें जें उत्तर येईल तें त्यांनीं मीनाक्षीला कळवावें.

या बेताप्रमाणें आज अस्लमकडून मीनाक्षीस पत्र आलें होतें, व प्रकरणाच्या आरंभीं जें पत्र फोडून प्यायचा सल्ला जुबेदानें तिला दिला होता तें हेंच पत्र होय.

सुधीरनें अस्लमना जें लांबलचक पत्र लिहिलें होतें त्याचा गोषवारा त्यांनीं उर्दूत मीनाक्षीला कळविला होता, व शिवाय सुधीरनें मीनाक्षीला म्हणून जें एक छोटें पत्र अस्लमच्या पत्रांत घालून धाडलें होतें तें अस्लमनीं जसेंच्या तसेंच आपल्या पत्राबरोबर पाठविलें होतें. मीनाक्षी पुनः पुन्हां वाचीत होती तें हें छोटें पत्र. हेंच जुबेदापुढें धरून ती म्हणाली,

" जुबी ! या पत्रांतलं अमृत कितीहि प्यायलं तरी पोट भरायचं नाहीं, तुला माहीत नाहीं का ? "

तिच्या हातांतून पत्र घेऊन तें पहात जुबेदा म्हणाली,

" शी ! बोटभरसुद्धां नाहीं पुरतं हें पत्र !--"

" नसूं दे, माझ्या प्रेमाला तें ब्रह्मांडाहून मोठं वाटतं !—"

" शी ! अन् हें काफिराच्या इंग्रजी भाषेंत लिहिलंय वाटतं ?—अं ?—"

" मग ? वेडे त्यांना उर्दू लिहितां येत नाहीं, विसरलीस वाटतं ?--"

" अस्सं ! अन् इंग्रजींत जशी कांहीं तूं आतां पटाईतच झाली आहेस !—" मान वेळावीत जुबेदानें चेष्टा केली.

" अग, मी पटाईत नाहीं झालें. पण त्यांनीं मुद्दाम माझ्यासाठीं अगदीं सोप्या भाषेंत लिहिलं आहे, किती कमअक्कल आहेस तूं जुबी ! "

असें म्हणून तिच्या हातून तें पत्र घेऊन मीनाक्षीनें त्याची घडी तिच्या गालावर मारली, व त्या दोघीहि मनःपूर्वक हंसल्या.

आपल्या प्रणयपत्रिकेच्या घडीचा तडाखा जुबेदाच्या गालावर बसेल ही सुधीरला कल्पना तरी असेल काय ? त्यानें मुळीं तें पत्र विलक्षण मनस्थितींत लिहिलें होतें. कराचीहून माईला घेऊन मुंबईस येतांच अस्लमकाकांचें पत्र येऊन पडलेलें पाहून त्याला अतिशय बरें वाटलें होतें हें खरें, व अस्लमकाकांना उत्तर लिहितांना आणि त्यांतच मीनाक्षीच्या नांवाचें एक छोटें प्रेमपत्र लिहून घालतांना त्याला कांहींएक अवर्णनीय आनंद झाला हेंहि खरें. पण एकंदरींत त्या वेळीं त्याच्या मनावर दुःखाचें व चिंतेचें पटल इतकें दाट पसरलें होतें कीं वर्षाकालीं रात्रींच्या वेळीं ढगांनीं खचलेल्या आकाशांत एखाद्या तारकेचा क्षीण प्रकाश उगीच क्षणभर दिसावा तसें त्या आनंदाचें झालें. आपल्या स्वतःच्या प्रणयाबद्दल विचार करावयास त्याच्या मनाला फुरसत नव्हती. माईचें पुढें कसें व्हावयाचें या एकाच विचारांत त्याचें मन सारखें गुंतलें होतें.

कारण माईविषयीं आपण कसल्या तरी एका नव्या कर्तव्याचा भार शिरावर घेतला आहे व तो आपल्याला नीट संभाळला पाहिजे हें त्याला स्पष्ट दिसत होतें. माईच्या दुखण्याची काळजी वाटण्याचें कारण नव्हतें. तिला एकदोन ठिकाणीं मार विशेष लागला होता, पण सुदैवानें जखमबिखम कोठेंच झाली

नव्हती, आणि केवळ शारीरिक व्याधीपुरतें पाहतां ती लवकरच पूर्ण बरी होईल असें साऱ्या डॉक्टरांचें मत होतें. तिची खरी व्याधी मानसिकच होती; व त्या व्याधीवर आपल्या निःसीम प्रेमाचें सतत अभ्यंजन हा एकच उपाय होय हें सुधीर आणि लक्ष्मीबाई पूर्णपणें जाणून होत्या. आपल्या पतिगृहाचा त्याग करून आपण माहेरीं आलों हें आपल्या धर्माच्या व संस्कृतीच्या दृष्टीनें भयंकर पाप घडलें अशी कल्पना माईच्या मनांत वारंवार येई व अशा वेळीं ती आपल्या मनाला फार त्रास करून घेई. हा तिचा मनस्ताप आपण हळुहळू नाहींसा केला पाहिजे हें सुधीरला स्पष्ट दिसत होतें, व त्याप्रमाणें तीं दोघेंहि वागत होतीं.

या त्यांच्या वागण्याचा सुपरिणाम फार लवकर दिसूं लागला असता, पण माईभोंवतीं घरांत जें वातावरण होतें त्यांत एक मोठा दोष उरला होता, व त्या दोषावर आपल्या हातीं कांहींएक इलाज नाहीं हें मनांत आलें कीं सुधीर फार कष्टी होई. तो दोष म्हणजे त्याच्या दादांची माई द्दलची वृत्ति.

पहिल्या दिवशीं माई त्यांच्या दृष्टीस पडली, व ते तिच्या अंथरुणाजवळ येतांच तिनें तशा त्या स्थितींतहि चटकन् उठून त्यांना नमस्कार केला तेव्हां तिला रीतसर आशीर्वाद देऊन ते पत्नीकडे वळून म्हणाले,

" फार खराब झाली आहे ही."

परंतु त्यांचा हा सहानुभूतीचा पहिला उद्गार शेवटचा ठरला.

कारण संध्याकाळीं त्यांची व सुधीरची निवान्तपणें भेट झाली व त्यानें वसंतरावाबद्दलची आणि कराचीस आपण गेलों तेव्हां काय काय घडलें त्याबद्दलची सविस्तर हकीकत दादांना सांगितली त्या वेळीं त्यांनीं जी चर्या केली व जे उद्गार काढले त्यामुळें सुधीरला परमावधीचा विस्मय व खेद वाटला. ते म्हणाले,

" म्हणजे माईला तुम्ही कायमची इकडे आणलीत म्हणायची ?—"

" हो—आत्तां मीं वर्णन केलंच ना तिच्या संसारसुखाचं! अशा संसारांत तिला ठेवण्यापेक्षां—"

" तुम्ही तिच्या ऐहिक सुखाचाच विचार केलात. तिचं पारलौकिक सौख्य तुम्ही साधलंत असं तुम्हांला वाटतं ?—"

" पारलौकिक ?—"

असा अगदीं भेदक आवाजांतला प्रश्न नकळत सुधीरच्या तोंडून बाहेर पडला.

पारलौकिक !

त्याला तो शब्द विलक्षण चमत्कारिक वाटला. माई उघड उघड नरकांत पडली असतां तिच्या पारलौकिक कल्याणाची दक्षता ठेवून तिला त्या नरकांतच पिचत सोडायला पाहिजे होती ? ज्या नरपशूनें साऱ्या मानवी भावनांचें आणि कर्तव्यांचें भस्म केलें होतें त्याच्या दाहक सहवासावांचून माईला पारलौकिक सुगतीचा दुसरा मार्गच नव्हता ? काल्पनिक पारलौकिकाची खोटी जगदंबा उभी करून तिच्या गळ्यांत रुंडमाला घालण्यासाठीं किती स्त्रीपुरुषांचीं मस्तकें आम्ही हिंदू आमच्या धर्माच्या व संस्कृतीच्या परशूंनीं तोडणार ?

अशा अनेक तीव्र कल्पना त्या क्षणीं सुधीरच्या मनांत आल्या व तो पुन्हां उद्गारला,

" पारलौकिक !—म्हणजे काय ?—"

त्याचे ते उद्गार ऐकून दादांनीं रुष्ट चर्या केली व म्हटलें,

" तें तुम्हांला समजायचं नाहीं. अन् मी तें तुम्हांला सांगायचा शीण तरी कशाला करूं ?—इतकंच कीं हें केलंत हें अतिशय निंद्य केलंत. माझ्या घरांत असं व्हायला नको होतं. पति कसाहि असला तरी पतिगृहाचा त्याग करणं हा सतीचा धर्म नव्हे. तो त्याग माईला तुम्ही करायला लावलात. छे छे ! आपला धर्म काय, आपली संस्कृति काय याचा अगदींच विसर कसा पडूं दिलात स्वतःला ?—असो. मला मुळीं आतांशा वाटूं लागलं आहे कीं घर तुमच्या हवालीं करावं अन् संन्यास घ्यावा ! पाहूं. आतां माईच्यासंबंधांत मला काडीचंसुद्धां कांहीं विचारूं नका म्हणजे झालं. तुम्ही तिच्या सुखाचा परिभार आपल्यावर घेतला आहांत. साधा तिचं सुख कशी तुमची मति असेल त्या-प्रमाणं. सच्चिदानंद—"

असा शेवटीं उद्गार काढून दादा उठले व त्यांना बापटशास्त्र्यांकडे जायचें होतें तिकडे गेले.

त्यांच्या त्या " सच्चिदानंद " उद्गाराचा पोकळपणा सुधीरला किती चमत्कारिक वाटला. ज्या सत्, चित् आणि आनंद या त्रयींची घोषणा दादा

नेहमीं करतात त्यांची स्वतंत्र बुद्धीनें कांहीं छाननी दादांनीं स्वतःच्या मनाशीं केली आहे का? का केवळ जें प्राचीन पूर्वजांनीं लिहिलें तें 'सत्', जें फक्त त्याच पूर्वजांजवळ होतें व आपल्याजवळ असलें तरी वापरायचें नाहीं तें 'चित्', आणि जो ऐहिक जीवनांत मिळणाऱ्या सुखाशीं विरुद्धच असला पाहिजे आणि ज्याची केवळ पोकळ कल्पनाच हृदयाशीं कवटाळायची तो 'आनंद'!

कोंपऱ्यांतील सोटा उचलून उपरणें सांवरीत दाराबाहेर पडणाऱ्या दादांच्या मूर्तीकडे पहात असतां सुधीरच्या मनांत हे विचार फारच जोरानें आले; व त्याच क्षणीं मीनाक्षीची त्याला आठवण होऊन आपल्या प्रेमाची हकीगत दादांना कळली तर काय काय प्रकार घडतील याबद्दलच्या शेंकडों पुसट कल्पनांची त्याच्या डोळ्यांपुढें गर्दी झाली.

त्या साऱ्या गर्दींत दादांच्या हातांतला तो सोटा त्याला अगदीं स्पष्ट दिसत होता. आपला व दादांचा जो कलह हळुहळू जवळ येत चालला आहे तो किती उग्र व क्लेशपूर्ण होणार त्याची तो काष्टखंड जणूं आपल्याला सूचनाच देत आहे असें त्याला वाटलें.

# प्रकरण २३ वें

## शाल व शेला



शास्त्रांची प्रगति कितीहि झाली तरी माणसाच्या मनाचें नक्की स्वरूप गूढच राहणार. मन म्हणजे विचार निर्माण करणारी कांहीं एक शक्ति आहे काय? आहे म्हणावें तर कधीं कधीं परस्परविरोधी विचारांच्या तडाक्यांत तें असें सांपडतें कीं त्याच्या त्या दुबळे-पणाची आणि क्लेशांची कींव येते. बरें, विचारांची निर्मिति करण्याचें सामर्थ्य मनांत नसून तें केवळ विचारांचें आश्रयस्थान आहे म्हणावें तर हे विचार मग कोठून निर्माण होतात याविषयीं कांहींच संगति लागत नाहीं. सारांश, मन म्हणून ज्याला आपण सामान्य व्यवहारांत सहजासहजीं नांव देतों तें एक कूटच आहे; आणि विशेषतः दोन जबरदस्त विरुद्ध विचारांच्या कल्लोळांत माणूस हेलकावे खायला लागला कीं त्याला हें कूट अधिकच अभेद्य वाटायला लागतें.

निदान सुधीरला तरी तें तसें वाटूं लागलें होतें खचित. या पंधरावीस दिवसांत दोन्ही दिशांनीं एकदम झडपणाऱ्या वावटळींत सांपडल्यासारखी त्याच्या मनाची अवस्था झाली होती, व कोणीकडच्या वाऱ्याबरोबर तें अखेर उडणार आहे तें त्यालाच कळेनासें झालें होतें. अगदीं क्षुल्लक गोष्टीवरून त्याच्या मनांतील विरोधी विचारांपैकीं कोणता तरी एक बळावे, आणि मग एखाद्या जबरदस्त मालकानें एखाद्या गुलामाला राबवावें तद्वत् त्याच्या मनाची अवस्था होई.

आत्तांचा प्रकार अशापैकींच झाला.

ऑफिसच्या कामांतून सुटका होतांच तो घरीं आला होता. आतांशा तो फिरायला वगैरे न जातां तडक घरींच येई व सबंध संध्याकाळचा वेळ माईशीं गप्पा मारण्यांत घालवी. माईचें दुःख हलकें करण्याखेरीज दुसरें कसलेंच कर्तव्य त्यानें सध्यां मनापुढें ठेवलें नव्हतें. खरें म्हटल्यास मीनाक्षीच्या दर्शनसुखा-साठीं त्याचें हृदय आतुर झालें होतें; आणि मदीना हॉटेलमधील आगीच्या रह-

त्याचा अजून पुरता उलगडा त्याला करावयाचा होता. त्यासाठींहि शक्य तितक्या लवकर पुन्हां धेनुकुंजास जाणें त्याला अवश्य होतें. परंतु आपल्या अनावर प्रेमालाहि त्यानें आवरलें होतें, व ब्राउनिंगसाहेबाच्या तगाद्याकडे दुर्लक्ष करून ऑफिसच्या कामाचें महत्त्वहि सध्यां तो मानीत नव्हता. माईचें दुःख शिळें होऊन ती थोडी तरी सुखांत असलेली दिसल्याशिवाय सुधीरचें पाऊल मुंबईतून बाहेर पडणें शक्य नव्हतें.

त्यामुळें तो सध्यां शक्य तेवढा वेळ माईशीं गोष्टीविनोद करण्यांत खर्च करी; व त्या गप्पागोष्टींनीं माई थोडी जरी हंसलीसंवरली तरी त्याला धन्यता वाटे. त्यानें ऑफिस सुटल्याबरोबर घरीं यावयाचें आणि मग लक्ष्मीबाई व माई यांच्याबरोबर चहा घेऊन त्यांच्याशीं माजघरांत बोलत बसायचें हा रोजचा क्रम ठरल्यासारखा झाला होता.

या क्रमाला अनुसरून आजहि सुधीर घरीं आला होता, आणि चहा आटपून तो, माई व लक्ष्मीबाई बोलत बसलीं होतीं. माई कांहीं आतां अंथरुणावर पडून नव्हती. ती थोडी थोडी हिंडूं फिरूं लागली होती, आणि सुधीरनें मेरीकडून मुद्दाम मागवून आणलेल्या नमुन्यांवरून रुमालाचें काम शिकण्यांतहि ती बराचसा वेळ घालवी. आतां तिच्या मांडीजवळ सुताची गुंडी, सुया, नमुन्याचा छापील कागद हें सारें साहित्य पडलेलें दिसतच होतें. लक्ष्मीबाई ताटांत तांदूळ घेऊन ते नीट करतां करतांच संभाषणांत भाग घेत होत्या.

त्यांच्या संभाषणाचा विषय इतका हलका होता कीं त्यांत सुधीर मोठ्या मनःपूर्वक बोलत असलेला पाहून एखाद्याला आश्चर्यच वाटलें असतें. कराचीकडले सिंधी लोक उडदाऐवजीं वाटाण्याच्या डाळीचे पापड कसे करतात, व त्यांची खिचडी कशी विचित्र असते त्याचें माई वर्णन करीत होती, लक्ष्मीबाई तें ऐकत असतां “ इश्श्! खरंच का ! ” “ काय बाई तरी ” अशा उद्गारांनीं अर्धवट आश्चर्य व अर्धवट नापसंती व्यक्त करीत होत्या, आणि सुधीर मधूनच कांहीं बोलून किंवा कांहीं प्रश्न करून माईचें बोलणें वाढवीत होता. प्रेमभराचीं बोलणीं चाललीं म्हणजे त्यांतील आनंद विषयावर अवलंबून नसतो. सुधीर मध्येंच म्हणाला,

“ माई, तूं अगदीं चांगली बरी झालीस कीं एकदां ही सिंधी खिचडी कर अं—”

"इश्श ! त्याला चांगलं बरं कशाला व्हायला हवं ?—" माई हंसून म्हणाली, "अन् मी आतां आणखी बरी ती काय व्हायची राह्यली आहें ?—"

सुधीर कायसें बोलणार होता. पण तितक्यांत दादा बाहेर आल्याचें त्या सर्वांनीं पाहिलें व त्यांचा तो विषय तितकाच राहिला.

दादा रोजच्यासारखे बाहेरच्या बाहेरच न बसतां आंत येत आहेत हें पाहून सुधीरला आश्चर्य वाटलें. दादा माजघरांत आले तेव्हां लक्ष्मीबाई हातांतलें ताट घेऊन झट्दिशीं उठल्या, व माई आणि सुधीर यांनींहि जागच्या जागीं चाळवाचाळव केली.

दादांच्या डाव्या हातावर एक कोरी भरजरी शाल होती. ती दाखवीत ते सुधीरला म्हणाले,

"ही माईच्या अंगावर घालायची असा मीं संकल्प केला आहे."

सुधीर क्षणभर त्यांच्याकडे पहात राहिला, व त्यानें किंचित् हंसल्यासारखें केलें.

दादा पुढें म्हणाले,

"बापटदीक्षितांच्या यज्ञाची समाप्ति उत्तम प्रकारें झाली; आज त्यांनीं कांहीं देणग्या दिल्या. माझ्या वांट्याला सर्वांत बहुमानाची ही शालजोडी आली. मी नको नको म्हणत असतां माझं न ऐकतां त्यांनीं भरसभेंत माझ्या हातीं घातली. मग प्रसाद नाहीं म्हणतां येईना. अन् मग मनांत आलं, याज्ञिकाकडून मिळालेलं हें पवित्र महावस्त्र आपल्या माईच्या अंगावर घालावं, म्हणजे सारं अरिष्ट नाहींसं होईल—"

त्यांचे ते शब्द ऐकत असतां सुधीरच्या मनांत शेंकडों विचारांची गर्दी झाली. आज सकाळींच त्यानें दैनिक पत्रांत बापटांच्या यज्ञसमारंभाविषयीं दोन संपादकीय स्फुटें वाचलीं होतीं, व त्यांत शेवटीं कांहीं व्यक्तींचे आभार मानतांना त्याच्या दादांच्याविषयीं जो अत्यंत गौरवाचा स्वतंत्र पॅरा होता तो त्याला अजूनहि स्पष्ट आठवत होता. त्या संपादकीय स्फुटांत लिहिलें होतें,

"या यज्ञकार्यास ज्यांची मदत झाली त्या मंडळींत येथील सन्मान्य नागरिक श्री. शंभुराव जोग यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. वैदिक परंपरेविषयीं जाज्वल्य अभिमान आणि चारित्र्याची प्रखर शुद्धता हे गुण अलीकडील सुशिक्षितांत क्वचितच दिसतात, त्यामुळें त्या गुणांनीं

मंडित असलेल्या शंभुराव जोगांसारख्या सुशिक्षित विद्वानानें या यज्ञ-कार्यास अहर्निश झटून मदत केली याबद्दल त्यांचें करावें तेवढें अभि-नंदन थोडेंच होईल."

हें सकाळीं वाचल्यापासून सुधीर विचार करूं लागला होता, दादांच्या-विरुद्ध आपल्या मनाचा कल होत चालला आहे तो कितपत श्लाघ्य आहे? दादांच्या धर्म व संस्कृति याबद्दलच्या कल्पना भ्रामक आहेत यांत संशय नाहीं. परंतु दादांची अलौकिक विद्वत्ता आणि असामान्य शुचित्व यांची योग्यता अतिशय श्रेष्ठ नाहीं काय? आणि त्यांची ती योग्यता ओळखून मोठ-मोठीं माणसें त्यांचा गुणगौरव करीत असतां आपण त्यांच्याविरुद्ध पुंडावा करण्याचे बेत मनाशीं करावेत? आपण तर पितृभक्तीच्या बंधनानें त्यांच्याशीं बद्ध आहोंत. पिता आपल्याला आपल्या मनाप्रमाणें वागूं देत असतांना पुत्रानें त्याची आज्ञा शिरसा मान्य केली तर त्यांत पुत्राची थोरवी ती काय? उलट, कांहीं विलक्षण त्याग करावा लागत असूनहि, कांहीं तरी दुःख व तळमळ सोसावी लागत असूनहि पित्याचें समाधान ढळूं दिलें नाहीं व त्याच्या आज्ञेचें उल्लंघन केलें नाहीं तरच ती खरी पितृभक्ति नव्हे काय? दादा आपल्या आईशीं फारसें मधुर वागत नाहींत. ही त्यांची चूक असेल, संस्कृतिविषयींच्या विचित्र कल्पना त्यांनीं उराशीं बाळगल्या हाहि त्यांचा मोठा दोष म्हणावा लागेल, माईच्या बाबतींतली त्यांची वृत्ति दूषणीय ठरेल—परंतु हें सारें खरें असलें तरी त्यांना दुखविण्याचा अधिकार आपल्याला पोंचतो काय?—

सकाळपासून सुधीरच्या मनांत अशा तऱ्हेचे विचार सुरू होते, आणि आत्तां शालजोडीबद्दलचें दादांचें बोलणें ऐकतांच शाळेंतलीं मुलें कवाइतीच्या तासाच्या वेळीं एकदम रांगेनें उभीं रहावीं तसे ते सगळे विचार त्याच्या डोळ्यां-पुढें एकदम आले. इतकेंच नव्हे तर त्याला असेंहि वाटलें कीं दादांच्या वेदान्ती शुष्क हृदयांतहि मायेचा ओघ सरस्वतीसारखा गुप्त कोठें तरी वहात आहे असें समजायला नको काय? दादांच्या कर्मठ चरित्रक्रमाच्या आणि वेदान्ती अलगपणाच्या वाळुकेखालचा तो प्रेमौघ क्वचितच दिसत असला तरी तो तेथें नाहींच अशी त्यांच्याविषयीं आपण कल्पना ठरविणें योग्य होईल काय? आणि तें योग्य नसेल तर त्यांना दुःख होईल असें कांहीं आपल्या हातून घडल्यास—

अशा प्रकारच्या विचारांची गर्दी मनांत वागवीत सुधीरनें दादाकडे टक लावून पाहिलें.

त्यांचा तो शुभ्र अंगरखा, शुभ्र उपरणें, डोक्यावरचें रुबाबदार पागोटें, भव्य चेहरा, मोठमोठ्या मिशा, आणि रुंद कपाळावरच्या गंधाच्या स्पष्ट रेघा, हें दृश्य पाहतां पाहतां पावित्र्याच्या व विद्वत्तेच्या या प्रसन्न मूर्तीला दुःख देण्यासाठींच आपला जन्म आहे काय असें सुधीर आपल्या मनाला विचारूं लागला.

दादांच्याविषयींची त्याच्या मनांतली भक्ति फार जुनी होती, आणि त्या भक्तीला प्रसंगोपात कितीहि धक्के बसले तरी ती भक्ति उन्मळणें फार कठीण आहे असा प्रत्यय त्या क्षणीं त्याला आला—

मात्र हा प्रत्यय सुखावह होण्याऐवजीं त्रासाचाच अधिक होण्यासारखी परीस्थिति होतीच व आणखी निर्माणहि होत होती. कारण दादांच्या पांडित्या-विषयींची लोकांतली कीर्ति आणि त्यांचें शुचित्व हीं वगळलीं, व घरांतल्या माणसांच्याविषयींची त्यांची वृत्ति व वर्तणूक पाहिली कीं सुधीरला आपलें मन आवरणें कठीण जाई, आणि माई घरीं आल्यापासून असा एक कायमचाच विषय निर्माण होऊन बसला होता कीं ज्यावर दादांच्या व सुधीरच्या मतांत व विचारांत सर्वस्वीं विरोध असावा.

त्या दिवशीं दादांनीं माईच्या अंगावर शाल घातली खरी. पण त्यानंतर दोनचार दिवसांतच सुधीरला त्यांच्या त्या शाल घालण्यांतला खरा अभिप्राय कळून आला.

माईला पतिगृह सोडून कायमचें माहेरीं यावें लागलें आहे, तेव्हां स्त्रियांना साजेशा कोणत्या तरी स्वतंत्र धंद्याचें शिक्षण तिला द्यावें असें सुधीरच्या मनांत सारखें येई. या बाबतींत मेरीजवळ त्याचें बोलणें झालें तेव्हां ख्रिश्चन ऑर्फनेजमार्फत चाललेल्या नर्सिंगच्या क्लासांत माईच्या शिक्षणाची व्यवस्था उत्तम प्रकारें करून देण्याचें तिनें तत्परतेनें कबूल केलें.

लक्ष्मीबाईंना सुधीरचा विचार वावगा वाटला नाहीं आणि स्वतः माईलाहि तो पटला.

मग त्यानें धीर करून दादांजवळ एके दिवशीं तो विषय काढला. माईच्या अंगीं कोणत्या तरी प्रकारचें स्वतंत्र कर्तृत्व येणें किती आवश्यक आहे, नर्सिंगचें काम किती परोपकाराचें आणि लोकोपयोगाचें आहे, आणि त्या कामांत मन

गुंतविल्यानें माईला आपल्या दुर्दैवाचा कसा सहज विसर पडेल इत्यादि गोष्टी-विषयींचे आपले विचार सविस्तरपणें आणि न भितां दादांच्यापुढें मांडावयाचें त्यानें मनाशीं ठरविलें होतें. परंतु प्रत्यक्ष बोलायची वेळ आली तेव्हां मनांत योजलेलें सारें बोलणें त्याच्या तोंडून बाहेर पडलें नाहीं. एखाद्या गोष्टीविषयीं मोठी आस्था असली व ती ज्या वडील माणसाजवळ बोलायची त्याला रुचेल न रुचेल अशी जबर शंका असली म्हणजे बोलतांना माणसाची मनस्थिति मोठी विचित्र होते. गाडी सुटेल अशा धास्तीनें नळावर पाणी पिणाऱ्याच्या ओंजळीं-तलें अर्धेअधिक पाणी गळावें तसें अमुक सांगूं तमुक सांगूं असें योजलेलें अर्धे-अधिक बोलणें गळतें.

सुधीरचें तसेंच झालें, आणि आपलें बोलणें संपवून जेव्हां त्यानें विचारलें,

" माईला नर्सिंगच्या क्लासांत घातलं तर ? "

आणि जेव्हां त्याचा प्रश्न ऐकल्यावर दादा बराच वेळ कांहींच बोलले नाहींत तेव्हां त्याच्या मनाचा मोठा घोंटाळा उडाला. काय बोलावें व कसें बोलावें हें त्याला सुचेना.

जरा थांबून त्यानें पुन्हां विचारलें,

" घालावी का माईला त्या क्लासांत ? "

सुधीरकडे पाहण्याऐवजीं मान खालीं हातांतल्या पुस्तकाकडे करून दादा म्हणाले,

" तुम्हांला हवं तें करा. अन् अशा गोष्टी मला आतां विचारीतच जाऊं नका हें बरं. "

" पण—असं—"

" हो तेंच बरं. कारण माईच्या दुस्थितीवर खरा उपाय तुम्हाला एक वाटतो, मला दुसराच वाटतो. माईला शिकवली, स्वतंत्र धंद्याला लावली कीं तिचं सुख साधलं असा तुमचा विचार वाहतो. सुवासिनीच्या जीविताची ही सार्थकता नव्हे हा शास्त्रविचार तुम्हांला सुचत नाहीं. माईचं खरं कल्याण तिच्या पतीची मति निवळावी अन् त्यानं तिच्यावर अनुकंपा करावी यांतच आहे. तसं व्हावं हें देणं रोज देवाजवळ मागायचं किंवा ईश्वरी कोप निवारण्यासाठीं अन्य कांहीं यत्न ठेवायचा हा खरा उपाय. मी परवां तिच्या अंगावर शाल घातली ती याच अभिप्रायानं. पण तुमच्या आमच्या विचारांच्या दिशाच मुळीं भिन्न—"

इतकें म्हणून दादांनीं अत्यंत गंभीर चर्या केली व हातांतील पुस्तकांतील श्लोक मनाशींच पण जरा मोठ्यानें म्हणावयास अशा कांहीं आविर्भावानें प्रारंभ केला कीं "आतां या विषयासंबंधीं अधिक कांहीं बोलायला मी तयार नाहीं" असेंच त्यांना सुचवावयाचें होतें.

मग सुधीर तेथून उठला.

दादांनीं त्या दिवशीं माईच्या अंगावर शाल घातली त्यांत एखाद्यानें रोग्याच्या गळ्यांत ताईत किंवा दंडाला दोरा बांधावा यापलीकडे कांहींच अभिप्राय नव्हता, तर असा विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं; आणि दादांनीं शाल घातलेली पाहून जितक्या जोरानें त्याचे विचार एका दिशेला वाहवले होते तितक्याच जोरानें ते अगदीं विरुद्ध दिशेनें खळखळूं लागले.

छे छे ! दादांच्या या विचित्र कल्पनांचा जुलूम कोठपर्यंत सहन करायचा असें तो सारखें मनाशीं म्हणूं लागला, व या जुलमाचा धिटाईनें प्रतिकार केला तर तें पाप ठरेल कीं पुण्य ठरेल या प्रश्नाला "पाप काय म्हणून?" असें उलट प्रश्नात्मक उत्तर त्याच्या मनांत तयार होऊं लागलें.

याचा परिणाम असा झाला, कीं नर्सिंग क्लासमध्यें माईला घालण्याच्या बाबतींत जरी त्यानें दादांचा प्रतिबंध मान्य केला तरी दुसऱ्या एका बाबतींत त्यानें त्यांच्या रोषाची फारशी फिकीर करावयाची नाहीं असें ठरविलें.

गेल्या पांचसहा दिवस तो व माई सकाळीं लवकर उठून चौपाटीकडे फिरायला जात असत. त्या वेळीं रोज त्याच्या मनांत एक कल्पना येई व तो तिचें प्रयत्नानें संयमन करी. पण आज संयमनाची इच्छा त्याच्या मनांत उरली नाहीं. फिरून परत यावयाच्या वेळीं विल्सन कॉलेजच्या कोपऱ्यापाशीं आल्यावर तो माईला म्हणाला,

"माई, आपण केशवकाकांकडे जाऊं. येतेस?"

माईनें जरा चपापून त्याच्याकडे पाहिलें तेव्हां तो पुढें म्हणाला,

"तुला भेटायची काकांची किती इच्छा आहे तुला कल्पना नाहीं. केव्हांहि त्यांच्याकडे गेलं कीं माईला घेऊन केव्हां येणार म्हणून विचारतात. काल तर ते अर्धवट चेष्टेनं म्हणाले, तूं माईला आणणार नसलास तर मीच तिला भेटायसाठीं तुमच्या घरीं येईन, दादा मला हांकून तर देणार नाहीं!—"

"इतका आपल्या दादांचा राग आहे का रे त्यांच्यावर?—"

" दादांना रागवायला लागतं आहे काय ? "

" हो, बाकी—"

" तुझ्याबद्दलची तार कराचीहून आली तेव्हां काका कुलाब्याच्या स्टेशनवर मला धीर द्यायसाठीं आले होते अन् गाडी सुटस्तवर गेले नाहींत, दादांना मात्र—"

तो दादांच्याबद्दल कांहीं तरी वावगें बोलणार हें जाणून माई म्हणाली,

" जाऊं दे रे तें—"

" नाहीं, काकांचा जीव तुझ्यासाठीं कसा तुटतो तें तुला सांगायसाठीं हें काढलं मीं. काका—"

" काकांचं प्रेम मला माहीत का नाहीं ? "

" मग चल तर काकांच्याकडे आत्तां." सुधीर म्हणाला.

" पण आपण काकांकडे गेऴों होतों हें दादांना कळलं म्हणजे ?—"

" कळलं कशाला ?—मीच सांगेन आम्ही गेलों होतों म्हणून—"

" छे ! वेडा आहेस काय ? " अगदीं दचकल्यासारखें करून माई म्हणाली. पण मग तिनें काकांच्याकडे जाण्याबद्दल अधिक आढेवेढे घेतले नाहींत. काकांकडून परतल्यावर वाटेनें चालतां चालतां माई म्हणाली,

" किती गोड आपल्या काकांचा स्वभाव—"

" पण आपल्या दादांना कुठं त्याची किंमत वाटते ?—"

" त्यांच्या त्या बाईबद्दल माझ्या कांहीं निराळ्याच कल्पना होत्या—"

" होय ना—"

" पण आतां अगदीं खोट्या ठरल्या त्या साऱ्या. तिच्या देखणेपणासारखाच तिचा स्वभाव आहे."

" माझ्यावर तिची फार ममता आहे."

" थोरली बहीण नाहीं वागवणार असं वागवलंन मला." माई म्हणाली, आणि मग जरा मनाशीं कसलासा विचार करून तिनें म्हटलें,

" काकांचा हा संसार जरा जनरीतीहून वेगळा खरा, पण किती सुखाचा आहे, नाहीं ? "

सुधीरला तिच्या त्या शब्दांचा फार आनंद झाला. तो म्हणाला,

" मला नेहमींच तसं वाटतं. माझ्या मनांतली गोष्ट तूं बोललीस."

यानंतर कांहीं वेळ दोघें स्तब्धपणें पावलें टाकीत होतीं.

मग सुधीरनें एकदम म्हटलें,

" माई, तुला एक अगदीं विचित्र प्रश्न विचारणार आहें मी."

" विचार कीं—"

" समज, एखाद्या मुसलमानी मुलीशीं मीं लग्न केलं, तर तुला काय वाटेल ?—"

" इश्श, कांहीं तरीच चेष्टा काढलीस."

" अग चेष्टा नाहीं, अगदीं खरं म्हणून समज अन् सांग—"

" इश्श, कांहीं तरीच काय म्हणून समजायचं ?—"

" अग कांहीं तरी नाहीं. अगदीं खरं—"

परंतु सुधीरचें सांगणें माईला खरें वाटेना, आणि तिच्याकडून तिचें मत काढून घेण्याचा नाद त्याला सोडून द्यावा लागला.

तीं घरीं पोंचलीं तों दारांत पोस्टमन उभा होता. सुधीरच्या नांवाचें एक रजिस्टर्ड पार्सल त्याच्याजवळ होतें, व सही हवी म्हणून तो थांबला होता.

सुधीरनें सही करून पार्सल घेतलें.

पार्सल मीनाक्षीकडील आहेसें पाहून आनंदमिश्रित विस्मयाची छटा त्याच्या मुद्रेवर उमटली. मीनाक्षीकडून एक पत्रहि आलें होतें. तें पत्र वाचण्यांत तो गुंतला तेवढ्यांत माई तें पार्सल घेऊन " कोणाचं रे ? " असें म्हणून फोडूं लागली.

पार्सल उघडलें जातांच आंतील वस्तू पाहून माई उद्गारली,

" ओ हो ! "

सुधीरनें मान वळवून पाहिलें. पार्सलांत काय वस्तू होती तें त्याला पत्रावरून कळलेंच होतें. तो हंसत माईला म्हणाला,

" बघ कीं उलगडून."

तो एक अतिशय सुंदर रेशमी शेला होता. त्याचें वस्त्र इतकें तलम व मृदु होतें कीं माई उलगडूं लागली तों तो तिच्या हातांतून ओघळल्यासारखा झाला. त्यावर मीनाक्षीनें कशिदा केला होता. धेनुकुंजकडच्या भागांत विपुल असणाऱ्या सदाफुलीच्या पोंवळ्या रंगाच्या फुलांच्या ठिकठिकाणीं कल्पकतेनें

काढलेल्या आकृति अतिशय नाजुक दिसत होत्या. आणि कोंपऱ्यांत टाकलेलीं गुलाबाचीं प्रफुल्ल फुलें आणि त्याभोंवतीं दाखविलेले लहान भ्रमर सुबक आणि अगदीं हुबेहुब भासत होते.

चुकत माकत इंग्रजींत लिहिलेल्या पत्रांत मीनाक्षीनें लिहिलें होतें,

"...या पत्रांतलं माझं लिहिणं जसं वेडंवांकडं तसंच माझं शेल्यावरचं कशि-द्याचं कामहि. दोन्ही गोड मानून घ्यावीं..."

शेल्याकडे पाहतां पाहतां हें वाक्य सुधीरला आठवलें, व शेल्यावरचीं फुलें पत्रांतल्या वाक्यांसारखीं वेडींवांकडीं म्हणण्याऐवजीं तीं वाक्यें त्या फुलांइतकीं सुंदर म्हटलीं पाहिजेत असें त्याला वाटलें.

तो शेल्याकडे पहातच राहिला.

माई म्हणाली,

"कोणी रे सुधीरभाऊ धाडला हा?"

"मघांशीं तुला मीं जें विचारलं तें आठवतं आहे तुला?"

"काय?"

"एखाद्या मुसलमानी मुलीशीं माझं लग्न झालं तर तुला कसं वाटेल?—"

त्याच्या प्रश्नांतला अभिप्राय माईच्या लक्षांत येतांच ती चपापली, व त्या शेल्याकडे व सुधीरकडे आळीपाळीनें बघत ती आश्चर्यानें उद्गारली,

"सुधीरभाऊ!—"

पण मग तिच्याशीं कांहीं अधिक बोलण्याऐवजीं सुधीरनें झटकन् तो शेला हातीं घेतला व तो आपल्या खोलींत गेला.

एकान्तांत त्यानें तो हृदयाशीं धरला तेव्हां मीनाक्षीच्या अंतःकरणांतील प्रेमपरिमळच त्या सदाफुलीच्या सुकुमार पुष्पांच्यारूपानें आपल्या हृदयाला बिलगला आहेसें त्याला क्षणभर वाटलें. पण लगेच शेल्याच्या त्या नाजुक स्पर्शानें विरहाची असह्य वेदना शरीरभर पसरल्यासारखी त्याला भासली, व सारीं बंधनें आणि पितृश्रद्धेची खडतर अटक तोडून मीनाक्षीकडे या क्षणीं धांव घ्यावी अशी त्याला अमर्याद उत्कण्ठा वाटली.

# प्रकरण २४ वें






## जीवाचा आधार

मी नाक्षीनें सुधीरला खानसाहेबांना कळणार नाहीं अशा युक्तीनें शेला पाठविला त्याला पुरे आठदहाहि दिवस लोटले नव्हते अशा स्थितींत एके दिवशीं संध्याकाळीं एक भाड्याची घोडागाडी खानसाहेबांच्या बंगल्याच्या आवारांत शिरली, व आगाशीखालीं उभी राहिली.

खानसाहेब बाहेर गेले होते, पण एकदोन नोकर कचेरीच्या बाजूकडे उभे होते. गाडी थांबून तिच्यांतून डॉ. अस्लम बाहेर पडलेले पाहतांच त्यांना अतिशय विस्मय वाटला. डॉ. अस्लम यायचे झाले कीं बंगल्यावरची मोटार त्यांना आणावयासाठीं बंदरावर जायची हें नेहमीं ठरलेलें असे. अस्लम भाड्याच्या गाडींतून बंगल्यावर आलेले त्यांनीं आपल्या हयातींत कधीं पाहिलें नव्हतें. त्यामुळें अस्लमना पाहतांच त्या नोकरांना फार आश्चर्य वाटलें. ते त्यांच्याजवळ मोठ्या अदबीनें गेले व त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला,

" मालक बाहेर गेले आहेत. आपण येणार अशी वर्दी नव्हती—"

" अरे असं एकदम येण्यांतहि गंमत आहेच कनी !—"

असें म्हणून डॉ. अस्लमनीं त्या नोकराला हंसविलें खरें व त्यांची बॅग वगैरे झटकन उचलून ते दोघे नोकर डॉ. अस्लमसाठीं जी खोली ठरल्यासारखी झाली होती तिकडे धांवले ते हंसत, आनंदांत धांवले खरे; पण स्वतः अस्लमच्या चेहऱ्यावर बोलतांना जें हास्य उमटलें तें मात्र शब्दांबरोबरच संपलें. माणसाचें हंसणें मनःपूर्वक असलें म्हणजे तें भाषणानंतर कांहीं वेळ राहतें. तें कृत्रिम असलें म्हणजे मात्र यांत्रिक भावल्याचें हंसणें जसें कळीवरचा हात काढतांच थांबतें तसें झटकन थांबतें. नोकर दूर जातांच त्यांच्या चेहऱ्यावर बांदेषहून निघाल्यापासून जें चिंतेचें पटल पसरलें होतें तें स्पष्ट दिसूं लागलें.

" खानसाहेब बाहेर गेले आहेत हें एक प्रकारं बरंच झालं म्हणायचं—" असें कांहीं पुटपुटत ते दिवणखान्यावरून पुढें झटकले, व आपल्या खोलीकडे जाण्याऐवजीं मीनाक्षीच्या खोलीकडे वळले.

बाहेरून त्यांची चाहूल ऐकतांच मीनाक्षी आंत होती ती दारांत आली.

नेहमीं एखाद्या पांखराप्रमाणें उल्हासानें सामोरी येणारी आणि " काका! काका! " अशा मधुर, अधीर आवाजानें हांका मारून स्वागत करणारी मीनाक्षी आज मंद पावलांनीं दारांत आलेली पाहून डॉ. अस्लमना वाईट वाटलें, पण आश्चर्य वाटलें नाहीं.

कारण, तिच्या गतींतली डौलदार घाई आणि बोलण्यांतली उत्सुकता कशामुळें नष्ट झाली होती तें त्यांना माहीत होतें. तें माहीत झाल्यामुळेंच ते या वेळीं बांदेषहून निघून आले होते.

दोन दिवसांपूर्वी खानसाहेब मीनाक्षीच्या खोलींत एकाएकीं आले होते व तिला म्हणाले होते,

" मीना, तुझ्याशीं एक बात करायची आहे. बैस अशी कोचावर, सांगतों."

त्यांची बात दुसरी कांहीं नव्हती. मीनाक्षीच्या लग्नाचा नक्की दिवस कायम करण्यासाठीं त्यांनीं काजींना बंगल्यावर बोलवायचें ठरविलें होतें, व ते येण्यापूर्वी त्यांना मीनाक्षीला निक्षून सांगायचें होतें, कीं लग्नाच्या बाबतींत तिनें कसलाहि हेका धरलेला खपणार नाहीं. तिच्या सुखाविषयीं पूर्ण विचार करूनच त्यांनीं सय्यदशीं तिचें लग्न ठरविलें होतें. सय्यदची संपत्ति आणि अमीरकी म्हणजे सुखाचीं आणि मानमरातबाचीं केवढीं असामान्य साधनें होतीं! आणि हीं साधनें पुढें वाढणारच होतीं. खानसाहेबांच्या पश्चात्—हो, इतका दूरवर विचार त्यांनीं केला होता—त्यांचा आणि अमीरसाहेबांचा मोत्यांचा धंदा एक होऊन घेनुकुंज बंदराचें पूर्ण स्वामित्व अमीरसाहेबांकडे जाईल व मग त्यांच्या धनाढ्यतेला कोणती सीमा असणार? आपल्या अवाढव्य मोत्याच्या व्यापाराची पुढें काय व्यवस्था करायची याची खानसाहेबांना मोठी फिकीरच होती. त्यांना मुलगा असता म्हणजे असली फिकीर उद्भवलीच नसती. पण दुर्दैवानें एक मुलगीच त्यांना होती व म्हणून तिच्या लग्नाच्या योजनेंत पोटच्या अपत्याहूनहि प्रिय वाटणाऱ्या आपल्या धंद्याचीहि व्यवस्था लागली तर त्यांना त्यांत

मोठें समाधान होतें. आणि या दृष्टीनें कोणा तिऱ्हाइताच्या हातीं धंदा जाण्यापेक्षां सय्यदच्या धंद्यांतच तो मिसळून जावा यासारखा दुसरा श्रेयस्कर मार्गच नव्हता.

मीनाक्षी यावर कांहींच बोलली नाहीं. तिनें खानसाहेबांकडे वर मान करून पाहिलेंसुद्धां नाहीं. बापाचें असलें निर्वाणीचें बोलणें केव्हां तरी ऐकावें लागणार हें ती समजून होती त्यामुळें या बोलण्याचा तिला फारसा विस्मयहि वाटला नाहीं. आपल्या पित्याची महत्त्वाकांक्षा आणि धर्मवेड व आपलें प्रेम यांमधील दुरून दुरून व अप्रत्यक्ष चाललेली झुंज केव्हां तरी अशी निकराला येणार हें ती जाणून होती, व अशी निकराची वेळ आली कीं काय करावयाचें तें तिनें मनाशीं ठरवूनहि ठेवलें होतें.

म्हणून बापाचें सारें बोलणें तिनें एकहि प्रत्युत्तर न करतां ऐकून घेतलें, व तें अप्रिय भाषण ऐकतांना होणाऱ्या साऱ्या मानसिक वेदना निश्चयानें सहन केल्या. तिच्या त्या अबोल्यानें खानसाहेब अधिकच चिडले व वैतागानें बोलूं लागले. परंतु मीनाक्षीनें एक अक्षरहि तोंडावाटे फुटूं दिलें नाहीं, व शेवटीं खानसाहेब रागानें खोलींतून निघून गेले तरी तिनें आपला निश्चय चळूं दिला नाहीं. प्रेमाची शक्ति उच्छृंखल खरी, पण त्या शक्तीच्या पोटीं कधीं कधीं असें विलक्षण गांभीर्य निर्माण होतें !

त्याच दिवशीं मीनाक्षीनें अस्लमकाकांना पत्र लिहिलें व ताबडतोब निघून या असें कळविलें,

डॉ. अस्लम आज अनपेक्षित बंगल्यावर आले ते मीनाक्षीच्या त्या पत्रामुळें, आणि आत्तां दारांत उभ्या राहिलेल्या मीनाक्षीचा कष्टी चेहरा पाहून त्यांना आश्चर्य वाटलें नाहीं तेंहि त्यांना तिचें पत्र आधीं मिळालें होतें म्हणूनच.

मीनाक्षीच्या खोलींत शिरतांच त्यांनीं तिला प्रेमानें खांद्यावर थोपटल्यासारखें केलें व म्हटलें,

" मीना, बेटा, जीव इतका कष्टी करायचं काय कारण ?—"

" माझा कष्टीपणा पाहून कुणाला कष्ट वाटत नाहींत हेंच कारण—"

असें म्हणतांना मीनाक्षीनें वर मान करून अस्लमकडे पाहिलें तेव्हां एखाद्या तापकऱ्यासारखी तिची चर्या डंवरून आल्यासारखी दिसत होती.

अस्लमनीं आणखी थोपटीत तिला म्हटलें,

" छे छे, असं नाहीं मीना. तुझ्यासारख्या गोड, गुणी मुलीला कष्ट झाले तर आमचं जिणं व्यर्थच म्हणायचं—"

हें ऐकतांच अस्लमच्या छातीवर एकदम डोकें टेंकून मीनाक्षी म्हणाली,

" काका, तुमच्या आधाराच्या भरंवशावरच मी जीव धरून आहें--"

* * *

परंतु अस्लमकाकांच्या आधाराचाहि फारसा उपयोग होणार नाहीं असें मीनाक्षीला थोड्याच अवधींत कळून आलें.

कारण रात्रीं खाना झाल्यावर खानसाहेब, अस्लम व मीनाक्षी दिवाणखान्यांत बसलीं असतां अस्लमच्यानें फार वेळ गप्प बसवलें नाहीं. अस्लम अकस्मात् बांदेषहून आलेले पाहून वास्तविक खानसाहेबांनींच त्यांना तसें येण्याचें कारण विचारावयाचें. परंतु अस्लम कां आले असावेत याचा खानसाहेबांनीं मनाशीं बरोबर तर्क केला होता, व जी गोष्ट अस्लमना बोलावयाची होती तिची चर्चा खानसाहेबांना बिलकुल नको होती म्हणूनच अस्लमना " असे अकस्मात् कां आलांत ? " असा कांहीं प्रश्न विचारायचें त्यांनीं टाळलें होतें. इतकेंच नव्हे तर आज अस्लमशीं ते फारसें बोललेंहि नाहींत.

पण खानसाहेबांच्या या अबोल्याचा राग मनांतल्या मनांत ठेवून अस्लम शेवटीं आपण होऊनच म्हणाले,

" खानसाहेब, मी असा एकदम इकडे कां आलों तुम्ही ओळखलंच असेल--"

" नही जी. मी विचारणारच होतों आपणांला. मीं आपला थोडासा तर्क केला कीं औषधं खरेदी करायला येतां कधीं कधीं—"

यावर अस्लम हंसले व म्हणाले,

" वाहवा खानसाहेब, आपल्या मनांतले विचार लपवायला छान शिकलांत ! मी कां आलों हें पक्कं समजलं असून न समजल्याची बतावणी तुम्ही करीत आहांत ! मी दवा खरेदी करायला नाहीं आलों, पण तुम्ही जी ही मनाची फसवणूक चालवली आहे तिच्यावर दवा द्यायसाठीं मात्र आलों आहें !—"

" हूं:—" असें कांहींसें पुटपुटून खानसाहेबांनीं जागच्याजागीं चाळवाचाळव केली.

मीनाक्षीला कल्पनाहि नव्हती कीं अस्लमकाका आपल्याबद्दलचा विषय असा एकदम आणि आपल्यादेखत काढतील. तशी कल्पना असती तर ती तेथें बसलीच नसती. त्यामुळें काकांनीं तें बोलणें काढलेलें पाहून तिनें हातांतलें पुस्तक झटकन् मिटलें व जागेवरून उठून ती जाऊं लागली.

पण अस्लम तिच्या शेजारींच बसले होते त्यांनीं तिचा हात धरला व म्हटलें,

“नाहीं मीना, तूं जायचं कारण नाहीं. उलट तूं इथंच असलीस तर बरंच. बैस.—”

मीनाक्षी बसली पण मनांतल्या मनांत ती अगदीं अस्वस्थ झाली. आपल्या पित्याचें व अस्लमकाकांचें कलहसदृश भाषण आपल्याला ऐकावें लागणार ही कल्पना तिला त्रासदायक वाटली. काकांनीं आपल्या पित्याचें मन वळवावें अशी तिची इच्छा होती; पण तें वळवितांना त्या दोघांची परस्परांत कांहीं कठोर भाषा झाली तर ती कानीं पडूं देणें तिला क्लेशाचें वाटत होतें. दुखरें गळूं बरें व्हावें असें वाटावें, पण डॉक्टरनें त्याला शस्त्र लावल्यास तें पाहण्याचा मात्र धीर अंगीं नसावा तसें तिचें झालें होतें.

म्हणून अस्लमनीं ओढल्यामुळें जरी ती बसली तरी बसतां बसतां ती म्हणाली,

“पण काका, ती बात—नका—काढूं.”

अस्लमनीं तिच्या त्या विनंतीकडे लक्ष दिलें नाहीं. तिचा हात त्यांनीं आपल्या हातांत ठेवला व खानसाहेबांकडे पहात म्हटलें,

“खानसाहेब, सांगा, मीनाचं सय्यदशीं लग्न लावण्याचा हट्ट धरण्यांत तुम्ही आपल्या मनाची फसवणूक करीत आहांत कीं नाहीं?”

“फसवणूक?—ती कशी?—”

“मीनाला असं दुःख देण्यांत तुमच्या मनालाहि खात्रीनं दुःख होत असलं पाहिजे. पण तें जणूं होतच नाहीं अशी बतावणी करून तुम्ही आपल्या योजनेच्या हट्टाला पेटलां आहांत, नाहीं कां?—”

“हंः! झूट! असं मुळींच नाहीं. माझ्या मनाला कशासाठीं खेद वाटेल? मीनाचं अकल्याण मी करतों आहें अशी शंकाच जर माझ्या मनांत नाहीं—”

“शंकाच नाहीं तुमच्या मनांत? खानसाहेब, माफ करा, पण तुम्ही एक सफाई झूट तरी बोलत आहांत किंवा पित्याचं कन्येविषयींचं कर्तव्य तरी तुम्ही सफाई विसरलां आहांत.”

“ हें सांगायला तुम्ही आज मुद्दाम आलांत म्हणायचे !—” कडवटपणानें खानसाहेब म्हणाले.

“ नको यायला ? ” त्यांच्या कडू शब्दांचा वार हास्यानें चुकवून अस्लम म्हणाले, “ मी मघांशींच तुम्हांला सांगितलं कीं तुम्ही आपल्या लडकीशीं अन् आपल्या दिलाशीं जी प्रतारणा चालविली आहे तिच्यावर दवा द्यायसाठीं मी असा अकस्मात् आलों आहें.”

“ हंः ! पण मीं ती दवा घेतली पाहिजे ना—”

“ आमच्या धंद्यांत रोग्याची इच्छा नसली तरी त्याला दवा पाजायची संवय आहे मला—”

असें म्हणून अस्लमनीं जी बोलण्यास सुरुवात केली तें मग ते किती वेळ तरी बोलत राहिले. बोलतांना खानसाहेबांना कांहीं प्रत्युत्तर करण्यासहि त्यांनीं सवड दिली नाहीं. धर्म, संस्कृति, सारे मुद्दे त्यांनीं काढले आणि खानसाहेबांचा मूर्खपणा अगदीं स्पष्ट शब्दांत त्यांच्यापुढें मांडला. सामाजिक कल्याणासाठीं प्रीतीवर बंधनें घातलेलीं असतात. पण त्या बंधनांचा योग्य अर्थ समजून वागायचें झाल्यास त्या बंधनांचें पालन न करणेंच कांहीं प्रसंगीं इष्ट ठरतें. त्या त्या बंधनांचा खोटा पीर मानून त्याच्यापुढें साऱ्या सारासार विचाराचा एखाद्या बकऱ्यासारखा बळी द्यायचा हा कांहीं सूज्ञपणा नव्हे. खानसाहेब चांगले सुसंस्कृत आणि पुढारलेल्या विचारांचे होते. मीनाक्षीच्या बाबतींत आजपर्यंत त्यांनीं कित्येक जुने धार्मिक आचारविचार धीटपणें झुगारून दिले होते. असें असून तिच्या लग्नाच्या बाबतींतच—म्हणजे जी बाबत तिच्या सर्वांत जिव्हाळ्याची त्या बाबतींतच नेमकें एखाद्या माथेफिरू अवरंगजेबालाच शोभेल असलें धर्माचें आणि संस्कृतीचें खोटें वेड खानसाहेबांना कोठून आलें होतें ? आपल्या पोटच्या मुलीचा सारा जन्म सुखांत जावा अशी चिंता खोपटांत मीठमिरचीशीं मासे खाणाऱ्या कोळ्यांनासुद्धां असते. आणि अमीरालाहि लाजविण्यासारखी ज्यांची दौलत त्या खानसाहेबांनीं प्राणाहून प्यार समजून जिचा आजवर प्रतिपाळ केला त्या मीनाला दावें बांधून हांकलायच्या गुराप्रमाणें खुशाल सय्यदच्या गोठ्यांत सोडायला तयार व्हावें ? खानसाहेब, मीनाक्षीची आई आज हयात असती तर—

अस्लमचें तें वाक्य पुरें झालें नाहीं.

" आई !—आई ऽऽ ! " असें हंबरून मीनाक्षीनें अस्लमच्या मांडीवर मस्तक टेकलें, आणि वावटळींत एखादी वेली हेलकावली जावी तद्वत् रुदनाला एकदम वाट मिळाल्यामुळें त्या आवेगानें तिची देहलता गद्गद हालली.

अंतःकरणापासून कळवळ्यानें अस्लम बोलत असल्यामुळें त्यांचें बोलणें ऐकतां ऐकतां तिचा गहिंवर सांचत चालला होता. आपल्याला बोलायचा धीर झाला असता तर आपण असेंच बोललों असतों, व जणूं आपल्याच हृदयाला काकांच्या शब्दांनीं वाचा फुटत आहे असें तिला वाटत होतें, त्यामुळें ती स्वतः बोलली असती तर जशा तिच्या भावना उचंबळून आल्या असत्या तशाच त्या अस्लमचें बोलणें ऐकतांनाहि आल्या. ती आपले हुंदके सारखे आवरीत होती, आणि आंसवांचे लोट परतवीत होती. परंतु अस्लमच्या बोलण्यांत तिच्या आईचा उल्लेख झाल्याबरोबर मात्र ते सारे अनावर झाले. विवेकानें आणलेलें कठोरपणाचें सारें अवसान या एकाच शब्दानें पार गळलें, आणि अस्लमच्या मांडीवर मस्तक टेंकीत ती मुक्तकंठानें शोकस्वरांत म्हणाली,

" आई ऽऽ ! आई ग ऽऽ ! "

अस्लमनीं तिचें मस्तक कुरवाळलें व म्हटलें,

" मीना, मीना ! बेटा ऐसा नहीं करना !—"

त्या त्यांच्या स्पर्शानें व शब्दांनीं मीनाक्षीचें रुदन अधिकच मुक्तकंठ झालें. तेव्हां तिच्या मस्तकावर हात थोपटीत अस्लमनीं अशा कांहीं अभिप्रायानें खानसाहेबांच्याकडे पाहिलें कीं जणूं " कशी या सोन्यासारख्या लेकराची तुम्हांला करुणा येत नाहीं ? " असें त्यांनीं स्पष्ट विचारलेंच.

खानसाहेबांच्या अंतःकरणांत मोठें निकराचें युद्ध चालू होतें. एकीकडे अस्लमचें बोलणें त्यांना पटलें होतें, तर एकीकडे तें मुळींच पटलें नाहीं असें म्हणायचा धीटपणा त्यांना करायचा होता. एकीकडे मीनाक्षीचा कसलाहि हट्ट चालूं न देण्याचा कठोरपणा त्यांना दाखवायचा होता, तर एकीकडे जिवाहून प्यार अशा पोटच्या मुलीला हंबरून रडतांना पाहून त्यांच्या हृदयांतली सारी कोमलता कारंज्याच्या फवाऱ्यासारखी फुटूं पहात होती. त्यांची मुद्रा त्यांनीं गंभीर आणि अविकृत ठेवली होती, पण अंतःकरणांतील कोमल विकार हालल्यामुळें त्यांचा कंठ भरून आला, आणि नेत्रपुटाचा निरोध न जुमानतां एकदोन अश्रू बाहेर पडून दिव्याच्या उजेडांत चमकल्यावांचून राहिले नाहींत.

परंतु ते झटकन पुसून आणि खांकरून खानसाहेब म्हणाले,

"ठीक! अगदीं ऐन नाटकी प्रसंग जुळवला आहांत अस्लमकाका!—पण हा सीन केव्हां तरी व्हायचा हें मी ओळखून होतों. आज असा अकस्मात् होईल ही कल्पना नव्हती येवढंच काय तें—"

हें ऐकतांच अस्लमकाकांची मुद्रा एकदम पालटली. आतांपर्यंत ते जरी आवेशानें बोलले होते तरी त्यांचा चेहरा शान्त व गंभीर होता. चाललेला वाद आपल्या मुठींत आहे आणि आपण विवेकाला धरून बोलत असल्यामुळें आपल्या बोलण्याचा परिणाम झालाच पाहिजे असा आत्मविश्वास असला म्हणजे माणसाच्या मुद्रेवर जो धीमेपणा असतो तो त्यांच्या मुद्रेवर आतांपर्यंत होता. पण मीनाक्षीनें आर्त शब्द काढून त्यांच्या मांडीवर डोकें टेंकलें तेव्हां ती शान्ति चळली होती, आणि आत्तांचे खानसाहेबांचे शब्द ऐकतांच तर ती पार नाहींशी झाली, व त्या ठिकाणीं क्रोधभाव स्पष्ट दिसूं लागला. ते एकदम उसळून म्हणाले,

"खानसाहेब—"

येवढाच उद्गार काढून ते किंचित् थांबले. आपल्या मनांतला राग एकदम प्रगट केला तर आपल्या व खानसाहेबांच्यामधील दीर्घ स्नेहाला अनुचित असें कांहीं तरी आपल्या तोंडून बाहेर पडेल असें त्यांना भय वाटलें.

मग ते म्हणाले,

"खानसाहेब, हा प्रसंग तुम्हांला नाटकी वाटतो! माझ्या भावना—आई म्हणून दीन स्वर काढून रडणाऱ्या या तुमच्या पोटच्या पोरीच्या भावना तुम्हांला नाटकी वाटतात?—खानसाहेब, तुम्ही असे बेहोष कशानं झालां आहांत?—हा प्रसंग नाटकी म्हणायला—"

"नाटकी नाहीं तर काय?—अमीरसाहेब इथं हजर असते म्हणजे या नाटकाची पुरी सजावट झाली असती."

"अमीरसाहेब! हंः!" अधिकच क्रोधावेशानें आणि तिरस्कारानें अस्लम म्हणाले, "सय्यद! तो भामटा! तो आत्तां इथं असता तर मीनाच्या नखाकडे पहायचीहि त्याची किंमत नाहीं असं मी त्याच्या तोंडावरच सांगितलं असतं. अमीर म्हणे! भामट्यांचा अमीर आहे खरा!"

" अस्लम, अस्लम ! " खानसाहेबहि रागाच्या चढ्या स्वरांत म्हणाले, " खबरदार ! अमीरसाहेबांच्याविषयीं अशी भलती भाषा मी साफ ऐकणार नाहीं. उगीच—"

" उगीच ? उगीच कां म्हणून ? " कुत्सितपणाचें विचित्र हास्य करीत व क्रोधाचा आवेश कायम ठेवून अस्लम म्हणाले, " तुम्ही ज्याला अमीरसाहेब म्हणतां तो भामटा आहे हें सिद्ध करून द्यायची तयारी आहे माझी. तुमची ऐकायची तयारी असेल अन् मी सांगतों तें ऐकल्यावर हटवाद सोडणार असाल तर सांगतों. कांहीं दिवसांपूर्वीं सुधीरचंद्राला एकदम मुंबईला जावं लागलं—"

" त्या काफिराचं नांव कशाला काढतां ? " मध्येंच खानसाहेब म्हणाले, " तोच या साऱ्या घोंटाळ्याच्या मुळाशीं आहे. त्याची कसलीच हकीगत ऐकायची इच्छा नाहीं माझी !—"

" तुमची इच्छा नसली तरी तुम्हांला ऐकलंच पाहिजे मी काय म्हणतों तें. म्हणजे तुम्हांला उमजेल कीं सुधीरविषयीं तुम्ही आपलं मन उगीचच दूषित करून घेतलं असून खरा काफिर, भामटा, पातकी सय्यदच आहे. सुधीरचंद्राला जेव्हां एकाएकीं मुंबईस जावं लागलं तेव्हां त्यानं माझ्या नांवाचं एक सविस्तर पत्र बागवानाजवळ देऊन ठेवलं होतं. पण सय्यदनं—ज्याला धर्माचा अन् नेकीचा पुतळा मानायला तुम्ही तयार आहांत त्यानं—तें पत्र बागवानाकडून मला पोंचतं करतों असं खोटं वचन देऊन घेतलं अन् नाहींसं केलं, आणखी वर तुमच्याकडे धांवत येऊन ओरडा केला कीं सुधीर ज्या अर्थी एकाएकीं नाहींसा झाला त्या अर्थी तो कोणी तरी लुच्चा सोदा असला पाहिजे ! या साऱ्या प्रकाराला भामटेगिरी नाहीं तर काय म्हणाल तुम्ही खानसाहेब ! अन् असं असून आपली लडकी त्या भामट्याला, त्या सोद्याला—"

" झूट ! बिलकूल झूट ! " खानसाहेब उद्गारले, " अस्लम, माझं मन सय्यदविषयीं कलुषित करण्यासाठीं खचित तुम्ही ही झूट बात—"

" हां खानसाहेब, पुढं बोलूं नका ! " एकदम आवेगानें अस्लम ओरडले, " उभ्या हयातींत जो आरोप कोणी माझ्यावर कधीं केला नाहीं तो आज तुम्हीसुद्धां केलेला मला सहन व्हायचा नाहीं ! तुम्हांला आपली चूक कबूल करायची नाहीं म्हणून मला खोटा ठरवितां ? माझी बात झूट ?—काळ्याचे पांढरे झाले माझे ते—"

असें म्हणत अस्लम आवेगानें एकदम उठले, पण त्याच क्षणीं

" उः ! या अल्ला— ऽ ! "

असें विवळून दोन्ही हातांनीं छाती दाबल्यासारखें करीत मटकन खालीं बसले.

खानसाहेब क्षणभर जागच्या जागींच बसले. त्यांना वाटलें अस्लम बसले ते त्यांना आपल्या भावना अनावर झाल्या म्हणून.

परंतु अस्लमचा चेहरा एकदम पांढरा फटफटीत झाला आणि भान नाहींसें झाल्याप्रमाणें त्यांचे डोळे फिरले हें पाहतांच मात्र ते चरकले व झटकन उठले.

तेवढ्यांत मीनाक्षीनें अस्लमना सांवरलें होतें. तिनें त्यांचें मस्तक एका मऊ गिरदीचा आधार देऊन कोचाच्या एका पाठीवर टेंकलें, व घाबरून खानसाहेबांकडे वळून ती म्हणाली,

" बाप्पा—बाप्पा ! "

खानसाहेबांनीं झटकन पुढें होऊन अस्लमचें मस्तक कुरवाळलें व म्हटलें,

" अस्लम !—अस्लम ! "

परंतु अस्लमनीं त्यांना उत्तर देण्याऐवजीं डोळे मिटले.

मीनाक्षी घाबरली व ओरडली,

" काका ऽ ! "

" स् ! बेटा, ये क्या ? चूप !—कुछ नहीं—"

असें म्हणून खानसाहेबांनीं तिच्या पाठीवर थोपटलें.

त्या तसल्या चमत्कारिक वेळींहि पित्याचा तो प्रेमळ स्पर्श मीनाक्षीला परमसुखाचा वाटला. आपल्याला किती तरी दिवसांनीं बाप्पांनीं असें थोपटलें. असें तिच्या मनांत आलें व त्या स्पर्शाच्या आनंदापुढें लग्नाबद्दलचें हें सारें भांडण खोटें—केवळ भास होय असें तिला त्या क्षणीं वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

खानसाहेबांनीं वेळ न घालवितां मोटार धाडून डॉक्टर आणविला.

डॉक्टरनें अस्लमना पाहून विचारलें,

" यांचा मनःसंताप होण्यासारखं आतां कांहीं घडलं होतं काय ?—"

खानसाहेबांना मनांतल्या मनांत शरम वाटली, पण त्यांनीं " हो. " असें उत्तर द्यायला विलंब लावला नाहीं.

डॉक्टर म्हणाला, " म्हातारपणामुळं यांचं हृदय अशक्त झालं आहे. मनः-संतापाचे प्रसंग अगदीं टाळले पाहिजेत यांनीं. अन् जरा काळजीपूर्वकच राहिलं पाहिजे. आत्तांची ही गैरशुद्धि कांहीं विशेष नाहीं. पण--"

मग डॉक्टर औषध देऊन निघून गेला.

त्या रात्रीं मीनाक्षीला झोंप नीटशी लागली नाहीं. तिचें मन क्षुब्ध व अस्वस्थ झालें होतें. तिचे बाप्पा आणि अस्लमकाका यांच्यांत झालेलीं कटु उत्तर-प्रत्युत्तरें तिला पुनः पुन्हां आठवत होतीं, व ज्या दोघां उमद्या स्नेह्यांत आजपर्यंत मधुर भाषाकृतीखेरीज दुसरें कांहीं झालें नव्हतें त्यांच्यांत एक-मेकांविषयीं कठोर विचार उत्पन्न करावयास आपण कारणीभूत झालों या दाहक विचारानें ती विव्हल होत होती. त्या विषादाच्या भरांत तिच्या इतकेंहि मनांत आलें, कीं असले परिणाम झालेले पहाण्यापेक्षां आपलें प्रेमच आपण समूळ विसरून सम्यदर्शी--हो, बाप्पा लावतील त्या माणसाशीं विवाह होऊं दिलेला काय वाईट? तसेंच शय्येवरून उठावें आणि बाप्पांकडे धांवत जाऊन सांगावें कीं माझा विवाह तुम्हांला वाटेल त्याच्याशीं लावा, पण काकांच्या आणि तुमच्या स्नेहभावांत असें अंतर पाडूं नका--

परंतु तीरावर एक लाट पुरी पोंचते न पोंचते तोंच दुसऱ्या मोठ्या लाटेनें येऊन तिला ग्रासावें तद्वत् या विचारलहरीच्या पाठोपाठ दुसरी मोठी विचार-लहरी उसळे. तिला वाटे, आपल्या हृदयांतल्या अथांग प्रेमापुढें दुसऱ्या कशाची मातब्बरी? बाप्पांच्या जुलमापुढें आपण काय म्हणून शरण जावयाचें? आणि आपण एक आपल्या हृदयाची तहान मारली तरी आपल्या हृदयाशीं एकजीव झालेल्या त्या दुसऱ्या हृदयाला यातना द्यायचा आपल्याला काय अधिकार? सुधीरचंद्रच आपल्याला विसरेल तर निराळी गोष्ट. पण तो असें कसें करील?--

अशा विचारांच्या कलहांत तिची निद्रा पुनः पुन्हां भग्न झाली, व दुसऱ्या दिवशीं एकीकडे बाप्पांशीं व अस्लमकाकांशीं बोलतांनाहि तिच्या हृदयांतला हा कलह चालूच होता.

संध्याकाळीं तिला अगदीं करमेनासें झालें म्हणून ती अस्लमना म्हणाली, "काका, चला जरा समुद्रतीरावर फिरूं."

" नही बेटा. मी पडतों असाच. तूं जा वाटलं तर जुबेदाबरोबर."

परंतु जुबेदाला थोडें काम होतें म्हणून मीनाक्षीला एकटेंच जावें लागलें.

ती तीरावर गेली, पण तिला बरें वाटेना. खळाळणाऱ्या भरतीच्या समुद्राची मनाला सोबत वाटण्याऐवजीं तिला भीतिच वाटूं लागली. सृष्टीच्या अफाटपणाचा प्रत्यय येऊन तिला एकटें एकटें वाटूं लागलें. सुधीरचंद्राची मनस्वी आठवण होऊन त्याच्या भेटीची विलक्षण उत्कण्ठा तिला वाटली. जणूं समोर, दृष्टिपथांत न येणाऱ्या पैलतीरावर तो असून या अफाट सागराची अटक ओलांडून आपण त्याच्यापर्यंत जाणार कसें अशा भयानें तिचा थरकांप झाला. हृदयाची ती भित्री क्रिया थांबावी म्हणून ती आंत पाण्यांत चालत गेली व कांहीं वेळ उभी राहिली. मागें फिरणाऱ्या लाटांमुळें वाळू तिच्या सुकुमार पावलांखालून ओघळूं लागली तेव्हां तिला वाटलें आपला जीवाचा आधारच कशानें तरी नाहींसा होत आहे. ती अधिकच भ्यायली व परत फिरली--

तोंच--

थोड्या अंतरावर सुधीरचंद्र उभा होता व तिच्याकडे पाहून हंसत होता!

तिच्या जिवाचा आधार जवळच होता तर!

"हें काय?--" असें विस्मयानें व आनंदानें म्हणत ती त्याच्याकडे धांवली.

समुद्रांत उभें रहाण्याच्या वेळीं वर धरलेले ओचे खालीं सोडायचेंहि भान तिला राहिलें नाहीं!

# प्रकरण २५ वें

—++++++—

## दादांना पत्र



धनुकुंज प्रान्ताचा असिस्टंट कलेक्टर डी सिल्व्हा आपली सकाळची न्याहारी उरकून पोषाख करण्यांत गुंतला होता इतक्यांत त्याच्या आवारांत मोटार शिरून थांबल्याचा आवाज झाला व एका नोकरानें धांवत येऊन म्हटलें,

"अमीरसाहेब—अमीरसाहेब आले—"

तें ऐकतांच डी सिल्व्हाचीहि लगबग उडाली, फक्त त्याची तनु विशाल व तुंदिल असल्यामुळें त्या लगबगीचे हेलकावे त्याच्या हालचालीवर दिसायला जरा वेळ लागला.

तुमानीचे पाठीवर मोकळे सुटलेले पट्टे त्यानें लगबगीनें खांद्यावरून पुढें ओढून घेऊन गुंड्यांनीं अडकविले, तेवढ्यांत एक गुंडी तुटली तिला त्यानें उद्वेगानें शिवी दिली, पायांतल्या सपाता झाडून बूट घातले, ते घालतांना थोड्या वेळापूर्वी त्याच्या खोडकर मुलानें त्यांत खिळे दगड भरले होते ते काढून टाकतांना आपल्याला येणाऱ्या सगळ्या शिव्यांची त्यानें उजळणी केली, व शेवटीं कसाबसा कोट चढवीत त्यानें व्हरांडा गांठला, आणि त्याच वेळीं सय्यद मोटारींतून उतरत होता त्याच्याकडे पाहून आदरपूर्वक म्हटलें,

"गुड् मॉर्निंग, गुड् मॉर्निंग—"

सय्यदनें नुसतें ऐटीनें मस्तक हलविलें. तो सिगारेट फुंकीत व्हरांड्यांत आला, व कांहीं न बोलतां डी सिल्व्हानें त्याला "इकडे यावं, इकडे यावं," असें म्हणून आंतल्या खोलींत नेलें त्याच्या मागोमाग गेला.

डी सिल्व्हाची कुरूप बायको आणि एक दंताळी अविवाहित मुलगी दारांतून डोकावली व आपल्याकडे पाहून हंसली तिकडेहि त्याचें लक्ष नव्हतें.

तो कसल्या तरी फणकाऱ्यांत होता.

डी सिल्व्हानें दर्शविलेल्या खुर्चीवर तो बसला. डी सिल्व्हानें विचारलें,

" थोडा चहा अमीरसाहेब ?—"

तेव्हां त्याच्याकडे पाहण्याऐवजीं सिगारेटची राख झाडतांना हालणाऱ्या आपल्या डाव्या हाताच्या तर्जनीकडे पाहतच तो म्हणाला,

" नही."

त्याच्या त्या फणफणण्यानें डी सिल्व्हा बराच घोटाळ्यांत पडला. तो खुर्चीवर न बसतां हात चोळीत तसाच उभा राहिला. सय्यदनें कांहींच न बोलतां व त्याच्याकडे पाहण्याइतकीहि जाणीव न दाखवितां दोनतीन झुरके ओढले व दोनदां राख झाडली त्यामुळें तो अधिकच बावरला, व शेवटीं आपल्याशींच खांकरून त्यानें आपल्या मनाला जणूं धीर दिला.

शेवटीं सय्यद म्हणाला,

" देखो, डी सिल्व्हा——"

हें म्हणतांना त्यानें आपल्याकडे न पाहतां वर छताकडे नजर लावावी हें डी सिल्व्हाला चमत्कारिकच वाटलें. पण त्या चमत्कारिकपणाचें कांहीं न मानतां तो झटकन म्हणाला,

" Yes—(हं.)"

" माझं एक काम केलं पाहिजे."

" सांगावं."

" कांहीं दिवसांपूर्वीं पलीकडच्या रस्त्यावर अगदीं कोंपऱ्यावरच्या खोपटांत एक मुंबईचा माणूस येऊन राहिला होता माहीत आहे ?——त्याचं नांव सुधीरचंद्र."

" हो. त्याची अन् आपली दोस्तीहि होती मला वाटतं. खानसाहेबांच्या बंगल्यावर तर त्याचा फार इतमाम होता——"

" वायफळ बात करायची तुला फार संवय आहे डी सिल्व्हा " भुंवया वांकड्या करून सय्यद म्हणाला. " माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. त्या गृहस्थाला तूं ओळखतोस ?——"

" हो."

" तो मध्यंतरीं मुंबईस गेला होता, तो पुन्हां दोन दिवसांपूर्वीं आला आहे परत. तुझ्या हातांतल्या अधिकाराचा गुप्तपणानं शक्य तेवढा उपयोग करून, त्याच्यामागें पोलिस लावून, काय वाटेल तें करून त्याला इथून घालवायची व्यवस्था झाली पाहिजे."

तें ऐकतांच डी सिल्व्हाची चर्या विलक्षण झाली. त्याचे बटबटीत डोळे गरगर फिरले, त्यानें आपल्या जिभेनें ओठांना ओलावा दिल्यासारखे केलें, आणि अस्वस्थपणें पोटावर हात चाळवले.

त्याच्या त्या हालचालींतला अभिप्राय लक्षांत येतांच सय्यदनें रागानें विचारलें,

" बोलत कां नाहींस ?—"

" काय बोलूं—अमीरसाहेब, तुम्ही भलतंच काम काढलंत. त्या गृहस्थानं तुमचा अपराध तरी काय केला असा—"

" भलती बात तूं पुन्हां काढलीस डी सिल्व्हा. त्यानं माझा अपराध केला कीं नाहीं हा प्रश्न नाहीं. तो इथून नाहींसा झाला पाहिजे येवढीच माझी बात. अन् ती तूं मानलीच पाहिजेस—"

" पण अमीरसाहेब—"

" अच्छा, तूं असं पण परंतु करणार मला माहीतच. " सय्यद म्हणाला.

" तसं नव्हे अमीरसाहेब. आजपर्यंत आपल्या कामाला मीं कधीं नाहीं म्हटलं आहे ?—पण आपण म्हणतां तें आजचं—"

" चूप ! डी सिल्व्हा, तुझं हें पण परंतु बंद करायचं यंत्र मी बरोबर घेऊन आलों आहे. हें घे. या नोटा संभाळ अन् आतां बोल माझं काम ताबडतोब करतोस कीं नाहीं."

हें म्हणतांना त्यानें नोटांचें एक पुडकें खिशांतून काढून जवळच्या टेबलावर बेफिकिरीनें फेंकलें आणि सरत्या सिगारेटचें थोटुक टाकून दुसरी शिलगविण्यासाठीं काडी ओढली. त्यानें डी सिल्व्हाकडे पाहिलेंहि नाहीं. नोटांचा मंत्र डी सिल्व्हाच्या अडचणींवर ताबडतोब लागू पडणार ही त्याची खात्री होती.

परंतु नोटा तशाच पडल्या व डी सिल्व्हा तसाच बराच वेळ उभा राहिला तेव्हां किंचित् आश्चर्य वाटून सय्यदनें त्याच्याकडे पाहिलें, व म्हटलें,

" क्यं ?—छोटे प्रांतसाहेब ! ऐसे खडे क्यं ?—"

" Excuse me ( माफ करा ) अमीरसाहेब, पण आपला अंदाज खोटा आहे."

" हं ? इतकी नेकी केव्हांपासून आली छोट्या प्रांतसाहेबांच्या अंगीं ?—"

सय्यदच्या त्या प्रश्नांत खोंच होती. लांच खाण्याबद्दल डी सिल्व्हाची ख्याति होती, आणि स्वतः सय्यदचींच कित्येक कामें त्यानें लांच खाऊन पूर्वी केलीं

होतीं. त्यामुळें सय्यदच्या त्या उद्गारांचा घाव त्याला लागल्यावांचून राहिला नाहीं, व काय उत्तर करावें तें न सुचून त्यानें नुसती जागच्या जागीं चाळवा-चाळव केली.

तें पाहून सय्यदचा राग वाढला. तो म्हणाला,

" डी सिल्व्हा ! बोलत कां नाहींस ? उचल त्या नोटा अन् दे वचन मला, कीं मी चाललों. "

" आपलं काम अशक्य आहे अमीरसाहेब—"

" अशक्य आहे कीं मुष्कील आहे ? मुष्कील असेल तर आपण आणखी सोपं करूं तें ! "

असें म्हणून विचित्र हास्य करीत सय्यदनें डी सिल्व्हाकडे पाहिलें, व खिशां-तून आणखी एक नोटांचें पुडकें काढून दाखवीत म्हटलें,

" हें पाहिलंस ?—"

" छे छे ! अमीरसाहेब, आपण माझ्या म्हणण्याचा अर्थ समजलां नाहीं. आपण म्हणतां तें काम अगदीं अशक्य कोटींतलं आहे. "

" कां ?—"

" कां तें मला सांगतांहि यायचं नाहीं. आपण असें रागावून पाहूं नका. मुंबईच्या गृहस्थाच्या बाबतींत आपण सांगतां तसला प्रकार करण्याची स्वतंत्र-ताच मला नाहीं इतकंच सांगतों. हें माझं सांगणं आपल्याला गूढ वाटेल. पण लवकरच माझ्या या बोलण्याचा उलगडा आपल्याला परस्परच होईल. "

" डी सिल्व्हा !—"

" उगीच शब्द वाढविण्यांत अर्थ नाहीं अमीरसाहेब. आपण असल्या कांहीं कामाला माझ्याकडे आलां होतां असं जर सरकारला कळलं—"

" कळेल कसं ?—तुला आज भ्रम झाला आहे कीं काय ? " उतावळेपणानें सय्यदनें म्हटलें.

" सध्यां मुंबईच्या पोलिसखात्याचे कान येथपर्यंत येऊन पोचले आहेत अमीरसाहेब " डी सिल्व्हा म्हणाला, व तें बोलतांना त्याची चर्या खरोखरच भयभीत झाल्यासारखी दिसली.

" हंः ! म्हातारपणचा भ्रम झाला आहे तुला कीं काय ? " सय्यद अर्धवट

रागानें व अर्धवट चुचकारीत म्हणाला, "डी सिल्व्हा, येवढं माझं काम केलंस तर—"

"च् अमीरसाहेब, आपण लक्षांत कसं घेत नाहीं? आपलं काम म्हणून मीं दिडकीची अपेक्षा न ठेवतां केलं असतं. पण या सुधीरचंद्राच्या बाबतींत आपण नोटांचा ढीग उभा केलांत तरी माझ्याकडून कांहीं व्हायचं नाहीं. त्याच्या—"

सय्यद एकदम उठला व डी सिल्व्हाच्या अगदीं जवळ जाऊन म्हणाला,

"म्हणजे?—म्हणतोस काय?—बोल तरी."

"ती आमच्या खात्यांतली गुप्त गोष्ट आहे. मला सांगतां यायची नाहीं."

टेबलावरच्या नोटांकडे बोट दाखवून सय्यद म्हणाला,

"केवळ येवढं सांगण्यासाठीं ही किंमत घे. बोल."

"No. Please excuse. (नाहीं. माफ करा.)"

सय्यदनें रागानें दांतओंठ खाल्ले. पण तो कांहीं न बोलतां कांहीं वेळ उभा राहिला.

डी सिल्व्हा त्याचें शान्तवन करण्याच्या हेतूनें हंसला व म्हणाला,

"बसा अमीरसाहेब. माझ्या कसुरीची आपण क्षमा केलीत असं मला आपण सांगितल्याखेरीज मला बरं वाटायचं नाहीं. बसा. थोडी शराब घ्या. परवांच माझ्या शिरस्तेदारानं पंजिमहून एक मोठा बुधला दाबून आणला तो—"

"चूप चूप, डी सिल्व्हा!" मान हलवून सय्यद म्हणाला, "माझ्या दिलाची रोषनाई पार नाहींशी केलीस! अच्छा, मी जातों—"

सय्यद जाऊं लागलेला पाहून डी सिल्व्हा म्हणाला,

"अमीरसाहेब, आपल्या या साऱ्या नोटा परत—"

"राहूं देत त्या. तुला अजून सुविचार सुचेल अशी मला आशा आहे—"

"नहीं अमीरसाहेब—"

पण तें न ऐकतां सय्यद तावातावानें गेलादेखील.

सय्यद गेल्याबरोबर डी सिल्व्हाची कुरूप, स्थूल उदराची बायको लगबगीनें खोलींत आली व नवऱ्याला विचारूं लागली,

"हें काय?—अमीरसाहेब का आले होते?—त्यांना असं बिघडवून कसं परत पाठवलंत?—"

अतिशय चिडका व क्रुद्ध चेहरा करून डी सिल्व्हा खेंकसला,

" चालती हो पाहूं ! या क्षणीं मला तुझं दर्शनसुद्धां नको !—"

असें खेंकसून त्यानें कपाटांतला एक मोठा शिसा काढला आणि एका मोठ्या ग्लासांत त्यांतलें रक्तवर्ण द्रव्य भसकन् ओतलें.

सौभाग्यवती डी सिल्व्हा वांकडें तोंड करून नाहींशी झाली.

डी सिल्व्हानें ग्लास रिकामा केला व टेबलावरच्या नोटांकडे पाहून एक उसासा टाकला. त्या खिशांत घालायसाठीं त्याचे हात शिवशिवत होते, पण त्या घ्यावयाची त्याची छाती नव्हती. लांच खायला नेहमीं सवकलेल्या माणसाला अशी चालून आलेली बडी लांच दूर ढकलतांना प्राणान्तिक वेदना होतात.

परंतु त्या सहन करणें प्राप्त आहे हें डी सिल्व्हा पक्कें जाणून होता. कारण चार दिवसांपूर्वीं त्याला मुंबईच्या सी. आय. डी. कमिशनरकडून जें पत्र आलें होतें तें त्याला विसरून चालणार नव्हतें.

त्या पत्रांत असा मजकूर होताः—

" कांहीं महिन्यांपूर्वीं येथें घडलेल्या एका गुन्ह्याचें मूळ तुमच्या प्रान्तीं सांपडेल अशी कल्पना झाल्यावरून सुधीरचंद्र जोग हे गृहस्थ एकदोन दिवसांत तिकडे रवाना होतील. त्यांच्याबरोबर आमच्या खात्यांतले दोन इन्स्पेक्टर देतच आहोंत. पण त्याखेरीज त्यांना जी कांहीं मदत लागेल ती तांतडीनें पुरविण्याची तुम्ही खबरदारी घ्यावी. कांहीं धरपकड करावी लागली तर वारंटें सोडण्यास विलंब करूं नये.

तुमच्या मुलखांतले लोक बेफाम असतात. सुधीरचंद्राच्या कामाचा सुगावा गुन्हेगारांस लागला तर त्याच्या जिवावरहि ते घाला घालायला कमी करायचे नाहींत. तरी सुधीरचंद्राच्या जिवाच्या रक्षणासाठीं जरूर ती तजवीज तुम्हीं करावी. सरकार त्याच्यामागें आहे हें लक्षांत घ्यावें व स्वतःची जबाबदारी ओळखून सारें करावें."

सी. आय. डी. कमिशनरनें हें पत्र अर्थातच ब्राउनिंगसाहेबाच्या सूचनेवरून लिहिलें होतें. सुधीर धेनुकुंजास परत निघाला तों मुख्यतः अर्थातच मीनाक्षीसाठीं. परंतु मदीना हॉटेलमधील आगीचें रहस्य अजून पुरें उलगडावयाचें राहिलें होतें. व तेंहि काम या मुक्कामांत उरकण्याचा त्याचा निश्चय होता. एकंदर हकीकतींतला एकच दुवा जोडावयाचा शिल्लक राहिला आहे असें

त्याला वाटत होतें व तो सांपडतांच सरकारी रीत्या पकडापकड व्हावी लागेल अशी त्याची कल्पना होती. म्हणून तो व ब्राउनिंगसाहेब दोघे मिळून सी. आय. डी. कमिशनरकडे गेले; जेवढी माहिती सुधीरनें मिळविली होती तेवढी सगळी त्यांनीं विदित केली व पुढच्या कामगिरीसाठीं सरकारी मदत पाहिजे अशी मागणी केली.

कमिशनरनें मोठ्या आनंदानें मदत करावयाचें कबूल केलें व सुधीरचें धेनुकुंज येथील काम सुकर व्हावें म्हणून डी सिल्व्हाला वर दिलेलें पत्र लिहिलें.

कमिशनरच्या मदतीचा आणखी एक उपयोग सुधीरनें करून घेतला. धेनुकुंजास जी अखेरी त्याला साधावयाची होती त्या अखेरीच्या वेळीं मेरी धेनुकुंजांत हजर असणें आवश्यक होतें. तिला भेटायला गेल्या वेळीं त्यानें तिला विचारलें,

" मेरी, मी चारपांच दिवसांत धेनुकुंजला कूच करणार. माझ्या साऱ्या कल्पना खऱ्या ठरल्या अन् मला हवी ती माहिती झटकन मिळाली तर हसनच्या मृत्यूचं कोडं पुरतं उलगडेल—"

" उलडगल्यासारखंच आहे म्हणतांना तें जवळ जवळ—? "

" असं कसं ? अजून एक दुवा सांपडला पाहिजे. पण तो सांपडून गुन्हा पुरा सिद्ध व्हायला तुझी जरूर पडेल. मी तार दिल्याबरोबर येशील धेनुकुंजला निघून ?—"

" कां नाहीं यायची ?—माझ्या सुखाची ज्यानं होळी केली त्याचा सूड उगवायचं समाधान मला नको आहे कीं काय ?—येईन; पण मला पॅटिसन बाईनं वाटेल तेव्हां जाऊं द्यावं यासाठीं तुम्ही––"

" त्याची मी बरोबर तजवीज करतों. सी. आय डी. च्या कमिशनरकडूनच लिहवितों पॅटिसनबाईला कीं तार आल्याबरोबर तुला जाऊं द्यावं. मग तर झालं ? "

असें म्हणून सुधीर जाऊं लागला, पण त्याला थांबवून मेरी म्हणाली,

" सुधीरचंद्र ! "

" काय ?––"

" आमच्या मुलखांतले लोक पैशासाठीं वाटेल तो घातपात करतील असले

आहेत. अमीरसाहेबाजवळ पैशाला तोटा नाहीं. तुम्ही जात आहांत, मला तुमच्या जिवाची चिंता वाटते. जपून वागा--"

" वेडे, माझ्या रक्षणाची मी पुरी तजवीज करून घेतली आहे. फिकीर नको करूं. मी जातों आतां. माझी तार मिळतांच निघायची तयारी ठेव."

मेरीकडून सुधीर निघाला तो पुन्हां ऑफिसांत गेला व आपली धेनुकुंजला जावयाची तयारी त्यानें जवळ जवळ पूर्ण केली. जवळ जवळ म्हणण्याचें कारण एक गोष्ट अजून त्याला करावयाची होती व ती तर सर्वांत महत्त्वाची होती.

धेनुकुंजला जावयास निघण्यापूर्वीं दादांना एक मोठें पत्र लिहून ठेवायचें त्यानें ठरविलें होतें--म्हणजे तो आदल्या दिवशीं केशवकाकांच्या भेटीला गेला तेव्हां त्यांच्या बोलण्यांत ठरलें होतें.

मीनाक्षीबद्दलची कोणतीच गोष्ट सुधीरनें काकांना सांगितल्यावांचून ठेवली नव्हती, त्यामुळें धेनुकुंजला जाण्याची गोष्ट बोलतांना साहजिकपणेंच तो म्हणाला,

" मी ऑफिसच्या कामासाठीं--एका रहस्याचा पुरा उलगडा करण्यासाठीं--जात आहे असा सगळ्यांचा साहजिकच समज आहे. पण काका, तुम्हांला माझ्या अंतःकरणांतला मुख्य हेतू माहीतच आहे. मी धेनुकुंजकडे खरा कशानं आकर्षित होत आहे तुम्हांला--"

तें वाक्य पुरें करण्याऐवजीं सुधीरनें तसेंच सोडलें. तरुण माणसें वडिलांच्याजवळ आपल्या प्रणयाविषयीं कितीहि उघडपणें बोलूं लागलीं तरी त्यांची जीभ थोडी तरी अडखळल्यावांचून रहात नाहीं याचा सुधीरला त्या क्षणीं प्रत्यय आला.

केशवकाका हंसले व म्हणाले,

" हो हो, तें मला माहीत आहे. तुझ्या त्या दुसऱ्या नीरस रहस्याविषयीं मला विशेष औत्सुक्य नाहीं. पण तुझं जिच्यावर प्रेम जडलं त्या मीनाक्षीच्या हकीकतीच नुसत्या तुझ्या तोंडून ऐकल्यामुळं ती एखाद्या रहस्यासारखीच मला अजून वाटत आहे, अन् तें रहस्य मात्र केव्हां उघड होईल अशी माझ्या मनाला उत्कण्ठा आहे. तूं तिला घेऊनच आतां येशील अन् मग माझी ही उत्कण्ठा पुरी होईल--"

" काका, पण मी तिला घेऊन यावं असं करणं तुमच्या हातीं आहे. दादांची संमति मिळाल्याशिवाय माझ्या प्रेमाची पूर्णता कशी व्हायची?--

अन् ती संमति मिळायची कशी ?--काका, अशा वेळीं मात्र वाटतं कीं मी तुमचा मुलगा असतों तर बरं झालं असतं !--"

असें म्हणून तो किंचित् वेळ थांबला व मग एखाद्या भलत्या वस्तूला नकळत स्पर्श झाला कीं माणूस जसा शहारतो तसें करून तो अर्धवट स्वगत उद्गारला,

"अरेरे ! काय भलते शब्द बोललों मी !—काका, मी पूर्वीं मनांतहि पितृद्रोह करीत नसे. तो या कठीण प्रेमाच्या आहारीं गेल्यापासून पितृद्रोहाचे विचारच करूं लागलों असं नाहीं तर पितृद्रोहाचे वावगे शब्दहि माझ्या तोंडून बाहेर पडूं लागले !—श्रद्धा अन् प्रेम यांची ही झुंज मला कधीं कधीं सहन होत नाहीं !—काका, दादांनीं संमति दिली नाहीं अन् ते संतापून बसले तर काय करायचं ?—"

तें बोलतांना त्याचा चेहरा कष्टी आणि व्याकुळ झालेला दिसला.

काका म्हणाले,

"वेड्या असल्या शंकाकुशंकांनीं मनाची जाचणूक किती करणार तूं ?—मीं तुला वारंवार सांगितलं तेंच पुन्हां सांगतों कीं पुत्रधर्माच्या कल्पनेचा व्यर्थ बाऊ करण्यांत अर्थ नाहीं. तुझं प्रेम जिथं जडलं तें ठिकाण सर्वस्वीं योग्य आहे अशी तुझ्या मनाची ग्वाही असल्यावर तें पूर्ण करून घेतांना पित्याची अनुमति केवळ धर्माच्या रूढ कल्पनेमुळं मिळत नसली तर तिची फिकीर ठेवण्याचं कारण नाहीं. असं करण्यांत कसलंहि पाप नाहीं--"

खालीं घातलेली मान तशीच ठेवून सुधीर पुन्हां अर्धवट आत्मगत बोलल्याप्रमाणेंच म्हणाला,

"हें सारं कळतं मला, पण काका, हें वळणार कसं माझ्याच्यानं ?--"

"पण तुझी ही चिंता कदाचित् व्यर्थहि ठरेल. तुझ्या लग्नाला दादा कदाचित् संमति देईलहि. नाहींच असें कशावरून ? अन् त्याचा नकारच गृहीत धरून चिंता कां करायची ? तुझी बाजू जर उत्तम तऱ्हेनं त्याच्यापुढं मांडली गेली अन् ती त्याला पटली--"

"तसं व्हायला तुम्हीच दादांची गांठ घ्यायला पाहिजे. दादा बापटशास्त्र्यांच्या बरोबर वसईला गेले आहेत. ते पुढच्या रविवारीं येतील. ते आले कीं तुम्ही दादांना भेटलांत अन् माझी सारी हकीकत त्यांना सांगून त्यांचं मन वळवलंत--"

वाक्यांतील बाकीचे शब्द काका ओळखतील अशा कल्पनेनें सुधीरनें ते तसेच सोडले.

त्याचा अभिप्राय काकांच्या लक्षांत आला. मनांतल्या मनांत किंचित् विचार करून ते म्हणाले,

" हं---तूं म्हणतोस तसंहि करायला कांहीं हरकत नाहीं. आमचा दोघांचा वाद मोठा नमुनेदारच होईल म्हणायचा!---पण मला वाद घालण्यापेक्षां तुझा मतलब साधायचा आहे. अं---मग सुधीर, मला वाटतं असं करावं. तूं इथून केव्हां निघणार?---हं---तर, असं कर अगदीं मोकळ्या मनानं तुला दादाच्या कानावर जें कांहीं घालायचं असेल तें तूं एका पत्रांत नीट लिहून काढ, अन् निघायच्या वेळीं पोस्टांत टाक. दादा गांवाहून परत आला कीं तें त्याला मिळेल. मग त्याच सुमारास त्याला मी जाऊन भेटेन. अं? हें सगळ्यांत बरं होईल नाहीं कां? तुला कसं वाटतं?---"

काकांची ही सूचना सुधीरला पटली व म्हणूनच धेनुकुंजकडे निघावयाची इतर सर्व तयारी संपल्यावर तो ऑफिसमधून घरीं आला, व आपल्या खोलींत अगदीं निवान्तपणें बसून त्यानें दादांना उद्देशून चारपांच नोटपेपर भरून एक पत्र लिहून काढलें.

तो तें पत्र पुरें करीत होता इतक्यांत माई खोलीचें दार लोटून आंत आली, आणि त्याच्याजवळ येतांच ते नोटपेपर पाहून म्हणाली,

" इश्श! हेंच कां लिहीत बसला आहेस इतका वेळ?—"

" हं---झालंच. पहायचं नाहीं अं!"

" कां? कुणाला लिहिलं आहेस येवढं?"

" आपल्या दादांना---"

"चल!---खोटं."

" खरंच" असें म्हणत सुधीरनें खालीं सही केली व पाकिटांत पत्र घालून त्यावर नांव लिहीत म्हटलें, " हें बघ दादांचं नांव लिहीत आहे कीं नाहीं."

तें नांव पाहून माईची चर्या जरा गंभीर झाली. तिनें विचारलें,

" येवढं काय लिहिलं आहेस तरी?---"

"जें त्यांना तोंडावर विचारायचा मला धीर होत नाहीं तें---"

" काय?"

" मुसलमानाच्या मुलीशीं मला लग्न करायचं आहे--"

" सुधीरभाऊ!--" असा एकदम उद्गार काढून विचित्र नजरेनें माई त्याच्याकडे पहात राहिली.

सुधीरनेंहि तिच्याकडे क्षणभर निरखून पाहिलें व मग किंचित् हास्य करून म्हटलें,

" मीं तसं लग्न केलं तर व्यर्थ माझ्यासारखा भाऊ आपल्याला मिळाला असं वाटेल नाहीं, माई, तुला?--"

माईचा चेहरा हंसरा झाला कीं गंभीरच राहिला सुधीरला कळलें नाहीं. ती म्हणाली,

" बहिणीचं मन कसं असतं तुला कळलं नाहीं सुधीरभाऊ!--तुझं अंतः-करण माझ्यासाठीं कसं तिळतिळ तुटतं मला माहीत आहे. देवानं असा भाऊ मला जन्मोजन्मीं द्यावा म्हणून मी देवाची सदा प्रार्थना करीत असतें. अन् मग केवळ लौकिकावेगळं तूं लग्न केलंस म्हणून माझी प्रीति ढळेल?--"

माईच्या त्या बोलण्यानें सुधीरला गहिंवर आला. आपल्यावरील प्रेमामुळें आईनें व बहिणीनें आपल्या लग्नाचा प्रश्न गौण समजावा, अप्रत्यक्षपणें जुनी संस्कृति टाकून नवी रूढि मान्य करायची तयारी दाखवावी, आणि दादा मात्र येवढी सहिष्णुता दाखवतील असा संभव नसावा, याबद्दलच्या विस्मयाची व विषादाची त्याच्या मनांत गर्दी उसळली.

मग खरें प्रगमनशील कोण?

तर्कशक्तीच्या अभिमानानें जुन्याला मिठी मारून बसणारा पुरुष, कीं प्रेमाच्या माणसानें लौकिकाविरुद्ध कांहीं केलें तरी तें प्रिय मानणारी स्त्री?

त्याच्या मनाचा गोंधळ उडाला व त्या वेळीं

" माई--"

असा विचित्र एकच एक उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडला.

परंतु त्या एकाच उद्गारांत तो ऐकून कोणत्याहि बहिणीला धन्यता वाटावी येवढी भावना आणि अर्थ भरला होता.

---

# प्रकरण २६ वें

## याकुब दिसला, पण—!



सुधीर मुंबईहून धेनुकुंजास आला त्या दिवशीं संध्याकाळीं त्याची व मीनाक्षीची जशी गुप्तभेट झाली तशी ती नंतरच्या दोन दिवसांतहि रोज झाली. या गुप्तभेटी अर्थातच दोघांसहि अत्यंत सुखाच्या होत्या; तथापि अशा गुप्तभेटींवरच समाधान मानून घेणें त्यांना शक्य नव्हतें. सरळ खानसाहेबांची भेट घेऊन मीनाक्षीची मागणी सुधीरनें करावी हेंच इष्ट होतें. सुधीर आला आहे हें कळल्यावर डॉ. अस्लम दुसऱ्या दिवशीं मुद्दाम त्याच्या उतरण्याच्या जागीं जाऊन त्याला भेटले, तेव्हां त्यांचेंहि मत असेंच पडलें कीं सुधीरनें खानसाहेबांची गांठ घ्यावी व निर्भयपणें आपलें प्रेम उघड करावें. खानसाहेब संतापतील, नकार देतील व कांहीं उणीं उत्तरेंहि बोलतील असा संभव होता; पण पुढें मग कसें वागावयाचें तें नंतर पहातां येईल. आधीं सुधीरनें खानसाहेबांची गांठ घ्यावी येवढें खरें.

तथापि खानसाहेबांची गांठ घेणें थोडें लांबणीवर टाकण्याचें सुधीरनें मनाशीं ठरविलें. कारण तसें करण्यापूर्वी दोन गोष्टी घडाव्या अशी त्याची इच्छा होती. एक आपण दादांना लिहिलेल्या पत्राचें काय उत्तर आहे तें केशवकाकांकडून कळण्याची तो वाट पहात होता. आणि त्याचप्रमाणें सय्यद-वर ज्या कृष्णकृत्याचा आरोप त्याला करतां येईलसें वाटत होतें त्याचा भरपूर पुरावा हातीं घेऊन तो आरोप खानसाहेबांच्या समक्ष करण्याचा त्याचा हेतू होता.

मदीना हॉटेलमधील प्रकाराचा संबंध सय्यदशीं कसा पोंचत होता तें सुधीरला स्वतःला पुरें कळून चुकलें होतें. परंतु तें जगाला पटवावयाचें म्हणजे जय्यत शाबिती करणें अगत्याचें होतें, व या शाबितीसाठीं याकुबला हातीं धरला पाहिजे असें सुधीरनें मनाशीं ठरविलें होतें. मागच्या धेनुकुंज येथील मुक्कामांत त्याला याकुबविषयीं संशय आला होता, व परत मुंबईस गेल्यावर

मेरीशीं बोलतांना जेव्हां त्यानें याकुबचें वर्णन केलें तेव्हां अशाच वर्णनाच्या इसमाचें तिच्या स्वतःच्या करुण कहाणींत प्रमुख अंग असल्याचें तिच्याकडून कळल्यावर तो संशय फार दृढ झाला होता. त्यामुळें या खेपेस तो घेनुकुंजला आला तो कसेंहि करून याकुबला गांठलें पाहिजे असें ठरवूनच.

गेल्या तीन दिवस त्यानें पुष्कळ प्रयत्न केला, पण याकुबचा मागमूस लागणें सोपें नाहीं असें त्याला दिसून आलें. याकुबची चवकशी उघडपणें करून चालण्यासारखें नव्हतें, किंवा त्याचें ठावठिकाण कळण्याविषयीं आपल्याला विशेष उत्सुकता आहे असाहि कोणाला संशय येऊं देणें हिताचें नव्हतें, त्यामुळें सुधीरचें काम अवघडच होतें. मुंबईहून त्याच्याबरोबर आलेल्या दोघां इन्स्पेक्टरांस त्यानें योग्य ती समजूत देऊन टेहळणीवर धाडलेंच होतें, व तो स्वतःहि रोज शहरांत निरनिराळ्या ठिकाणीं टेहळणी करी. पण या तीन दिवसांत याकुब कोणाच्याच नजरेस पडला नव्हता.

ज्या विडीवाल्याच्या दुकानापुढें याकुब त्याला प्रथम दिसला होता त्याला त्याची कांहीं तरी माहिती असेल अशा हिशोबानें सुधीरनें आल्या दिवशींच त्याची गांठ घेतली होती, व कौशल्यानें बोलणें करून पांच रुपयांची एक नोटहि त्याच्या हातावर ठेवून त्याची मूठ दाबली होती. परंतु मूठ दाबून तोंड उघडण्याच्या त्या प्रयोगाचा फारसा उपयोग होण्याचें चिन्ह दिसेना. त्या विडीवाल्याला याकुबचा ठावठिकाणा तर माहीत नव्हताच; पण याकुबचा व सय्यदचा कांहीं संबंध आहे कीं कसें याचीहि त्याला कांहींच माहिती नव्हती. पूर्वीं याकुब घेनुकुंज गांवांतच रहात असे, अलीकडे मात्र तो लांब कुठें तरी रहायला गेल्यासारखें दिसतें, व तो मध्येंच केव्हां तरी एखाद्या दिवसापुरता येतो, येतो त्या दिवशीं कोठून तरी बरेच पैसे आणतो, निशापाणी करतो, आणि दुसऱ्या दिवशीं जो पुन्हां नाहींसा होतो तो कित्येक दिवसांत दिसत नाहीं येवढेंच विडीवाल्यानें सुधीरला सांगितलें.

ही माहिती फार होती असें नाहीं, पण पांच रुपयांला ही कांहीं महाग नाहीं असा सुधीरनें विचार केला, व पुढेंमागें या दुकानदाराचा अधिकहि उपयोग होईल हें लक्षांत आणून त्यानें रोज एकदां त्याच्याकडे जावयाचा क्रम ठेवला.

त्या क्रमाप्रमाणें आजहि तो तिकडे निघाला. मनांत तो सारखें म्हणत होता आपलें हें जाणें व्यर्थ आहे, याकुबचा शोध काढायसाठीं कांहीं तरी विशेष खटपट केली पाहिजे. ही खटपट कोणती तें त्याला स्पष्ट सांगतां येईना. पण अधिक नेटानें कांहीं तरी हालचाल करावयास पाहिजे, नाहीं तर उगीच काल-गत होईल असें मात्र त्याच्या मनांत येत होतें.

परंतु आश्चर्य असें कीं त्या विडीच्या दुकानाच्या अलीकडे वीसपंचवीस पावलें असलेल्या एका हॉटेलापर्यंत तो जातो तोंच याकुब त्याच्या दृष्टीस पडला.

याकुबला पाहतांच त्याला आनंद झाला, पण तो जरा जागच्याजागीं थबकला.

पुढें जावें कीं नाहीं? सरळ समोरासमोर या याकुबची भेट घ्यावी कीं नुसती लांबून—

अशा संशयांत त्याचें मन क्षणभर राहिलें, परंतु लगेच त्यानें विचार ठरविला कीं आपल्या कामासाठीं असल्या दूरच्या टेहळणीचा कांहीं उपयोग नाहीं.

मग तो सरळ दुकानापर्यंत गेला व जणूं याकुब तेथें आहे किंवा नाहीं याविषयीं आपल्याला कसलीच क्षिति नाहीं असें दाखवीत दुकानदाराला म्हणाला,

"कालचा तुझा रुपया द्यायचा राहिला आहे ना?—हं, हा धर."

असें म्हणून त्यानें फेंकलेला रुपया गल्ल्याच्या पेटीवर खणखणून वाजला. धूर्त दुकानदारानें त्या रुपयाचा अर्थ ओळखला, आपण तो ओळखल्याची त्यानें सुधीरला झटकन नजरेची खूणहि केली, व सुधीरला दुकानापाशीं आणखी थांबण्यास कारण मिळावें म्हणून तो म्हणाला,

"काय साहेब, कुठं जात नव्हता माझा रुपया.—थांबा—थोडी वेलची देतों सोलून—"

त्याच्या त्या धूर्त योजनेचें सुधीरनें मनांतल्या मनांत कौतुक केलें, व तो वेलदोडे काढीत होता तेवढ्यांत याकुबकडे वळून त्यानें नजर टाकली.

याकुबनें आपल्याला ओळखलें कीं नाहीं हें त्याला नक्की समजलें नाहीं. पूर्वी याच दुकानापुढें त्याची आपली गांठ पडली होती, तेव्हां कदाचित् तो आपल्याला ओळखीलहि असें सुधीरला वाटत होतें. परंतु ओळख मनांत आल्यासारखी कांहीं त्याच्या चेहऱ्याच्या स्नायूंची हालचाल झालेली दिसली

नाहीं. मग एक तर ओळखलें असूनहि तें न दर्शविण्याइतका तो कावेबाज असला पाहिजे, किंवा त्या पूर्वीच्या भेटीला फार दिवस झाल्यामुळें तोंडवळा लक्षांत न राहण्याइतका तो अक्कलशून्य तरी असला पाहिजे—बहुतेक अक्कल-शून्यच असें सुधीरच्या मनांत आलें.

सुधीरसाठीं वेलदोड्याचे दाणे काढतां काढतां दुकानदारानें याकुबला म्हटलें,

" अरे याकुब, वो अपना दोस्त वो—जमालउद्दीन हय नहि—"

" हां हां—वो जमाल, हां. उस्का क्या भाई ? "

याकुबनें एकदम औत्सुक्यानें विचारलें.

" त्याचं कांहीं तरी जरूरीचं काम होतं तुझ्याशीं. परवां तो इथं आला अन् विचारूं लागला याकुबची गांठ कुठं पडेल ताबडतोब. उस्का मकान किदर हय. मीं म्हटलं आपल्याला तर मालुम ( माहीत ) नहि भाई—अमीरसाहेबां-कडे तर तूं नोकरी नाहींस—हां—तो—फिर किदर हय मकान ?—आपलं माहीत असावं—पुन्हां जमाल आला, जमालच कशाला दुसरं कोणी कधीं—"

हें सारें बोलतांना याकुबचा पत्ता कळावा अशी आपली उत्सुकता आहे असें त्या दुकानदारानें यत्किंचित्‌हि दाखवलें नाहीं. अगदीं क्षुल्लक गोष्टीविषयीं बोलल्यासारखें तो बोलत होता. याकुबला त्यानें लगेच एक विडीहि काढून दिली व सहज विचारल्यासारखें पुन्हां विचारलें,

" कुठं रे याकुब—कुठं राहतोस तरी ?—इथं गांवांत तर कांहीं नाहीं—आं ?—"

त्याचा तो प्रश्न याकुबला टाळावयाचा होता असें दिसलें.

" रहता हूं ऐसेवैसे किदरभी—इस्मे क्या—?—"

असें कांहीं तरी म्हणून त्यानें विडी पेटविली, व मग दुकानदाराची काड्याची पेटी परत कट्ट्यावर ठेवीत " अच्छा भाई, सलाम ! " असें दांतांत विडी दाबलेली असल्यामुळें बोबड्या शब्दांत म्हणून तो एकदम झटकला व दिसे-नासा झाला.

तो दिसेनासा होतांच सुधीर दुकानदाराला म्हणाला,

" अजब हुशारी दाखवलीस ! उत्तम डिटेक्टिव्ह होशील बुवा !—"

" पण गोळी लागू पडली नाहीं हो.—घ्या, वेलची घ्या—सोललीच आहे तुमच्यासाठीं—! त्याचं मकाण कळतं म्हणजे माझ्या हातून तुमचं काम झाल्या-

सारखं झालं असतं. अच्छा, आतां असं करा. हा याकुब आतां संध्याकाळीं त्या कोंपऱ्यावरच्या गुत्त्यांत येईल. कुठून पैसे आणतो अल्ला जाने. पण तो आज पैसे आणणार अन् संध्याकाळच्या वेळीं गुत्त्यांत असणार यांत शंका नाहीं. उद्यां नाहींसा होईल. पण आज बराबर सांपडणार त्या गुत्त्यांत. पहा त्याच्या पाळतीवर राहून उपयोग झाला तर. "

" बरं पाहूं--"

असें म्हणत सुधीर मग तेथून निघाला.

त्याच्याबरोबर आलेले दोघे इन्स्पेक्टर कोंपऱ्यावर त्यानें सांगितल्याप्रमाणें उभे होते त्यांना त्यानें याकुब दाखवून दिला व त्याच्या मागावर राहण्याची कामगिरी त्यांच्यावर सोंपवून तो घरीं गेला.

* * *

याकुब तेथून गेला तो सय्यदच्या बंगल्यावर.

त्या वेळीं मागील प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें डी सिल्व्हाची भेट घेऊन सय्यद नुक्ताच परत आला होता, आणि तो अगदीं त्रासिक मनस्थितींत होता. "मुंबई सरकारचे कान इथपर्यंत येऊन पोंचले आहेत " असें डी सिल्व्हा म्हणाला तेव्हां " तुला म्हातारपणचा भ्रम तर झाला नाहीं ? " असें त्यानें थट्टेनें म्हटलें होतें खरें, पण डी सिल्व्हाचें तें वाक्य त्याच्या मनांत घोळत राहिलें होतें. सुधीर मागें एकदम धेनुकुंज सोडून गेला त्या दिवशीं खानसाहेबांनीं बोलतां बोलतां सुधीर गुप्तहेर असल्याची शंका प्रदर्शित केली होती; त्या वेळेपासून सय्यदचें मन जरा शंकेखोर झालेंच होतें. गुन्हा करायला तर छाति लागतेच. पण तो केल्यानंतर निर्धास्त रहायला अधिक छाति लागते. स्मशानांतून अपरात्रीं चालतांना खुट् झालें तरी माणूस घाबरतो--तद्वतच कोणाच्या तरी सुखाचें किंवा जीवाचें स्मशान करून माणूस चालला असला म्हणजे त्याचा दिल मूळचा कितीहि बेडर असला तरी भीतीचा अंकुर त्याच्या मनांत केव्हां व कसा फुटेल त्याचा नियम नसतो.

सय्यदचें असेंच झालें, आणि त्यामुळें डी सिल्व्हाकडून तो परत घरीं आला तो रुष्ट आणि चिंतातुर होऊनच आला. त्याच्या पायांतील चढाव उतरणाऱ्या नोकरानें किंचित् विलंब केला म्हणून त्यानें त्याला हातांतील छडी सपकन् मारली, महमदनें शरबताचा ग्लास भरून त्याच्यापुढें केला तो हातीं न घेतां,

" फेक दो रास्ते पे—"

असें तो गुरगुरला, आणि तितक्यांत आंतून त्याच्या आईचा ' भेटून जा ' असा निरोप आला तेव्हां तो आणणाऱ्या नोकरासहि,

" गधा, चले जाव—"

असें ओरडून त्यानें हांकून दिलें.

थोडा वेळ त्यानें अशी गडबड केली, व मग मघांशीं जो सरबताचा पेला रस्त्यावर फेंकून द्यावयास त्यानें महमदला सांगितलें होतें तो मागून घेतला. तो गटकन पिऊन टाकून एका आरामखुर्चीवर त्यानें अंग टाकलें व सर्व नोकरांस तेथून जावयाचा हुकूम दिला.

इतक्यांत एक नोकर आला व म्हणाला,

" खालीं याकुब आला आहे. भेट मागतो आहे."

" कोन ?—याकुब ?—त्याला येऊं कसा दिला माझी सक्त ताकीद अस-तांना ?—" अत्यंत कर्कश स्वरांत सय्यद म्हणाला. " देखो, त्याला खुशाल लाथा मारून घालवून द्या. समजा ?—जाव !—"

नोकर सलाम करून जाऊं लागले.

तितक्यांत सय्यदनें म्हटलें,

" ठेरो. देखो, पाठवून द्या या खोलींत याकुबला. जा. महमद तूं इथं रहा, तुला काम सागायचं आहे."

बाकीचे नोकर गेल्यावर सय्यदनें महमदला कांहींसें सांगितलें व तो धांवत खालच्या मजल्याकडे गेला.

थोड्याच वेळांत याकुब खोलींत येऊन दाराशीं उभा राहिला.

अतिशय तीक्ष्ण स्वरानें सय्यदनें म्हटलें,

" तूं फिरून आलास एकूण !—ठीक ! "

याकुब जरासा अस्वस्थ झाल्यासारखा दिसला; पण ज्याच्याशीं बोलत आहोंत तो कितीहि जळफळला तरी आपलें मागणें कबूल केल्याशिवाय त्याला गत्यंतर नाहीं अशी खात्री असली म्हणजे ज्या बेमुर्वतीनें माणूस बोलतो त्या तऱ्हेनें तो म्हणाला,

" येऊं नको तर काय करूं ?—तुम्ही देतां तेवढे पैसे काय हयातभर

पुरतील ?––सरले कीं यायलाच पाहिजे. माझी कायमची तरतूद करा म्हणून दर वेळेस सांगतों, तुम्ही ऐकत नाहीं. मग––"

" अच्छा, याकुब, तुझी कायमची व्यवस्था करतों. फिकीर मत कर."

असें म्हणून सय्यद खुर्चीवरून उठला. त्यानें खिडकींतून वांकून पाहिलें, खालच्या व्हरांड्यांत एका खोलीपुढें महमद उभा होता त्यानें कांहींशी खूण केली तिला त्यानें नजरेनें 'ठीक' असें उत्तर दिलें, व मग परत याकुबकडे पाहून तो म्हणाला,

" चल, आपण खालच्या खोलींत जाऊन निवान्तपणीं बोलूं."

याकुब त्याच्या मागोमाग खालीं गेला.

खोलींत शिरल्यावर सय्यदनें विचारलें,

" बोल, काय तुझं म्हणणं ? "

" मला पुन्हां ददात पडायची नाहीं––"

येवढे शब्द याकुबच्या तोंडांतून बाहेर पडतात न पडतात तोंच सय्यदचे तिघे नोकर एकदम आंत आले, व त्यांनीं याकुबला आंवळून पकडून त्याचे हातपाय बांधावयास प्रारंभ केला.

त्या इसमांनीं इतक्या अकस्मात् येऊन त्याला धरलें होतें कीं याकुब येवढा धिप्पाड पण त्याची हतबल अवस्था झाली.

नोकरांनीं त्याला बांधून एका कोपऱ्यांत टाकल्यावर महमदनें एक कुलूप किल्ली सय्यदच्या हातीं आणून दिली.

त्या नोकरांना घालवून देऊन सय्यद याकुबला हंसत म्हणाला,

" झाली तुझ्या मनाजोगती कायमची व्यवस्था ?—हाः हा ! पड इथं कायमचा !—तुला दृष्टिआड दूर ठेवला होता इतके दिवस तीच माझी गलती ( चूक ) झाली होती म्हणायची. आतां असा माझ्या पहाऱ्यांत ठेवतों कायमचा तुला !—"

असें म्हणून सय्यदनें खोलीबाहेर येऊन दार ओढून घेतलें व त्याला कुलूप ठोकून चावी खिशांत टाकीत तो आपल्याशींच पुटपुटला,

" येऊं देत सरकारचे कान इथपर्यंत खुशाल !—डी सिल्व्हा गाढव आहे !—"

*     *     *

त्या दिवशीं रात्रीं हवा कांहींशी वादळी पडली होती. अंगाला झोंबणारा वारा सुटला होता. लहानशा शहरांतल्या रस्त्यांत माणसांनीं बिनशिस्तीनें रेंगाळावें व चालावें तसे आकाशांत ढग हालत होते. चंद्र आभाळांत असूनहि त्याचा प्रकाश केव्हां तरी मधूनच पडत होता.

अशा वेळीं समुद्रकांठानें जाणाऱ्या सुधीरनें जणूं काय स्वच्छ, सुंदर हवा आणि टिपूर चांदणें पडल्याप्रमाणें शीळ घालावी हें विचित्रच होतें.

परंतु मनुष्य एकदां प्रेमाच्या उन्मादानें रंगला कीं त्याच्या हातून कोणती विचित्र कृति घडेल त्याचा नियम नाहीं. आणि तसें पाहिलें तर निसर्गाच्या ठेवणीपेक्षां स्वतःच्या समाधानावर किंवा असमाधानावरच माणसाच्या चालण्यांतली ऐट आणि उमेद अवलंबून असते, हें लक्षांत घेतलें म्हणजे सुधीरच्या शिटींत विचित्रपणा मानण्याचें कारण नव्हतें.

त्याच्या मनस्थितींत असलेल्या कोणीहि माणसानें तशी शिटी घातली असती.

रोजच्या संकेतस्थळीं, बंगल्यामागच्या समुद्रकांठीं, त्याची व मीनाक्षीची नुक्तीच भेट झाली होती. व परस्परांत झालेलीं भाषणें अजूनहि आपल्या ओंठांबाहेर पडत आहेत व कानांवर येत आहेत असें वाटत होतें.

मीनाक्षीनें त्याला म्हटलें होतें,

" आपण दोघं अशीं एकान्तीं एकत्र असलों म्हणजे जगाची जाणीवच उरत नाहीं, पण परत गेलं अन् बंगल्यांत पाऊल टाकलं कीं सारा आनंद विरतो. बाप्पांच्या रागापुढं कसं व्हायचं अशा भीतीनं हृदय सारखं दबकतं अन् बाप्पांच्या रागापेक्षांहि दुष्ट सय्यद तुमच्यावर सूड उगवायसाठीं वाटेल तें करील हें मनांत आलं कीं—काय होतं कसं सांगूं ?—"

" किती वेडी तूं ! सय्यद मला काय करूं शकणार आहे ? अन् प्रेमासाठीं संकटांत उडी घ्यावी लागली तरच पुरुषांना त्या प्रेमाचा पूर्ण आनंद मिळाल्यासारखं वाटतं हें कसं तूं विसरतेस ?—"

" असलं शास्त्र नाहीं मला कळत. प्रेमानं मन दीर्घशंकी होतं येवढं मात्र खरं, अन् त्यामुळं या एकान्ताच्या घटकेखेरीज दिवसभर माझ्या मनांत हरतऱ्हेच्या कल्पना येत असतात—"

" किती व्यर्थ घाबरतेस ? अन् आतां थोडा धीर धर. लौकरच आपल्याला एकान्ताखेरीज घटका उरायची नाहीं !—"

" पण माझा धीर आतां संपत आला आहे—"

असें म्हणून तिनें किंचित् दीन चर्येनें सुधीरकडे पाहिलें, त्या वेळीं तिची हनुवटी वर झाली.

त्या हनुवटीला स्पर्श करण्याचा मोह आंवरून सुधीर म्हणाला,

" छे ! वेडी !—"

या उद्गारानें मीनाक्षीचें कसें समाधान झालें तें तिचें तिला माहीत. तें झालें खरें.

मग त्या दोघां प्रियजनांनीं एकमेकांचा निरोप घेतला. मीनाक्षी वर बंगल्याच्या आवारांत जाऊन दिसेनाशी होईपर्यंत सुधीर तसाच उभा राहिला, व नंतर तो समुद्राच्या तीरातीरानें मोठ्या आनंदांत चालूं लागला. मध्येंच तो हातांतल्या काठीनें वाळूवर प्रहार करीत करीत चाले; मध्येंच शिटी वाजवीत तालावर पावलें टाकी.

हर्षभरांत कधीं कधीं खूप हिंडण्याची माणसाला लहर येते तशी सुधीरला आल्यासारखी दिसली. बंदराजवळ आल्यावर वास्तविक घराच्या रस्त्याकडे वळावयाचें तें न वळतां बंदराचा भाग ओलांडून त्या बाजूच्या वाळवंटावरून तो चालूं लागला.

तेथून उजव्या हाताला उंचवट्यावर सय्यदचा बंगला दिसत होता त्यामुळें त्याचें मन सय्यदविषयीं व सय्यदवरून याकुबविषयीं विचार करूं लागलें. संध्याकाळीं, त्याच्या हस्तकांपैकीं एका इन्स्पेक्टरनें येऊन बातमी दिली होती कीं सकाळीं याकुब सय्यदच्या बंगल्यांत शिरला तो त्या वेळेपर्यंत बाहेर आला नव्हता. या बातमीचें सुधीरला बरेंच आश्चर्य वाटलें होतें, व तेव्हांपासून याकुब बंगल्याबाहेर कां आला नसावा याविषयीं त्याच्या मनानें अनेक तर्क बांधले होते.

आत्तां एकीकडे शीळ घालीत चालतां चालतां याच तर्कांची उजळणी त्याच्या मनाशीं चालली होती. याकुब सय्यदकडे गेला यांत आश्चर्य नव्हतें. पण तो त्याची गांठ घेऊन बाहेर पडायचा तो कां पडला नाहीं ? मीनाक्षीच्या बंगल्यावर खांसाहेबांचें गाणें झालें त्या रात्रीं सय्यदचें व याकुबचें जें बोलणें त्याला ऐकूं आलें होतें त्यावरून याकुबचें सय्यदशीं कसलें काम असतें व सय्यद त्याला कसा वागवतो याची त्याला कल्पना झाली होती. त्याच कामा-

साठीं याकुब पुन्हां सय्यदकडे आज गेला होता काय ? गेला अ…
जळफळून कां होईना सय्यदनें पैसे दिले असले पाहिजेत. कशा तरी रा…
तो याकुबच्या पकडींत होता खास. ही पकड कशाची असावी ? आणि सय्यदनें पैसे दिल्यावर याकुब आज निघून कां गेला नाहीं ? सय्यदच्या बंगल्यांतून बाहेर जायची दुसरी एखादी गुप्त वाट तर नसेल ? का सय्यदनें याकुबला यमसदनाचीच वाट दाखविली होती ? सय्यद बेफामपणानें काय करील त्याचा नियम नव्हता. केला असेल असा अत्याचार त्यानें ?—आणि तसें असेल तर मीनाक्षीचें आपल्याविषयींचें भय—

इतक्यांत एकामागून एक असे भराभर झालेले दोन पिस्तुलाचे बार त्याला ऐकू आले व एकदम चमकून तो जागच्या जागीं उभा राहिला.

सुमारें दीडशें कदमांच्या अंतरावर कोणी तरी धांवणारा इसम " हाः ! या खुदा—! " असें विवळून खालीं पडलेला त्याला त्या वेळच्या अंधुक प्रकाशांत अस्पष्ट दिसला, व त्याच्या मागोमाग आलेली कोणी तरी व्यक्ति परतून धांवत जाऊन अदृश्य होतांना त्याच्या दृष्टीस पडली.

पुढें जावें कीं न जावें अशा संशयानें सुधीर किंचित् थांबला. पण मग जावेंच असें ठरवून हातांतील काठी सरसावीत तो पुढें गेला.

पडलेल्या मनुष्यानें तोंड खालीं करून अंग टाकलें होतें. गोळी त्याच्या डाव्या कुशीला लागून गेली होती.

सुधीर खालीं वांकला व त्यानें त्या इसमाला किंचित् वळविलें.

त्याचें तोंड दिसतांच तो अत्यंत विस्मयानें उद्गारला,

" कोण ?—याकुब ?—"

---

# प्रकरण २७ वें

## दृष्टि आली कीं गेली ?




सिल्व्हाची मुलगी त्याच्या खोलींत शिरली व जेवण तयार असल्याची तिनें वर्दी दिली.

डी सिल्व्हानें

" All right, Coming ! ( अच्छा, येतों ! )"

असें म्हटलें व उठण्यापूर्वी शेवटचा म्हणून एक ग्लास भरला.

रात्रींच्या जेवणाची ही त्याची पूर्वतयारी रोजची ठरलेली होती, व आज त्याची बायको मुद्दाम आणलेल्या काळ्या माशाचें पक्वान्न करणार असल्यामुळें जिभेला चांगलीच धार यावी म्हणून ही पूर्वतयारी आज त्यानें जरा अधिक प्रमाणांत केली होती.

आंतून पक्वान्नाचा खमंग वास येत होता तो घेत डी सिल्व्हानें मोठी खुषीची चर्या केली, व ग्लास उचलून तोंडाला लावला.

इतक्यांत--

बाहेर मोटार व्हरांड्यापाशीं थांबल्याचा आवाज झाला. व्हरांड्याच्या फरशीवर घाईघाईनें माणसें चालल्यासारखी चाहूल ऐकूं आली. डी सिल्व्हाचा शिपाई आंत आला व म्हणाला,

" सुधीरचंद्र--आले--आहेत. ताबडतोब भेट पाहिजे म्हणतात."

ग्लास तसाच हातीं ठेवून डी सिल्व्हानें त्रासाचा उद्गार काढला व म्हटलें,

" ठीक, आलोंच म्हणावं."

मग त्यानें ग्लास झोंकला व खोलींतला दिवा बारीक करून तो बाहेर आला. सुधीरचंद्राकडे पाहून तो म्हणाला,

" काय ?--"

तेथें व्हरांड्यांत एका चटईवर याकुबला ठेवलें होतें त्याकडे बोट दाखवून सुधीरनें समुद्रतीरावर घडलेली हकीकत सांगितली, याकुबला आपण येथपर्यंत कसें आणलें तेंहि सांगितलें व म्हटलें,

" डॉ. अस्लमना आणायला मीं गाडी धाडली आहे. पण हा इसम किती वेळ जगेल तें सांगवत नाहीं. मरण्यापूर्वी जबाब द्यायची त्याची फार इच्छा आहे. तो तुम्ही घ्यावा म्हणून तुमच्याकडे आणलं आहे त्याला."

डी सिल्व्हानें " ठीक, ठीक " असें म्हटलें, व जबाब घ्यायची तयारी केली.

* * *

दुसऱ्या दिवशीं पहांटे याकुबचें प्राणोत्क्रमण झालें.

सकाळीं तार ऑफिस उघडतांच सुधीरनें मेरीस ताबडतोब निघून येण्याविषयीं तार केली.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मेरी धेनुकुंजला येऊन दाखल झाली. तिला डी सिल्व्हाकडे घेऊन जाऊन सुधीरनें त्याच्यापुढें तिचा जबाब देवविला, व सय्यदवर वॉरंट काढण्यास सांगितलें.

रात्रीं सय्यदवर वॉरंट बजावण्यांत आलें, पण तो फार वेळ अटकेंत राहिला नाहीं.

त्याला पकडल्याची बातमी कळतांच खानसाहेब आले, त्यांनीं जामीन भरला आणि सय्यद खुला झाला.

* * *

खानसाहेबांजवळ मीनाक्षीची मागणी करण्यापूर्वी जी तयारी सुधीरच्या मनानें व्हावयास हवी होती तिच्यांतील एक भाग आतां पुरा झाला होता. दादांची संमति मिळते कीं नाहीं हें मात्र त्याला अजून कळावयाचें होतें. काकांच्या पत्राची तो रोज वाट पहात होता. पण तें अजून आलें नव्हतें. आतां थांबावें कीं थांबू नये याबद्दल त्याच्या मनाचा जरा घोंटाळा उडाला. दादांचा रुकार मिळण्याबद्दल खात्री मुळींच नव्हती. पण तो मिळावयाचाच असेल तर तो मिळाल्यावर खानसाहेबांची मुलाखत घ्यावी असें त्याच्या मनांत येई. उलट, ती मुलाखत किती लांबणीवर टाकायची हाहि प्रश्नच होता. या खेपेस धेनुकुंजास येऊन त्याला एक आठवडा झाला तरी खानसाहेबांची त्याची भेट झाली नव्हती.

ती त्यानें टाळली होती. पण अशा वागण्याचा त्याला कंटाळा आला होता. शिवाय या विलंबानें मीनाक्षी अधिकाधिक नाराज होत होती. तिला या संदिग्ध स्थितींतली विवंचना असह्य होत चालली होती—

मीनाक्षीच्या मनःस्थितीचा विचार येतांच सुधीरनें ठरविलें कीं आतां काकांकडून येणाऱ्या पत्रासाठीं थांबावयाचें नाहीं, खानसाहेबांची गांठ घ्यावयाची.

म्हणून ज्या दिवशीं सय्यदला वॉरंटावर पकडण्यांत आलें व जामिनावर सोडण्यांत आलें त्याच्या दुसऱ्याच दिवशीं सकाळीं सुमारें साडे नऊ वाजतां सुधीर खानसाहेबांच्या बंगल्यावर गेला.

कांहीं एका हेतूनें त्यानें मेरीला बरोबर घेतलें होतें.

गाडी बंगल्यांत पोंचल्यावर त्यानें मेरीला गाडींतच बसून राहावयास सांगितलें व तो एकटाच अगाशीकडे जाऊन पायऱ्या चढूं लागला.

खानसाहेबांचा ड्रायव्हर पायरीवर उभा होता. सुधीर एकाएकीं मुंबईस गेला तेव्हांपासून आतांपर्यंत तो या ड्रायव्हरला किंवा खानसाहेबांच्या कोण-त्याहि नोकराला दिसला नव्हता. त्यामुळें तो असा अकस्मात् आलेला पाहून ड्रायव्हरला अत्यानंद झाला, व त्यानें हंसत म्हटलें,

" सलाम साहेब ! आपली फार याद ( आठवण ) येत होती, साहेब—"

सुधीरनेंहि आनंदून म्हटलें,

" ठीक आहांत ना रे सगळे—"

" हां, साहेब. आपकी तबियत अच्छी ? "

" हो उत्तम—वर्दी दे खानसाहेबांना. "

" आपली कशाला हवी वर्दी, साहेब ? आपण काय परके आहांत कोणी ? जावं आपण सरळ दिवाणखान्यांत. अमीरसाहेब बसले आहेत मालकांशीं बोलत—"

" हं ! " असें आश्चर्यानें उद्गारून सुधीर उरलेल्या पायऱ्या चढून वर गेला.

डाव्या बाजूकडील खोलींत मीनाक्षीची गाण्याची शिकवणी रोजच्याप्रमाणें चालली होती. ' देशी ' रागांतली चीज सुरू होती, व ठायलयींत उच्चारलेले मीनाक्षीच्या तोंडचे रेंखीव, सुरेले शब्द स्पष्ट ऐकूं येत होते:—

" मारे डेरे आवो । आवो जी महाराजा । "

( माझ्या घरीं यावं; यावं महाराज ! )

मीनाक्षीच्या स्वराच्या माधुर्यानें तर सुधीर उल्हसित झालाच, पण तिच्याकडून जणूं आपलें हें स्वागतच झालें अशा कल्पनेनें त्याला अतिशयच हर्ष झाला. आपल्या कार्याला शुभशकुन झाल्यासारखें त्याला वाटलें, व मोठ्या आनंदित अंतःकरणानें पुढें होऊन त्यानें दिवाणखान्यांत प्रवेश केला.

खानसाहेब त्याचें स्वागत करावयास उठले नाहींत. त्यांनीं फक्त आसन दर्शविलें.

सुधीर जरा वेळ स्तब्ध बसला. काय काम आहे असें खानसाहेबांनीं विचारावें हें साहजिक होतें म्हणून तो बोलला नाहीं. पण खानसाहेबहि स्तब्धच राहिले हें पाहून मग तो म्हणाला,

" मला इथं येऊन सहा दिवस झाले. पण इतके दिवस मुद्दामच आपली गांठ घेतली नाहीं—"

" मग आज तरी कशाला तसदी घेतलीत ?––" खानसाहेब म्हणाले.

एकदम असा दुरुत्तराचा हल्ला आपल्यावर प्रारंभींच चढेल अशी सुधीरची कल्पना नव्हती त्यामुळें तो किंचित् विस्मित झाला. परंतु लगेच त्यानें मनाचा तोल सांवरला व आतां कशा वळणानें बोललें पाहिजे हें ओळखून तो हंसत म्हणाला,

" तसदी कसली ?––ज्यासाठीं मी आलों तें काम अतिशय आनंदाचं आहे."

" कोणतं बुवा काम असं ?––"

" आपल्याजवळची एक अति मूल्यवान वस्तू मागून घ्यायची आहे."

तें ऐकतांच झटकन वर पाहून व कपाळाला आंठ्या घालून खानसाहेब म्हणाले,

" ती वस्तू भारी मोलाची आहे म्हणतां अन् खुशाल मागतां ? ती अशी मोलाची म्हणूनच वाटेल त्या वाटच्या चोराला देतां यायची नाहीं––"

" पण तशी ती आपण द्यायचा बेत केला आहे––"

त्या शब्दांनीं चमकून खानसाहेब म्हणाले,

" भलती जुबान ( भाषा ) करूं नका सुधीरचंद्र. अमीरसाहेबांना तुम्हीं काय म्हटलंत --"

" चोर— गुन्हेगार-- "

ते ऐकतांच सय्यद एकदम कोचावरून उठला व जागच्याजागीं सुधीरनेंहि सावधता दाखविली.

परंतु सय्यदला थांबवीत खानसाहेब म्हणाले,

" अमीरसाहेब, आपण कृपा करून शान्त रहावं. सुधीरचंद्र, तुम्हांला एकदम बंगल्यांतून घालवून देणं मला अवघड नाहीं--"

" चूक आहे तुमची कल्पना--"

" पण मला तसं करायचं नाहीं. मीनाक्षीची तुम्ही मागणी करतां; पण हें भलतं धाडस आहे तुमचं. तिचं मन तुमच्याविषयीं विटलेलं आहे हें मीं मागंच तुम्हांला सांगितलेलं आहे--"

" हो, अन् तें साफ खोटं असल्याचं मला ताबडतोब कळलेलंहि आहे. खानसाहेब, खऱ्या प्रेमाचा प्रवाह असा थापाथापीचा बांध घालून थांबत नसतो. मी मुंबईस जाण्यापूर्वी माझी व मीनाक्षीची गुप्तभेट झाली होती. अस्लमकाकांच्यामार्फत तिचा माझा पत्रव्यवहारहि चालू होता. गेल्या सहा दिवस आम्ही रोज एकमेकांस भेटत आहोंत. खानसाहेब, आमचं प्रेम अकृत्रिम आहे, अनावर आहे, उज्ज्वल आहे. त्याला तुमचा आशीर्वाद द्या येवढंच मला मागायचं आहे."

सुधीरच्या त्या बोलण्यानें खानसाहेब चकित झाले. आपण सुधीरला भेदून त्याचें मन मीनाक्षीविषयीं कलुषित केलें तें तसेंच अजून कलुषित आहे अशा समजुतींत ते आतांपर्यंत होते, आणि आपली मीना उगीचच आपल्या ठिकाणीं सुधीरचा छंद घेऊन बसली आहे अशी त्यांची कल्पना होती. या कल्पनेमुळेंच त्यांनीं आजपर्यंत मनाशीं असा हिशोब ठेवला होता कीं अस्लम-काका चार कठोर स्पष्ट शब्द आपल्याला बोलतील, व मीनाक्षी थोडीशी धुस-फुस करील, पण यापलीकडे तिचें सय्यदशीं लग्न लावून टाकण्याच्या आपल्या बेतांत विशेष अडथळा होणार नाहीं.

या क्षणापर्यंत त्यांची ही समजूत असल्यामुळें सुधीरचें वरील बोलणें ऐकतांच ते चांगलेच विस्मयचकित झाले. एकदोन क्षण त्यांना काय बोलावें तें सुचेना.

नंतर ते म्हणाले,

" सुधीरचंद्र, तुमची ही मागणी इतकी उर्मटपणाची आहे कीं त्याला योग्य उत्तर द्यायचं म्हणजे शिष्टाचार न ठेवतां मला बोलावं लागेल. मीनाक्षीचं प्रियाराधन माझ्या इशाऱ्यानंतरहि तुम्ही चालू ठेवलंत हा वास्तविक तुम्ही भयंकर गुन्हा केलात म्हणायचा—"

" शान्तपणें विचार कराल तर तुम्ही असं म्हणणार नाहीं खानसाहेब. तरुण स्त्रीपुरुषांनीं एकमेकांवर प्रीति करणं हा कुठल्याहि न्यायानं गुन्हा होऊं शकत नाहीं."

" पण मीनाक्षीचं अमीरसाहेबांशीं लग्न झाल्यासारखंच असतांना—"

" हंः ! खानसाहेब, तुमच्या आंधळेपणाची मला कींव येते. धर्माच्या खोट्या अभिमानाचं ढापण तुम्ही डोळ्यांवर चढविलं आहे त्यामुळं तुम्हांला खरं कांहींच दिसत नाहीं, आणि खोट्या समजुतींत अन् हटवादांत ठेंचकाळत तुम्ही चाललां आहांत. केवळ मी धर्मानं हिंदु म्हणून माझी मीनाक्षीवरची प्रीति तुम्हांला गुन्ह्यासारखी वाटते, अन् हा सय्यद केवळ जन्मानं अमीर अन् धर्मानं मुसलमान म्हणून त्याला जांवई व्हायच्या आधींच 'जांवई, जांवई' म्हणण्यांत भूषण मानून, वास्तविक तो निढावलेला गुन्हेगार आहे हें तुम्ही खुशाल दृष्टिआड करतां ?—"

" खामोश ! देखो—"

असें ओरडत सय्यद जागेवरून उठला.

पण सुधीरच्याजवळ जावयाचा त्याला धीर झाला नाहीं.

सुधीर हंसत म्हणाला,

" अमीरसाहेब, उगीच ओरडाआरड कशाला करतां ? तुम्ही कितीहि आक्रोश केलात तरी तुमची गुन्हेगारी कांहीं लपायची नाहीं, अन् खानसाहेबांना तुमचं खरं स्वरूप एकदां पुरं उघडं करून दाखवायचा माझा बेतहि कांहीं ढळायचा नाहीं.—समजलांत खानसाहेब, आज तुमच्या जामिनावर खुले असलेले हे अमीरसाहेब फार दिवस मुक्त रहायचे नाहींत. गुन्हेगाराला—"

" सुधीरचंद्र ! " खानसाहेब कठोर आवाजानें म्हणाले, " केवळ दुष्टाव्यानं तुम्हीच कांहीं तरी किटाळ अमीरसाहेबांच्यावर आणलं अन् वॉरंट काढवलं

असा मला संशय आहेच पहिल्यापासून. आत्तांच्या तुमच्या बोलण्यानं माझी खात्रीच झाली."

"आपण चुकतां खानसाहेब. डी सिल्व्हानं याकुबचा जो जबाब लिहून घेतला आहे त्याची नक्कल आपल्याला पहायला मिळेल तर आपण असं म्हणणार नाहीं."

"काय आहे त्या जबाबांत ?--हा याकुब कोण ?--काय हो अमीर-साहेब ?--" खानसाहेबांनीं विचारलें.

सय्यद स्तब्ध राहिला.

सुधीर म्हणाला,

"अमीरसाहेबांना नाहीं तें सांगतां यायचं. मीच सांगतों. हकीकत जरा मोठी आहे. ऐका."

त्या वेळीं सुधीरनें असा कांहीं विचित्र अभिनय केला कीं खानसाहेबांच्या मनांतला राग तात्पुरता लोपून गेला, आणि त्याच्या तोंडची हकीकत ऐक-ण्याच्या उत्कण्ठेनें ते जरासे पुढें वांकले.

सुधीर म्हणाला,

"याकुबचा जबाब सांगण्याऐवजीं ज्या साऱ्या हकीकतीवर त्या जबाबामुळं लख्ख प्रकाश पडला आहे तीच मी जुळवून थोडक्यांत सांगतों. पण प्रथम हें सांगा खानसाहेब, कांहीं महिन्यांपूर्वी हसन नांवाचा तुमचा एक नोकर मुंबईस गेला होता ना ?--"

"हो."

"त्याचं काय झालं ?--"

"तो आगींत मेला असं आम्हांला कळलं."

"अशीच जगाची समजूत आहे. पण ती खोटी आहे."

"म्हणजे ? तो मेला नाहीं ?--"

"मेला. पण आगीनंच नव्हे. तुमच्या लाडक्या अमीरसाहेबांनीं त्याच्यावर येथून मारेकरी घातला होता. त्या मारेकऱ्यानं आधीं हसनला कट्यारीनं ठार केलं आणि मग खोलीला आग लावून दिली. आगींतच हसन मेला असं लोकांना वाटून खुनाचा संशय कोणाला यायचा नाहीं असा त्या मारेकऱ्यानं चतुराईचा हिशोब केला होता. तो त्याचा हिशोब बरोबर पारहि पडला

असता. पण आग लावून देण्याच्या धांदलींत कट्यारीचं घर त्याच्या हातून पडलं, पळून जाण्याच्या गडबडींत तें शोधून काढून घेऊन जाण्याइतकी सवड त्याला उरली नाहीं, अन् मग तें माझ्या हातीं लागलं."

खानसाहेबांनीं सय्यदकडे पाहिलें. तो मनांतल्या मनांत जळफळत जागच्या जागीं चाळवाचाळव करीत होता.

सुधीर पुढें म्हणाला,

"हसनवर जो मारेकरी घातला तो याकुबच. हसनवर मुंबईस मारेकरी घालण्यांत अमीरसाहेबांचा हिशोब असा असला पाहिजे कीं धेनुकुंजांत केलेला खून झटकन कळेल, मुंबईसारख्या बकाली गांवांत शिताफीनं काम उरकलं तर उरकेलहि. अन् शिवाय धेनुकुंजांत आधीं केलेला एक खून पचवायसाठींच त्यांना हा खून पाडायचा होता—"

"काय ?—सांगतां काय तुम्ही ?—"

एकदम शहारून खानसाहेबांनीं म्हटलें.

"हो." सुधीर एखाद्या खटल्याचा समारोप करणाऱ्या न्यायाधीशाला शोभेल अशा शान्तपणें म्हणाला, "एक खून पचवायसाठीं त्यांना हा खून करायचा होता. मागं तुमच्या गांवांत शौकत नांवाचा एक कोळी होता ना ?—"

"हो. तो वादळांत होडी उलटून मेला तोच ना ?—"

"तो तसा मेला असं या अमीरसाहेबांनींच उठवलं. पण तसं नाहीं. याकुबबरोबर त्याला मच्छीमारीला पाठवून या अमीरसाहेबांनींच जलसमाधि देवविली. शौकतची बायको अमीरसाहेबांच्या मनांत अतिशय भरली होती, व ती हातीं लागावी म्हणून त्यांनीं त्याला असा वाटेवेगळा केला—"

"बदमाष ! झूट !" असें ओरडत सय्यद एकदम उठला व म्हणाला, "त्या सैतान याकुबनें असा सफा झूट जबाब दिला असला तरी—"

"नाहीं अमीरसाहेब, ही बात याकुबच्या जबाबांतून नाहीं सांगत मी—"

"मग ही झूट बात कुठून पैदा केलीस ?—"

"सांगतों. अलबत, तुम्हांला सांगितलं पाहिजे." असें म्हणून सुधीर उठला व बाहेर व्हरांड्यांत जाऊन त्यानें गाडींत बसलेल्या मेरीला खूण केली.

मेरी झटकन गाडींतून उतरून त्याच्याकडे आली व त्याच्या मागोमाग तिनें दिवाणखान्यांत प्रवेश कला.

सुधीर म्हणाला,

" अमीरसाहेब, या स्त्रीच्या तोंडून कळली मला बात. मग तर ती झूट नाहीं ?—ओळखतां ना या स्त्रीला तुम्ही ?—खानसाहेब, आपणहि कदाचित् ओळखत असाल हिला—"

खानसाहेब विलक्षण चकित होऊन मेरीकडे पहात राहिले होते. सुधीरचा प्रश्न ऐकूनहि त्यांनीं त्याच्याकडे वळून पाहिलेंहि नाहीं. मेरीकडे सारखी दृष्टि ठेवून ते आपल्याशींच उद्गारले,

" मरियम !—"

" हो, मरियमच ही ! " सुधीर म्हणाला, " शौकतला नाहींसा करून त्याच रात्रीं त्याच्या या स्त्रीधनावर तुमच्या अमीरसाहेबांनीं दरोडा घातला. दुसऱ्या दिवसापासून ही मरियम कधीं कोणाला दिसली नाहीं, अन् नवरा अपघातानं समुद्रांत बुडून मेला म्हणून हिनंहि जीव दिला असं साऱ्या लोकांना वाटलं. मरियमनं जीव दिला याचं अमीरसाहेबांना कांहीं वाटण्यासारखं नव्हतं. पण दुसरी एक रुखरुख त्यांच्या मनाला लागली होती. शौकतला घेऊन याकुबनं होडी पाण्यांत घातली तेव्हां तुमच्या हसननं त्याला पाहिलं होतं, आणि नंतर रात्रीं अमीरसाहेब मरियमची अब्रू नासून शौकतच्या खोपटांतून बाहेर पडले तेव्हांहि हसन दूर अंधेरांत उभा होता असा त्यांना संशय आला होता. आपलीं हीं असलीं दुष्कर्मं तुमच्या कानांवर येऊं नयेत असं अमीरसाहेबांना साहजिकच वाटत होतं. तुम्ही मीनाक्षी त्यांना देऊं केली होती. तुम्ही त्यांना बडे पाक ( मोठे शुद्ध ) समजत होतां. तुमची ही समजूत बिघडून उपयोगी नव्हतं. हसन केव्हां तुमच्याजवळ काय बोलेल त्याचा नियम नव्हता, त्यामुळं अमीरसाहेबांच्या दृष्टींत तो सलूं लागला, अन् अखेर तो तुमच्या मोत्यांच्या कामासाठीं मुंबईस गेला तेव्हां ती संधि साधून त्यांनीं त्याचा खून करविला. तुमच्या लाडक्या अमीरसाहेबांचे पराक्रम हे असे आहेत, समजलांत खान-साहेब ?—अमीरसाहेब, बोला ! मीं सांगितलं यांतली कोणती बात झूट आहे ?—कां जिला भ्रष्ट करून यमसदनाला पाठविल्याच्या खात्रीनं तुम्ही होतां ती ही मरियम अशी पुन्हां प्रगट होऊन तुमच्यासमोर उभी असलेली पाहून वाचा बसली तुमची ?—"

सय्यदनें कपाळाला आंठ्या घालून सुधीरकडे पाहिलें व तोंडांतल्या तोंडांत कांहीं अपशब्द उच्चारला.

मग खानसाहेबांकडे तोंड वळवून तो म्हणाला,

" मी जातों खानसाहेब. अधिक उपमर्द मला सहन करवणार नाहीं. बेफाट झूट बोलत सुटणाऱ्या या भामट्याची मानगुटी पकडण्यासाठीं माझे हात शिवशिवत आहेत. पण तुमच्या घरांत हा प्रकार होणं बरं नाहीं, इतका विवेक मला ठेवला पाहिजे. याचा समाचार मला कुठंहि घेतां येईल. मी जातों आतां. माझ्यावर आलेलं हें किटाळ कसं निवारायचं हें आपण बोलत होतों तें आपण पुन्हां केव्हां तरी बोलूं—"

खानसाहेब त्या साऱ्या प्रकारानें इतके भांबावून गेले होते, कीं त्यांच्या तोंडून कांहींच उत्तर बाहेर पडलें नाहीं. सय्यदलाहि त्यांच्या उत्तराची जरूर होती असें दिसलें नाहीं. तो उठला व जाऊं लागला—

पण मेरी दिवाणखान्याच्या दारांत उभी होती ती त्याला वाट देण्याऐवजीं दोन्ही हात पसरून त्याला अडवून म्हणाली,

" अमीरसाहेब, ठेरो !—खुनाबद्दल किंवा स्त्रीवर बलात्कार करण्याबद्दल कोर्ट तुमची चवकशी करील अन् योग्य ती सजा तुम्हांला देईल. पण या दोन्ही अपराधांइतकाच भयंकर असा तिसरा एक गुन्हा तुम्हीं केला आहे. त्या गुन्ह्याची चवकशी मामुली कोर्ट करूं शकत नाहीं. तुमचीच विवेकबुद्धि कधीं जागी झाली तर ती या गुन्ह्याबद्दल तुम्हांला कडक शासन देईल. तो गुन्हा म्हणजे, माझा प्यारा धर्म सोडून ख्रिस्ती धर्म स्वीकारायला तुम्हीं मला भाग पाडलंत ! तुमच्या नीच कृत्यानं माझी अब्रू गेल्यावर मी रातोरात गांव सोडून पळत सुटलें. चार दिवस लपतछपत दौड करून मी पंजिमला पोंचलें. मला कुठं आसरा मिळेना. उघडपणानं मिरवायचा मला धीर वाटेना. जगांत मला कुठं सावली दिसेना. शेवटीं पंजिमला एक मिशनरी बाई भेटली. माझा धर्म विकत घेऊन मला आसरा द्यायचं तिनं कबूल केलं. मी भांबावलें होतें. माझा धर्म मी टाकला. मी ख्रिस्ती झालें ! अब्रूनं भ्रष्ट आधीं झालेंच होतें. धर्मानंहि झालें. मरियम होतें. मेरी झालें. ओढणी टाकून असा झगा नेसलें. चांडाळा, माझं वस्त्र सोडलंस तें माझ्या अंगावरून कायमचं गेलं. माझं पति-

धन बुडवळेंस, माझी अब्रू लुटलीस, माझा धर्म लुटलास !--खाटिका !—राक्षसा—”

असें किंचाळत मेरीनें एकदम उडी घेऊन सय्यदची नरडी पकडली.

त्याच वेळीं मीनाक्षी शिकवणी संपवून परत आपल्या खोलीकडे जात होती ती तें किंचाळणें ऐकतांच दारापुढें थबकली.

डॉ. अस्लमहि आपल्या खोलींतून धांवत आले.

त्यांना किंवा मीनाक्षीला सुधीर खानसाहेबांच्या भेटीला आला असेल ही कल्पनाच नव्हती. त्यामुळें सुधीरला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें; आणि मेरीचें तें करणें पाहून तर त्यांच्या विस्मयाला सीमा उरली नाहीं.

मेरीनें सय्यदच्या नरडीवर उडी घेतलेली पाहून सुधीर व खानसाहेब तिला मागें ओढण्यासाठीं पुढें झाले. परंतु त्यांच्या मदतीची जरूर पडली नाहीं. सय्यदनें तिला दंडाशीं धरून जोराचा हिसडा दिला व त्याबरोबर ती धाड्दिशीं जमिनीवर हापटली.

तिच्याकडे किंवा कोणाकडेच न पाहतां सय्यद संतापानें तेथून निघून गेला.

खानसाहेब मूढ होऊन उभे राहिले होते ते एखाद्या पुतळ्यासारखे. वर्षानुवर्षें जपून वाढवलेल्या मनाच्या जुन्या समजुती अकस्मात् उन्मळून पडल्या कीं मस्तकावर प्रहार झाल्याप्रमाणें माणसाला झीट येते, तशी त्यांना या क्षणीं आली होती. आपल्या डोळ्यांपुढें धड कांहींच दिसत नाहीं असें त्यांना वाटलें. डोळ्यांना लाल प्रकाशाचा समुद्र दिसत आहे कीं काळ्या कुट्ट अंधाराचा डोंगर दिसत आहे त्यांना कळेना. आपल्याला दृष्टि होती ती एकदम गेली, का नव्हती ती एकदम आली त्यांना समजेना !

# प्रकरण २८ वें

## मूर्ति भंगली



सय्यद कसाहि असला तरी धेनुकुंजांतल्या लोकांच्या दृष्टीनें तो बडाच होता. तो नांवाचाच अमीर होता व तो कांहीं सद्गुणांचा पुतळा नाहीं हेंहि पुष्कळांना ठाऊक होतें. तथापि लोकांची त्याच्यावर भक्ति होती. बड्या लोकांचा जुलूम किंवा दुष्टपणा ज्यांना प्रत्यक्ष सहन करावा लागत नाहीं त्यांना त्या बड्या लोकांविषयीं कौतुकाची भक्ति वाटत असते. तसलीच ही भक्ति होती. पण ती होती खरी व "हमारे अमीरसाहेब" असा सय्यदचा उल्लेख करणारेच धेनुकुंजचे बहुतेक लोक होते.

असें असल्यामुळें सय्यदवर वॉरंट बजावलें गेलें तेव्हां साऱ्या धेनुकुंजांत एकच खळबळ उडाली; आणि तो जामिनावर सुटला तेव्हां त्याहि विषयाची सारे लोक चर्चा करूं लागले. बड्या लोकांच्या सुखाप्रमाणेंच त्यांचीं दुःखें व संकटें सामान्य जनांच्या कुतूहलाचा विषय होतात. त्यामुळें मागच्या प्रकरणांत सांगितलेला विलक्षण प्रसंग ज्या दिवशीं खानसाहेबांच्या बंगल्यावर घडला त्या दिवशीं गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं अमीरसाहेबांवरचें वॉरंट, खानसाहेबांचा जातमुचलका, याकुबचा मृत्यू, याशिवाय दुसरा विषय नव्हता. धरणीकंपाचा धक्का एखाद्या गांवाला बसावा तसा धेनुकुंज शहराला आश्चर्याचा धक्का बसल्यासारखें झालें होतें.

परंतु हा धक्का कांहींच नव्हे असा दुसरा धक्का दुसऱ्या दिवशीं बसला आणि सारें धेनुकुंज शहर स्तंभित होऊन गेलें.

सय्यद आपल्या खोलींत मरून पडलेला आढळला. पंचनामा झाला, कॉरोनरची चवकशी झाली, आणि सय्यदनें आत्महत्त्या केली असें ठरलें.

या बातमीनें घेनुकुंजच्या साऱ्या लोकांना अत्यंत दुःख झालें, आणि लोक जरी ठिकठिकाणीं आपापसांत या विलक्षण प्रकाराची चर्चा करण्यांत गुंग झाले होते तरी एकंदरींत साऱ्या शहराची चर्या काळवंडलेली आणि कष्टीच दिसत होती.

* * *

एकामागून एक घडलेल्या या घटनांचीं बीजें फार दिवसांपूर्वी पेरलीं गेलीं होतीं व त्यांची तयारी कित्येक दिवस होत होती हें वाचकांना व या कथानकांतील दोनचार व्यक्तींना माहीत असलें तरी घेनुकुंजांतल्या लोकांस त्याची खबर नव्हती. त्यामुळें या घटनांचा आकस्मिकपणा त्यांना फारच जाणवला. उंच पर्वतावर उभ्या राहिलेल्या प्रेक्षकाला वादळ खूप वेळ जमत असलेलें दिसतें व त्याला त्याचें फारसें आश्चर्य वाटत नाहीं. पण दरीच्या संपुटांत वसलेल्या गांवावर वृष्टि कोसळली कीं, ती एकदम कोठून कशी प्रगट झाली असें वाटून तेथील माणसें भांबावून जातात. याच न्यायानें गेल्या तीन दिवसांतल्या घटनांच्या विलक्षणपणाचा आणि आकस्मिकपणाचा घेनुकुंजच्या रहिवाश्यांवर अतिशय परिणाम झाला.

आणि तो सर्वांत अधिक कोणावर झाला असेल तर खानसाहेबांवर.

त्यांचें मन विलक्षण हादरल्यासारखें झालें. त्यांना स्वतःला मुसलमानी धर्माचा व संस्कृतीचा जाज्वल्य अभिमान होता, आणि सय्यदशीं सोयरीक करावयाचें त्यांनीं जें ठरविलें होतें त्यांत त्याच्या संपत्तीचा आणि इतमामाचा विचार त्यांनीं केला नव्हता असें जरी म्हणतां आलें नसतें, तरी मुख्यतः मुसलमानी धर्माशीं व संस्कृतीशीं अधिक एकजीव होण्याची जबर इच्छाच त्यांच्या त्या योजनेच्या मुळाशीं होती. आपण पक्के मुसलमान नाहीं, आपलें घराणें बाटग्यांपैकींच मानलें जातें, अस्सल मुसलमानी रक्ताची मंडळी आपल्याला दूरच ठेवतात, या कल्पना त्यांना जांचत होत्या, व मीनाक्षी व सय्यद यांच्या विवाहानें धार्मिक दृष्टीनें आपली उत्क्रान्ति होईल अशी त्यांची खात्री होती.

परंतु गेल्या तीन दिवसांतल्या घडामोडींनीं त्यांची ही खात्री लटपटली. अमीरसाहेबांनीं आत्महत्याच करून घेतल्यामुळें त्यांच्यावर आलेले आरोप

खरे कीं खोटे तें सिद्ध होण्याचा मार्गच खुंटला. त्याबद्दल दहा लोक दहा प्रकारचे तर्क आपापल्या मनाशीं करीत होते. परंतु स्वतः खानसाहेब मात्र अमीरसाहेबांवरील आरोप ज्याअर्थी कोर्टांत चवकशी होऊन सिद्ध झाले नाहींत त्याअर्थी त्या आरोपांचा विचारच करावयास तयार नव्हते. तथापि अशी त्यांची वृत्ति होती तरी धर्माच्या व संस्कृतीच्या अस्सलपणाची जी कल्पना आजपर्यंत आपण उराशीं बाळगली तिच्यावर कसला तरी जबरदस्त आघात झाला असें मात्र त्यांना वाटूं लागलें. मुसलमानी धर्म व संस्कृति परंपरेच्या वळणानें ज्या स्वरूपांत या कालापर्यंत आली तें तिचें स्वरूप आपण कायम ठेवलें पाहिजे, तसें तें कायम ठेवण्यांतच धर्माची खरी सेवा आहे, आणि आपल्या घराण्याची धर्मपरायणता आणि संस्कृतीबद्दलची तीव्रता अधिक उज्ज्वल करण्यासाठीं अमीरसाहेबांसारख्याशीं आप्तसंबंध जोडणें हा सर्वोत्तम मार्ग होय अशी त्यांची विचारसरणी होती. धार्मिक मोठेपणा कुलसिद्ध आहे असें त्यांना वाटत होतें. परंतु त्यांच्या या सर्व कल्पनांची अवस्था आतां मोठी केविलवाणी झाली. ऐन घाटमाथ्यावर अतिवृष्टींत सांपडलेलीं गुराख्याचीं पोरें चिंब भिजून जाऊन कुडकुडूं लागावीं तशा त्यांच्या त्या असमंजस कल्पना कुडकुडूं लागल्या व त्यांना आपल्या अंतःकरणांत निवाऱ्याची जागा देतांदेतां त्यांची त्रेधा उडाली.

धर्माची व संस्कृतीची बाब सोडली तरी इतर प्रकारेंहि त्यांच्या मनाचें बूड निखळल्यासारखें झालें. अमीरसाहेबांच्या अंगीं कांहीं दुर्गुण आहेत हें ते जाणून होते. ते लहरी आहेत, तामसी आहेत, थोडे व्यसनी आहेत या सर्व गोष्टी त्यांना माहीत होत्या. परंतु तारुण्याच्या उसळीचा हा सारा भाग आहे अशी त्यांची संगति ते मनाशीं लावीत. व्यसनाच्या बाबतींत त्या दिवशीं अमीरसाहेबांनीं मनःपूर्वक कसम खाल्ल्यापासून खानसाहेब मनाशीं निश्चिन्त झाले होते. सारांश, अमीरसाहेबांच्या अंगचे दोष किरकोळ आहेत व ते कालांतरानें नाहींसे होण्यासारखे आहेत असें खानसाहेब समजत होते. अर्थात् त्यांच्या अंगच्या गुणांचें कौतुक तितक्या प्रमाणानें त्यांना अधिक वाटत होतें.

परंतु सुधीरनें धडधडीत अमीरसाहेबांच्या तोंडावर केलेले आरोप ऐकून त्यांच्या या कल्पना विसकटल्यासारख्या झाल्या. ते आरोप एकाहून एक भयंकर असे होते, व त्यांवर विश्वास ठेवायला जरी खानसाहेब राजी नव्हते तरी ते ऐकून शंकाकुशंकांचे वारे त्यांच्या मनांत उठल्यावांचून राहिले नाहींत,

व अमीरसाहेबांविषयींच्या त्यांच्या मताच्या पाण्यावर खळखळून तरंग उसळ-ल्यावांचून राहिले नाहींत.

परंतु, हातांतली वस्तू वाईट आहे टाक, असें कोणी लहान मुलाला म्हटलें कीं तें मूल अधिकच आग्रहानें ती मुठींत धरतें, मग ती तशी धरण्यापासून कितीहि त्रास होवो, तद्वत् स्वभावतः आग्रही माणूस पुष्कळदां करतो.

खानसाहेबांच्या प्रेमळ पण हटवादी स्वभावानें या वेळीं अशीच उसळी खाल्ली. सोसाट्याचा वारा येऊन बागेंतलीं रोपटीं उलटीं सुलटीं व्हावीं तसें त्यांच्या मतांचें झालें होतें. शेख महमदानें काल्पनिक पत्नीला म्हणून मारलेल्या लाथेनें त्याची भांड्यांची उतरंड कोसळून पडली तसें त्यांच्या अमीरसाहेबां-विषयींच्या वेतांचें आणि भावनांचें झालें. अमीरसाहेबांवर त्यांनीं आजपर्यंत मनःपूर्वक प्रेम केलें होतें, त्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करून त्यांच्या गुणावर लोभ केला होता, अंतःकरणापासून त्यांचें कौतुक केलें होतें. एखादी सुंदर मूर्ति घडवून संग्रहीं ठेवावी तशी त्यांनीं त्याची मूर्ति मनापुढें ठेवली होती. पण गेल्या तीन दिवसांत अकस्मात् प्रहार होऊन ती मूर्ति भंगली तेव्हां ते भांबावून गेले. त्या मूर्तीचीं छकलें ते सांवरूं लागले. आणि तीं छकलें अशीं सांवरून धरणें सोपें नाहीं असें वाटतांच ती मूर्तिच कच्ची होती असा सरळ समज घेण्याऐवजीं त्या मूर्तीवर ज्यांनीं प्रहार केला त्यांच्याविषयींचाच द्वेष त्यांच्या मनांत एकदम भडकला.

ते धर्मानें मूर्तिपूजक नव्हते, पण मनुष्याच्या स्वभावधर्मातच मूर्तिपूजेचा अंश आहे तो कोणत्याहि मूर्तिध्वंसक पंथाला मारतां येत नाहीं. तो अंश इतरां-प्रमाणें खानसाहेबांच्या ठिकाणीं होता, इतकेंच नव्हे तर प्रेमळ माणसाची मूर्ति-पूजा आग्रहाची असते तशी त्यांचीहि होती. त्यामुळें अमीरसाहेबांबद्दलच्या त्यांच्या लोभाला धक्का बसतांच आपली चूक कबूल करण्याऐवजीं दुसऱ्यावर चिडण्याची त्यांची प्रवृत्ति झाली.

आणि ते सर्वांत अधिक चिडले सुधीरवर. अमीरसाहेबांवर सुधीरनें केलेले आरोप सिद्ध व्हावयाचा संभवच आतां संपला होता. पण ते खोटे होते असें धेनुकुंजांतला एकहि माणूस म्हणत नव्हता. ते खरेहि असतील, खोटेहि असतील, तें आतां एक कधीं न उलगडणारें रहस्य होऊन बसलें आहे असेंच

सारे लोक आपापसांत बोलत होते. परंतु खानसाहेबांच्या चिडलेल्या मनाला येवढा तोल कोठून रहाणार ?

ते म्हणूं लागले अमीरसाहेबांवरचे सारे आरोप खोटे, आकसानें केलेले आहेत. मीनाक्षीची प्राप्ति व्हावी म्हणून सुधीरनें हा सारा भयंकर व्यूह रचला होता. त्याच्या आरोपांत कांहीं तथ्य नव्हतें. अमीरसाहेब राहिले असते तर कोर्टांत त्यांच्या अब्रूवरचा हा कलंक खचित धुऊन निघाला असता. अशा खोट्यानाट्या आरोपांमुळें आपल्या मोठ्या नांवाला लागलेला काळिमा अमीर-साहेबांस अत्यंत दुःखदायक झाला असला पाहिजे, व त्या दुःखाच्या भरांतच त्यांनीं आपल्या बहुमोल जीविताचा शेवट करून घेतला असला पाहिजे. अमीरसाहेबांच्या मृत्यूचें पाप सुधीरच्याच माथीं मारलें पाहिजे.

असल्या विचारसरणीनें खानसाहेब पूर्णपणें ग्रासले गेले, व सुधीरविषयीं राग, द्वेष, संताप यांखेरीज त्यांच्या मनांत कांहीं भावनाच उरली नाहीं. ज्या खानसाहेबांनीं सुधीरवर एके काळीं आपल्या साऱ्या प्रेमाचा मनःपूर्वक वर्षाव केला होता त्या त्यांच्या अंतःकरणांत त्याच्या बाबतींत माधुर्य किंवा सहानुभूति बुंदभरहि उरली नाहीं. त्यांच्या मनावर कोणकोणत्या विचारांच्या क्रियाप्रति-क्रिया घडल्या त्याचें वर जें वर्णन केलें तें वाचल्यानंतर वाचकांना त्यांच्यांतील या बदलाचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. परंतु खानसाहेबांच्या विचार-चक्रांच्या उलटसुलट गतींची कल्पना नसल्यामुळें स्वतः सुधीर, मीनाक्षी व डॉ. अस्लम हीं मंडळी मात्र अत्यंत आश्चर्यचकित झालीं.

त्या सर्वांची साहजिकपणेंच अशी कल्पना होती कीं सय्यदचें खरें कृष्ण-स्वरूप उघड झाल्यानंतर खानसाहेबांचा मीनाक्षीच्या लग्नाच्या बाबतींतला हटवाद नाहींसा होईल. धर्माच्या अंधप्रीतीनें केवळ जातीचा आग्रह धरून आपण मीनाक्षीचें लग्न ठरविलें होतें तें शहाणपणाचें नव्हतें याचा प्रत्यय आल्यानंतर आपला धर्माबद्दलचा हटवाद समर्थनीय नाहीं असा खानसाहेब उमज घेतील. हिंदूला मुलगी दिली तर धर्माचा आणि संस्कृतीचा विध्वंस होईल ही आपली समजूत व्यर्थ आहेसें त्यांचें त्यांनाच वाटूं लागेल. परंपरा-गत आचारधर्माहून खरा धर्म कांहीं निराळाच मानला पाहिजे व या धर्माशीं हिंदूमुसलमानांमधील विवाह विसंगत आहेसें समजण्यास आधार नाहीं, व तो

विवाह प्रीतिविवाह असेल तर तो यत्किंचितहि दोषार्ह ठरणार नाहीं ही समजूत त्यांना पटेल, असा सुधीर व मीनाक्षी यांच्याप्रमाणेंच डॉ. अस्लमचाहि अदमास होता.

त्यामुळें हा अदमास सर्वस्वीं खोटा ठरलेला दिसतांच त्यांना अतिशय सखेद आश्चर्य वाटलें.

सय्यदचा दफनविधि होऊन गेल्यावर दुसऱ्या दिवशीं ते व खानसाहेब एकत्र बसले असतांना त्यांनीं मुद्दाम हळूच सुधीरचा विषय काढला होता. तो विषय किती जपून काढावयास हवा तें अस्लम पूर्णपणें जाणून होते. अमीर-साहेबाच्या बाबतींत तुमच्या कल्पना खोट्या व आमच्या खऱ्या ठरल्या असें एखाद्या शब्दानेंहि ध्वनित केल्यास खानसाहेबांस व्यर्थ चिडविल्यासारखें होईल, पोपट मेला असा स्पष्ट उल्लेख टाळून इतर परींनीं तें सांगणाऱ्या दर-बाऱ्याच्या धूर्ततेनेंच बोलणें केलें पाहिजे हें ते ओळखून होते. परंतु त्याबरो-बरच त्यांची अशीहि कल्पना होती कीं, सुधीरच्या व मीनाक्षीच्या विवाहाची गोष्ट या वेळीं काढली तर आपण खानसाहेबांचें मन वळवूं शकूं. म्हणूनच त्यांनीं तो विषय काढला.

परंतु ते दहापांच वाक्यें बोलून गेले नसतील तोंच खानसाहेब म्हणाले,

"अस्लम, तुम्ही हा विषय उगीच काढलांत. त्या मुंबईच्या भामट्यानं मीनाक्षीच्या व तुमच्या मनांवर कसली जादू पसरली आहे कोण जाणे! धर्म हा प्राणाहूनहि प्यार मानला पाहिजे ही वास्तविक आपल्या धर्माची पहिली शिकवण आहे. पण त्या सुधीरविषयीं तुमची नजरबंदी झाल्यामुळं तुम्ही तीहि शिकवण खुशाल मोडायला तयार झालांत, अन् मलाहि तसं करायचा उपदेश करीत आहांत!—आश्चर्य आहे!—"

"पण खानसाहेब, जरा विचार करा. अहो धर्म म्हणजे काय नुसत्या—"

"नहि, अस्लम नहि—" एकदम कठोर मुद्रा करून खानसाहेब म्हणाले, "ही बात आतां बस झाली. धर्माबद्दल असे बाल काटित ( केंस छेदीत ) बसायची माझी इच्छा नाहीं. मला समजत नसेल. मी वेडा असेन. पण तुमचं काफिरी ( नास्तिक ) शहाणपण मला नको. ज्या त्या मुंबईच्या भाम-ट्यानं झूटे आरोप करून अमीरसाहेबांना मरणप्राय दुःख देऊन त्यांना आत्म-हत्या करायला लावली—"

“ काय हें ? काय हें खानसाहेब ?—आत्महत्त्या किंवा सजा ( शिक्षा ) याशिवाय गत उरली नाहीं म्हणून अमीरसाहेबांनीं आत्महत्त्या केली हें उघड उघड दिसत असतां—”

“ तुम्ही म्हणा खुशाल उघड उघड. मी कदापि म्हणणार नाहीं. आणि या मुंबईच्या भामट्याला मीना देणं तर बाजूलाच राहिलं, अमीरसाहेबांवरचं माझं प्रेम स्मरून मला त्याच्यावर सूडच घेतला पाहिजे. हिंदू !—काफिर ! मुलगी मागणाऱ्या संभाजीला सुळावर चढविणाऱ्या औरंगजेबाची सत्ता या वेळीं माझ्या हातीं हवी होती !—”

या बोलण्याच्या वेळीं खानसाहेबांनीं जे हावभाव केले ते पाहतांच अस्लम अगदीं विस्मित झाले. हृदयाला पीळ पडून माणूस बोलत असला म्हणजे जसे हातवारे करतो तसे ते होते. गेल्या तीन दिवसांतल्या प्रकारांनीं खानसाहेबांच्या मनांतला हटवादाचा पीळ सैल झाला असेल अशा कल्पनेनें बोलणाऱ्या अस्लमना तो अधिकच वक्र व दृढ झालेला पाहून जितका विस्मय तितकाच खेदहि झाला. ते म्हणाले,

“ छे छे ! खानसाहेब, दुःखातिशयामुळं तुमचा विवेक सुटला आहे. अमीरसाहेबांवर तुमचं प्रेम फार होतं त्यामुळं, त्या प्रेमाला तो सर्वस्वीं नालायक होता हें कळतांच तुम्हांला अतिशय दुःख हावं हें साहजिक आहे; आणि तितक्यांत अमीरसाहेबांनीं एकदम आत्मघात करून घेतल्यामुळं तें दुःख अधिकच वाढावं हेंहि साहजिक आहे. पण जरा विवेक करा—”

“ हंः ! विवेक करा याचा अर्थ एका काफिराला मुलगी या हाच कीं नाहीं ? ” खानसाहेब त्यांच्याकडे तुच्छतेनें पहात म्हणाले.

खानसाहेबांची अशी नजर अस्लमनीं कधीं पाहिली नव्हती.

ती पाहून त्यांना फार खेद झाला. अनेक वर्षांचा आपला जुना, गोड परस्पर-स्नेह दग्ध होऊन त्याच्या ज्वाळाच जणूं त्या नजरेंतून बाहेर पडत आहेत असा त्यांना भास झाला. वृद्धपणामुळें अधिकच हळुवार झालेल्या त्यांच्या अंतःकरणाला तो भास असह्य वाटला. एकदम खानसाहेबांच्या जवळ जावें व त्यांच्या खांद्यावर थाप मारून हंसत बोलून दग्ध होऊं पाहणारा आपला स्नेह शाबूत करावा अशी जोराची इच्छा त्यांच्या मनांत आली. ते आपल्या जागेवरून उठूं लागले—

तोंच खानसाहेबच उठून त्यांच्यापुढें येऊन उभे राहिले, व अत्यंत कठोर चर्या करून अतिशय भेदक स्वरांत म्हणाले,

" अस्लम, मीनाच्या लग्नाबाबत आजपर्यंत तुमची चर्चा मीं ऐकून घेतली. यापुढं त्या चर्चेचा एक शब्दहि आपल्यामधें निघतां कामा नये. समजलं? अमीरसाहेब मेले—म्हणून सारी मुसलमान जात मेली नाहीं! वाटच्या काफिरालाहि जांवई करून अमीर बनविण्याइतकी पैशाची ताकद माझ्याजवळ आहे! पुन्हां सुधीरचं नांव काढूं नका! अन् त्यानं पुन्हां या बंगल्यावर पाय घातला किंवा मीनाची भेट घ्यायचं धाडस केलं तर—तर—तुम्ही त्याचे हितचिंतक आहांत ना?—सांगा त्याला समजावून!—"

इतकें बोलून खानसाहेब दिवाणखान्यांतून निघून गेले.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुधीरनें लवकर उठून काकांना तार केली कीं, दादा अजून वसईहून आलेच नाहींत कीं ते आले असून त्यांची तुमची अजून भेट झाली नाहीं? तुमच्या पत्राची मी सारखी वाट पहात आहें.

ही तार करून तो परत घराकडे आला.

तो खोपटाच्या आवारांत शिरत होता तोंच जुबेदा त्याच्या खोलींतून बाहेर पडलेली त्याला दिसली.

तो आश्चर्यचकित झाला.

तिच्याजवळ जाऊन त्यानें विचारलें,

" हें काय?—या वेळीं?—"

" क्या कहूं?—बडा बूरा वखत आया!—" तिनें अगदीं गद्गदून उत्तर दिलें.

" म्हणजे?—झालं काय?—या, खोलींत येतां?—"

तीं दोघें खोलींत गेलीं.

जुबेदा धड बसलीहि नाहीं. तिनें उभ्याउभ्याच बोलत राहून आदल्या दिवशीं अस्लमकाकांचा व खानसाहेबांचा जो भाषणप्रसंग झाला होता तो सांगितला, आणि नंतर खानसाहेब मीनाक्षीला काय बोलले होते व बंगल्याच्या बाहेर पाऊल टाकायची त्यांनीं तिला कशी बंदी केली होती तीहि हकीकत

तिनें सांगितली. ती सांगतांना खानसाहेबांविषयींचा राग आणि मीनाक्षीची करुणा अशा विकारांच्या मिश्र आवेगानें तिचे हावभाव अधिक झाले, व तिला श्वासहि लागला; आणि आपण व डॉ. अस्लमनीं कितीहि समजूत केली तरी मीनाचें दुःख कसें कमी होत नाहीं त्याचें वर्णन करतांना शेवटीं तीच डोळे पुसूं लागली.

शेवटीं ती म्हणाली,

" घाबरून पंखाची फडफड करीत घरट्यांत चिवचिवणाऱ्या लहान पांखरासारखी माझ्या प्यार मीनाची अवस्था झाली आहे. आपलं दर्शन झाल्यावांचून तिचं दुःख शमायचं नाहीं. आत्तांच्या आत्तां आपण बंगल्यावर आलांत तरच उपयोग. अमीरसाहेबांच्या इस्टेटीची कांहीं भानगड मिटवायसाठीं खानसाहेब गेले आहेत डी सिल्व्हाकडे. ते परत घरीं यायच्या आंत तुमची अन् मीनाची भेट झाली तर होईल. ते आले म्हणजे—"

" चल, मी येतों तुझ्याबरोबर—" असें म्हणून सुधीर निघाला.

बंगल्यावर डॉ. अस्लम वाटच पहात होते. सुधीर भेटतांच,

" कळलं ना सारं ?—खानसाहेबांच्या मनानं भलतीच उलट खाल्ली आहे—" असें म्हणून त्यांनीं थोडक्यांत सारी हकीगत सांगितली व शेवटीं,

" आतां ?—" असें उद्गारून ते त्याच्याकडे पहात राहिले.

सुधीर म्हणाला,

" तें असो. मीनाक्षीचं प्रेम अजून अढळ आहे ना ?—"

" हें काय विचारतां ?—"

" अन् काका, तुमचा लोभ अजून आहे ना ?—"

" बेशक—"

" मग काय फिकीर ?—खानसाहेबांच्या रुकारासाठीं अडून न बसतां मी तुमच्या साहाय्यानं मीनाक्षीला नेऊं शकेन—"

असें म्हणून मोठ्या उल्हसित मुद्रेनें तो तेथून निघून मीनाक्षीच्या अंतर्गृहांत गेला.

डॉ. अस्लम त्याच्याकडे पहात राहिले.

मीनाक्षीचें हरण करण्याची कल्पना सुधीरच्या तोंडून ऐकून ते किंचित्

चकित झाले. आणि अशा साहसांत सुधीर आपल्या साहाय्याची अपेक्षा करणार ही कल्पना मनांत येतांच ते जरा गोंधळले.

अशा वेळीं आपलें कर्तव्य काय समजावयाचें ?—

आपण सुधीरला साहाय्य केलें तर खानसाहेबांशीं—अत्यंत जिव्हाळयाच्या स्नेह्याशीं द्रोह केल्यासारखें होईल !

पण त्या द्रोहाचें काय मोठें ?—

खोट्या धर्मवेडापायीं सुधीर व मीना यांच्यासारख्या दोन प्रेमळ जीवांचें बलिदान होऊं देण्यापेक्षां—

अशा तऱ्हेचे विचार करीत डॉ. अस्लम तेथें बराच वेळ उभे राहिले.

*  *  *

खानसाहेब केव्हां परत येतील त्याचा नियम नव्हता, आणि ते यायच्या आंत सुधीरनें बंगल्यावरून जायला पाहिजे असें डॉ. अस्लमनीं व जुबेदानें त्याला पुनः पुन्हां बजाविलें होतें.

मीनाक्षीनेंहि आपला मोह आंवरला व पंधरावीस मिनिटें होतांच म्हटलें,

" आपण जावं आतां. बाप्पा केव्हां येतील नेम नाहीं—"

" पण आले तर मला खायचे नाहींत ना ?—मी तर म्हणतों एकदां खानसाहेबांची अन् माझी—"

" छे छे ! असा आततायीपणा मनांत आणूं नये !—मेरे जानकी कसम ! ( माझ्या गळयाची शपथ आहे आपल्याला ! ) असलं कांहीं करायचं नाहीं. जावं. असं काय ?—जावं आपण—"

सुधीरनें तिच्याकडे हंसत पाहून म्हटलें,

" जातों."

तिचे हात त्याच्या हातांत होते. ती तोंडानें जावयास सांगत होती तसे आपले हातहि ती काढून घेत होती.

ते हात एकदम घट्ट पकडून सुधीर म्हणाला,

" मीना—"

मीनाक्षीनेंहि उलट त्याचे हात दाबले व म्हटलें,

"माझा जीव आतां या घरांत जगायचा नाहीं. आपण घेऊन जाल तरच--"

"मीना! माझ्या प्राणा! तूं निश्चिन्त रहा. उद्यां रात्रीं आपण—साऱ्या धर्मवेडाची अटक ओलांडून आपण नंदनवनांत प्रवेश करूं--धीर धर."

सुधीर मीनाक्षीच्या खोलीच्या बाहेर आला तेव्हां कांहीं एका विलक्षण उल्हासाच्या लाटा त्याच्या अंतःकरणांत उचंबळत होत्या. दादांच्या रुकाराबद्दल कसलेंहि पत्र आलें तरी त्याची क्षिति ठेवायची नाहीं असें त्यानें ठरविलें होतें. दादांच्या काय किंवा खानसाहेबांच्या काय, कोणाच्याहि जुन्या संस्कृतीच्या अट्टाहासापुढें नम्र होण्याचें कांहीं कारण नाहीं असें त्याला वाटत होतें. साऱ्या संस्कृतींना जन्म देणारी जी प्रीति तिनें संस्कृतीचा विरोध सहन करावयाचा? खऱ्या प्रीतीला कोठली अटक!

त्यानें मोठ्या उत्साहानें चहूंकडे नजर टाकली. त्याच्या उन्मत्त दृष्टीला कोठें कसलीच अटक दिसेना.

---

# प्रकरण २९ वें

# वादळांत



मीरसाहेबांच्या इस्टेटीसंबंधीं कांहीं सरकारी तजविजी करायला पाहिजे होत्या म्हणून खानसाहेब डी सिल्व्हाकडे गेले ते तो विषय संपल्यावरहि आणखी कांहीं वेळ त्याच्या खोलींत थांबले.

दुसराच कांहीं तरी विषय त्यांनीं काढला होता. ते अगदीं हलक्या आवाजांत डी सिल्व्हाला कांहीं तरी समजावून देत होते.

त्यांचें सांगणें ऐकून घेतांना डी सिल्व्हाची चर्या जरा गोंधळल्यासारखी झालेली दिसत होती. तो मध्येंच म्हणाला,

" पण असं कसं करतां येईल ? त्याच्या रक्षणार्थ मुंबईचे पोलिससुद्धां—"

" किती वेडगळ आहेस डी सिल्व्हा तूं ! " खानसाहेब म्हणाले, " अरे करायचं नाहीं कांहींच. नुसती भीति दाखवायची !—"

" हं. असं म्हणा—"

" दुसरं काय तर ! "

असें म्हणून खानसाहेबांनीं त्याचा निरोप घेतला व त्यांनीं ठेवलेल्या टेबलावरच्या नोटा डी सिल्व्हानें गोळा करून खिशांत घातल्या.

संध्याकाळीं डी सिल्व्हा सुधीरकडे गेला व म्हणाला,

" तुम्ही आतां घेतुकुंज सोडून लवकर जावं हें बरं."

सुधीर वास्तविक दुसऱ्या दिवशीं मीनाक्षीसह निघण्याचेच बेत करीत होता. पण डी सिल्व्हाचें तें बोलणें त्याला चमत्कारिक वाटलें. त्यानें भुंवया चढवून विचारलें,

" कां ?—"

" तुमचा जीव धोक्यांत कां घालतां ?—"

" म्हणजे ?—"

" खानसाहेब तुमच्यावर उसळले आहेत. या गांवीं भाडोत्री मारेकऱ्यांना तोटा नाहीं—"

" अस्सं ?—असं काय ?—"

" म्हणून म्हणतों तुम्ही एकदम मुंबईस परतावं हें बरं—"

सुधीरनें एकदम डी सिल्व्हाचा कोट धरून म्हटलें,

" माझा निरोप सांगाल कां खानसाहेबांना ?"

डी सिल्व्हा त्याच्याकडे पहात राहिला.

सुधीर पुढें म्हणाला,

" त्यांना म्हणावं माझा प्राण घ्यायचं शौर्य करायचं असलं तर खुशाल करा. पण प्राणाच्या भीतीनं मीनाक्षीला सोडून पळून जाण्याइतका मी भेकड नाहीं !—सांगा त्यांना."

डी सिल्व्हा गोंधळला, व मग फार वेळ न थांबतां त्यानें सुधीरचा निरोप तला.

तो जाऊन पुरी पाव घटकाहि झाली नसेल तोंच तारवाला सुधीरच्या वांची तार घेऊन आला.

तार काकांची होती.

" दादा काल आले. मी त्यांची गांठ घेतली. तुझें पत्र वाचल्यापासून ते इतके संतापले होते कीं सांगतां सोय नाहीं. माझ्याशीं ते एक शब्दहि धड बोलले नाहींत व त्यांनीं मला घरांतून हांकून दिलें. आमचें भांडण, तुझ्या आईची व माईची रडारड, असा अगदीं वावगा देखावा घरांत झाला. संतापातिरेकानें दादा सारखें बडबडत आहेत. घर सोडून संन्यास घेतों असा जप चालविला आहे. डॉक्टर म्हणतात त्यांना अल्पावधींत वेड लागेल. वहिनी व माई सारख्या रडत आहेत. मी हतबुद्ध होऊन गेलों आहे. तुला ताबडतोब येण्यावांचून गत्यंतर नाहीं. तार मिळतांच नीघ. अगदीं वाट पहात आहोंत."

तार वाचून सुधीर कांहीं वेळ भ्रमिष्टासारखा सुंद होऊन बसला. कशाचा तरी तडाका बसून एखाद्या यंत्राचीं चक्रें थांबावीं तशीं थांबलेलीं वीं विचारचक्रें कांहीं अवधीनें सुरू झालीं.

प्रसंग भलत्या पेंचाचा होता.

एकीकडे प्रेम ओढीत होतें, तर दुसरीकडे दादांना वेड लागेल आणि आपल्या आईला आपण कायमची दुःखांत बुडवूं ही भीति जिवाचा थरकांप उडवीत होती ?---

गेलें हें पाहिजेच !---

न नेलों तर ?---

किंवा आपण योजल्याप्रमाणें मीनाक्षीला घेऊनच गेलों तर ?---

छे !---हा काय दादांच्या संतापावर व वेडावर उपाय ?---

एकटेंच जावयास माहिजे !---

आणि तेंहि उद्यां उजाडतांच !---

असे विचार करीत तो किती वेळ तरी बसला.

मध्येंच त्याच्या मनांत आलें,

जावयाचें !---पण जाण्यापूर्वी मीनाक्षीची भेट घेऊन तिला आश्वासन---?

अलबत, अलबत !

तो ताबडतोब उठला, आणि कपडे घालून बाहेर पडला.

रात्र अंधारी होती, आभाळांत ढगहि दाटले होते.

पण सुधीरला पर्वा नव्हती.

तो वेगानें निघाला व खानसाहेबांच्या बंगल्यावर पोंचला.

बंगल्यांत नेहमींप्रमाणें दिव्यांचा प्रकाश दिसेना.

सुधीरला तें चमत्कारिक वाटलें.

तो आवारांतून पुढें गेला व आगाशीपर्यंत पोंचला.

दिवाणखान्याचीं व खोल्यांचीं दारें बंद होतीं !

सुधीरच्या आश्चर्याला सीमाच उरली नाहीं.

पलीकडे नोकरांच्या ओसरींत दिवा असल्यासारखें त्याला वाटलें.

म्हणून तो तिकडे गेला. खानसाहेबांचा मोतदार घोड्याला तोबरा देत होता. सुधीरला पाहतांच त्यानें लवून मुजरा केला.

“ म्हणजे ?---मालक---सारी मंडळीं गेलीं कुठं ? ” सुधीरनें विचारलें.

“ आपको नहि मालुम ? ” मोतदारानें उलट आश्चर्यानें विचारलें.

“ नहि.”

“ ऐसा हुवा---”

असें म्हणून मोतदारानें जी हकीगत सांगितली त्यावरून असें दिसलें कीं बांदेषला डॉ. अस्लमच्या घरीं चार दिवस थारेपालट करण्याचा बेत खान-साहेबांनीं त्या दिवशीं दुपारीं एकाएकीं केला होता, त्या बेताला नको म्हणणें डॉ. अस्लमना शक्य नव्हतें, व त्यामुळें सगळी मंडळी संध्याकाळीं मचव्यांत बसून बांदेषकडे रवाना झालीं होतीं.

तें ऐकून सुधीर स्तंभितच झाला.

एकावर एक होणाऱ्या या अकल्पित घटनांचा अर्थच त्याला कळेना. पाण्याच्या भोंवऱ्यांत सांपडल्यासारखें त्याला वाटलें. मीनाक्षीचें हरण करण्यास आपण उद्युक्त झालों असतांना कोठल्या तरी अदृश्य शक्तीच्या दोरखंडांनीं आपले हातपाय जखडले जात आहेत असा त्याला भास झाला.

तो परत गेला तेव्हां वृष्टि सुरू झाली होती. पण जलधारांनीं चिंब भिजून जाऊनदेखील त्याला त्यांचा थंड स्पर्श उमजेना.

विस्मयाच्या धक्क्यांनीं त्याचें अंग इतकें बधिर झालें होतें !--

त्या रात्रीं भयंकर वादळ झालें.

पावसाचा धो धो आवाज, वाऱ्याचा घोंगाट, आणि विजेचा कडकडाट ऐकतच सुधीरनें सारी रात्र काढली.

सकाळीं मोटारींत बसून तो निघाला तेव्हां वाटेनें जिकडे तिकडे आदल्या रात्रीच्या वादळानें झालेली नासधूस त्याला दिसूं लागली. खोपटांवरचीं छपरें उडालीं होतीं, दगड वहात येऊन रस्त्यावर पडले होते, लाल पाण्याचे लोंढे अजून दुतर्फा फोंफावत होते, आणि मोठमोठे वृक्षहि उन्मळून उलथे पालथे झाले होते.

जणूं हट्टी संस्कृतीच्या वादळांत सांपडून भग्न झालेल्या प्रीतीचाच देखावा आपल्या दृष्टीस पडत आहे असें सुधीरला वाटलें.

# प्रकरण ३० वें

---

## अटकेपार



घरीं कोणत्या तऱ्हेची परिस्थिति वाढून ठेवलेली आहे याची काकांच्या तारेवरून सुधीरनें कल्पना केलीच होती. ती सर्वस्वीं खरी ठरली.

दादांनीं संतापाचा अतिरेक करून घेतला होता. डॉक्टरांच्या मतें त्यांच्या मनःस्थितीला अजून वेड ही संज्ञा देतां येत नव्हती, पण तिचें वेडांत केव्हां रूपांतर होईल त्याचा नियम नव्हता.

सुधीर दृष्टीसमोर येतांच ते क्रोधानें लाल झाले. कांहीं वेळ त्यांच्या तोंडून शब्द फुटेना.

सुधीरनें नेहमींप्रमाणें त्यांना प्रणिपात करतांच ते ओरडले,

"छान केसानं गळा कापलास! धर्माची परंपरा उज्ज्वल राखण्यासाठीं मी जन्मभर झटलों, तूं एकाच हातानं सगळयाला काळोखी फांसलीस! मुसलमानाची स्त्री तुला हवी!--साऱ्या हिंदू स्त्रिया मेल्या!—चवदा पिढ्या उद्धारल्यास खऱ्या!--"

किती वेळ तरी त्यांचें तें बोलणें थांबेना.

तें मुकाट्यानें सहन करणें भाग होतें. त्यांच्या उत्तराला एका शब्दाचेंहि प्रत्युत्तर होतां कामा नये अशी डॉक्टरांची सक्त ताकीद होती.

सुधीरच्या अंतःकरणाच्या स्थितीचें वर्णन कोठल्या शब्दांनीं होणार?

तो बाहेरून धीरगंभीर दिसत होता. आंतून त्याच्या अंतःकरणाला दुःखाचे पाझर फुटले होते.

* * *

दोन दिवसांनीं काकांच्या सल्ल्यानें त्यानें मीनाक्षीस एक लांबलचक पत्र लिहिलें. धेनुकुंजाहून आपणांस कसें यावें लागलें, बंगल्यावर आपण कसें

गेलों व परत आलों, आणि येथें घरीं आल्यावर कोठल्या विचित्र पेंचांत आपण सांपडलों आहोंत त्याचें त्यानें सविस्तर वर्णन केलें होतें. आणि शेवटीं त्यानें म्हटलें होतें,

"पण मीना, आपली प्रीति उज्ज्वल आहे. ती परिपूर्ण झालीच पाहिजे अशी माझी श्रद्धा आहे. या अडचणी आज उग्र व भयंकर दिसत आहेत. पण लवकरच या नष्ट होतील व आपली भेट होईल. तुझ्या दिव्य प्रेमाच्या नुसत्या आठवणीनेंसुद्धां माझ्या अंगचें सामर्थ्य शतपट वाढतें. या संकटांतून सुटतांच तुझ्याकडे धांव घेईन. तोंवर धीर धर. माझ्यावर रुष्ट होऊं नकोस!"

हें पत्र त्यानें डॉ. अस्लमच्या पत्रांत घालून पाठविलें.

दहाबारा दिवस झाले, तरी अस्लमकडून उत्तर आलें नाहीं.

शेवटीं एके दिवशीं अस्लमचें पत्र आलें. तें वाचतांच सुधीरनें किंकाळी फोडली व धरणीवर अंग टाकलें.

अस्लमनीं लिहिलें होतें कीं, खानसाहेबांनीं मीनाक्षीस तिच्या मर्जीविरुद्ध बांदेषला आणल्या दिवसापासून मनःसंतापानें तिला ताप येऊं लागला होता. ताप रोज वाढतच चालला, केव्हांहि उतरला नाहीं, आणि त्यांतच शेवटीं तिचें देहावसान झालें होतें. सुधीरचें पत्र मिळालें तोच तिचा या जगांतला शेवटचा दिवस, आणि तें वाचतांच तिनें क्षीण हास्य केलें तेंच त्या मुग्ध, मोहक बालिकेचें शेवटचें हास्य!

दुःखातिशयानें सुधीरचें मस्तक फुटण्याची वेळ आली. त्याच्या डोळ्यांपुढें अंधार पसरला. कानांत कर्कश शब्द होऊं लागले. सारी पृथ्वी प्रचण्ड लाटांत सांपडून हेलकावत आहे असें वाटून त्याचा झोंक जाऊं लागला.

दिवसभर आणि रात्रभर एक भयाण युग सुरू झालें आहे आणि तें कधीं संपणार नाहीं असें त्याला भासत होतें.

पहांटे तो उठला व त्यानें आपली ट्रंक उघडून मागें मीनाक्षीकडून आलेला शेला काढला. त्यांत मस्तक घालून तो मनसोक्त रडला.

मग तो तसाच उठला व कपडे न करतां तो शेला उपरण्यासारखा घेऊन घराबाहेर पडला.

तो चौपाटीवर गेला.

त्या वेळीं समुद्रावर कोणीहि नव्हतें.

तो शेला हृदयाशीं धरून तो सारखा समुद्राकडे पहात उभा राहिला.

क्षितिजाच्या रेषेवर हंसतमुख मीनाक्षी त्याला स्पष्ट दिसली. तिला त्या म्हटलें,

" मीना, लाडके ! आपल्याला शोक करायचं काय कारण आहे ? आपल सुखाची होळी झाली तिच्या ज्वाळा पाहून जुन्या संस्कृतीला हट्टानं चिकट णाऱ्यांचे डोळे उघडले तर आपल्या प्रीतीचं हें बलिदान किती दिव्य !— आपल्या प्रीतीची सांगता या ऐहिक जीवितांत झाली नाहीं. पण संस्कृतीच्य पोकळ अभिमानाची अन् ऐहिक आग्रहाची अटक जिथं संपते तिथं—त्या पैल तीरावर आपलं मीलन खचित होईल ! "

असें म्हणून भावनांचा आवेग सहन करावयासाठीं नेत्र मिटून तो तसा किती वेळ तरी उभा राहिला.

त्यानें डोळे उघडले तों अरुणाचा कोंवळा रक्तवर्ण मंगल प्रकाश पूर्वेकडे फुटत आहे, व त्या प्रकाशाच्या दिव्य मंडलांत दूर—क्षितिजसीमेच्या पलीकडे—अटकेपार सुधीर व मीनाक्षी एकमेकांचें चुंबन घेत आहेत असें त्याला अगदीं स्पष्ट दिसलें !

समाप्त